# जळलेला मोहर

( सामाजिक कादंबरी )

लेखक
वि. स. खांडेकर

किंमत सहा रुपये

आमचे मुंबईचे स्नेही

प्रो. वि. द. दाभोलकर

व

सौ. उषाताई दाभोलकर

यांस—

# तोंडओळख

पिरंडेलोचें 'Six Characters In Search Of An Author' हें नाटक मीं वाचलें तेव्हां त्यानें अवलंबिलेल्या तंत्राची मला मोठी गंमत वाटली. लेखकानें जीं पात्रें निर्माण केलेलीं असतात तीं प्रत्यक्ष त्याला भेटतात नि आपली खरीखुरी हकीगत सांगूं लागतात, अशी या नाटकाची मध्यवर्ती कल्पना आहे. ही हकीगत ऐकतांना लेखकाला आपली निर्मिति आणि वस्तुस्थिति यांच्यांत जें अंतर आहे त्याची तीव्र जाणीव व्हावी यांत नवल कसलें ? कारण निर्मिति म्हणजे लेखकाच्या वैयक्तिक संवेदनांचा कल्पनेनें केलेला विस्तार असतो. लेखक कितीहि प्रतिभावान् असला तरी या विस्तारांत एकांगीपणा हा येणारच.

या पद्धतीनें एखादी कादंबरी लिहिली तर ती मनोवेधक झाल्यावांचून राहणार नाहीं असें मला वाटलें. म्हणून गतवर्षी मीं 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट लिहिली आणि तिच्यांत प्रतिपादन केलेल्या विषयाचे उलटसुलट अनुभव आलेलीं अनेक माणसें लेखकाला भेटतात असें दाखवून कादंबरीच्या पुढच्या कथानकाची रचना केली. साहजिकच या कादंबरींत मी, माझें कुटुंब, माझे मित्र, माझ्या हालचाली, इत्यादि गोष्टींचे वारंवार उल्लेख येणें अपरिहार्य झालें. हा 'मो'पणा निवेदनपद्धतीच्या नावीन्यामुळें या कथेंत शिरला आहे.

कादंबरीबरोबरच आत्मचरित्र वाचकांच्या गळ्यांत बांधण्याचा उद्देश यांत नाहीं. सत्य हा जसा शास्त्रीय वाङ्मयाचा आत्मा, तसा सत्याभास हा ललितवाङ्मयाचा आत्मा असतो, हें तत्त्व जाणणाऱ्या रसिकांना या बाबतींत अधिक कांहीं सांगायला नको.

मात्र 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट लिहितांना मीं पुढील कथानकांची जी आंखणी केली होती, तिच्यांत लिहितां लिहितां अनेक लहानसहान बदल होत गेले. हे बदल मीं कलेच्या दृष्टीनें केले नाहींत; तर अनुभवांच्या दृष्टीनें. 'पारिजातकाचीं फुलें' या नांवाखालीं या कादंबरीचीं पहिलीं पांच प्रकरणें 'किर्लोस्कर'मध्यें प्रसिद्ध होत असताना मला अनेक पत्रें आलीं. तीं वाचतां वाचतां सामान्य मनुष्याच्या आयुष्यांतल्या अत्यंत जिव्हाळ्याच्या पण तितक्याच नाजुक अशा एका विषयाकडे, आपलें कितीं दुर्लक्ष झालें होतें याची मला पूर्णपणें जाणीव झाली. मला आलेल्या पत्रांत पुरुषांप्रमाणें स्त्रियांचींहि पत्रें होतीं. या पत्रलेखकांपैकीं कित्येकांनीं आपले अनुभव इतक्या प्रामाणिकपणानें सांगितले होते, कीं एक-दोन ठिकाणीं माझ्या कल्पनेपेक्षां त्या अनुभवांनाच या कादंबरींत जागा देणे मला अधिक इष्ट वाटलें.

मात्र प्रत्येक पत्राचा लेखक शेवटीं एक ताजा कलम लिहायला विसरत नसे—'हें पत्र वाचून झाल्यावर फाडून टाका!'

इतके दिवस जपून ठेवलेलीं हीं सर्व पत्रें त्यांच्या मालकांच्या इच्छेप्रमाणें मी आज नाहींशीं करणार आहें. पण त्यांतलें प्रत्येक पत्र फाडतांना माझ्या मनांत एकच विचार एकसारखा येत राहील—मी फाडीत असलेलें हें पत्र हा कुणाच्या तरी आंतरिक दुःखाचा उत्कट उद्गार आहे. जें दुःख त्या व्यक्तीला उभ्या आयुष्यांत कुणापाशीं बोलून दाखवितां आलें नाहीं, मित्रांच्या कानांतसुद्धां जें सांगण्याचें तिला धैर्य झालें नाहीं, तें या पत्रांत शब्दांच्या रूपानें साकार झालें आहे.

कुठल्याहि बाबतींत मुका मार सोशीत माणसानें जन्म काढावा ही कल्पनाच मला भयंकर वाटते. शरीराच्या बाह्य भागाला झालेल्या जखमेपेक्षां कॅन्सरसारखा आंतला रोगच अधिक प्राणघातक असतो. सामान्य माणसांच्या दुःखांनाहि हाच नियम लागू आहे. दारिद्र्यानेंसुद्धां तो आयुष्याला विटून

जाणार नाहीं; पण संसाराच्या रूक्षपणामुळें मात्र आत्महत्येचे विचार त्याच्या मनांत डोकावूं लागतील.

असें असूनहि संसारसुखाची चिकित्सा करण्याची पद्धत आपल्याकडे फारशी रूढ नाहीं. स्त्री-पुरुषांच्या संबंधाविषयींचें कुतूहल प्रत्येक मुग्ध मनांत वावरत असतें. या संबंधाचे सुखद अथवा दुःखद अनुभव प्रत्येक प्रौढाच्या मनांत घोळत असतात आणि प्रत्येक तरुण 'स्त्रीप्रेमाविण जन्म नीरस उणा काडीवजा भूवरी' हा चरण म्हणण्यांत गुंग होऊन जात असतो. (स्त्रीच्या ऐवजीं पुरुष हा शब्द घालून हा ओळ म्हणतां येणार नाहीं, हें खरें. प्रत्येक तरुणीच्या बाबतींत तीं खरी असते यांत कांहीं शंका नाहीं.)

पण कुतूहल, काव्य, कटुता, इत्यादि अनेक पैलू असलेल्या या जिव्हाळ्याच्या विषयाची उघडपणें चर्चा करणें फारसें प्रशस्त नाहीं, अशीच आपल्यापैकीं बहुतेकांची अजूनहि समजूत आहे. वर्गांत मास्तर येण्यापूर्वी प्रत्येक मुलाची कुजबूज सुरू असते. पण मास्तरांचें वर्गांत पाऊल पडलें रे पडलें, कीं तिथें एकदम गंभीर शांतता पसरते. अगदीं तश्शी स्थिति आहे या बाबतींत आपली. प्रत्येक तरुण मनांत प्रीतीच्या अस्फुट मधुर कल्पना पिंगा घालीत असतात. संसारसुख हा सामान्य मनुष्याच्या जीवनांतला एक मोठा भाग आहे हं प्रत्येकाला जाणवत असते. पण या विषयाची चर्चा—त्या बाबतींतल्या अनुभवांची देवाण-घेवाण—या प्रश्नाकडे शास्त्रीय दृष्टीनें विचार करून केलेले मार्गदर्शन—छेः! समाज हा मोठा तापट तात्यापंतोजी आहे! त्याच्या हातांतली ती रूढाची लांबलचक छडी पाहिल्याबरोबर प्रत्येकजण मनांत गर्भगळित होतो नि स्वतःशींच म्हणतो, 'आपण आपलं गुपचूप बसावं हें बरं!'

लैंगिक बाबतींतली आमची सभ्यपणाच्या कल्पनांची चौकट किती पोलादी आहे, नि त्या चौकटींत जिज्ञासा, विचार, मार्गदर्शन, इत्यादिकांचा समावेश कसा होऊं शकत नाहीं, याबद्दलच्या एक-दोन गोष्टी आठवल्या कीं, मला अजून हंसूं येतें.

त्या वेळीं मी पांच-सहा वर्षांचा असेन. नुकतेंच वाचायला यायला लागलें होतें मला. कुठलीहि नवी गोष्ट साध्य झाली कीं, मुलांत जॉर्ज वॉशिंग्टनचा संचार होता. त्यानें कुऱ्हाड मिळतांच भराभर झाडें तोडायला सुरुवात केली

होती ना ? मीहि रटफ करीत पुस्तक, पोथी, सुखसंचारक कंपनींचे कॅटलॉग, नाटकांच्या जाहिराती, किंबहुना जो जो छापील मजकूर हाताला लागेल, तो तो वाचूं लागलों. मला घरीं शिकवायला येणारे मास्तर माझ्या या वाचनाच्या वेडाचें नेहमींच कौतुक करीत.

एके दिवशीं वडिलांच्या टपालांतून आलेलें एक छापील कार्ड मीं पाहिलें. हां-हां म्हणतां मीं तें लंबें केलें. कुणाची तरी लग्नपत्रिका होती ती. तिच्यांत छापलें होतें—'चि. सौभाग्यकांक्षिणी अमुक हिचा विवाह (सोबत तिथि, घटका, पळें, स्टॅंडर्ड टाइम, वगैरे वगैरे) करण्याचें योजिलें आहे. शरीरसंबंध राजमान्य राजश्री तमुक—'

शरीरसबंध या शब्दावर मी अडखळलों. शब्दकोश म्हणून एक ग्रंथ असतो हें त्या वेळीं मला ठाऊक नव्हतें. नाहीं तर त्या जिज्ञासेच्या भरात मीं सारे मराठी कोश उलथेपालथे करून टाकले असते. आमच्या धोंडू मोलकरणीची मुलगी माझ्याहून थोडी मोठी होती. तिच्याबरोबर पुष्कळदां खेळत असे मी. मला अडलेल्या या शब्दाचा अर्थ मीं तिला विचारला. पण तीहि माझ्याइतकीच विद्वान् निघाली !

संध्याकाळ केव्हां होते असें झालें मला त्या दिवशीं.

तिन्हीसांजा झाल्या. दिवे लागले. गणपतीच्या देवळापुढच्या रस्त्यानें हातांत कंदील घेऊन फिरणारा फकीर कोपऱ्यावर दिसूं लागला. मी अगदीं वाट बघत होतों. मास्तरहि येत असलेले दिसले.

आनंदानें नाचतच मी घरांत आलों.

मास्तर शिकवायला बसले. लगेच माझी शंका मीं त्यांच्यापुढें सादर केली. त्यांनीं तो लग्नपत्रिकेतला शब्द वाचला मात्र—त्या शब्दाचा अर्थ फार भयंकर असला पाहिजे अशी माझी त्यांच्या चेहऱ्यावरून खात्री झाली. मास्तरांनीं डोळे वटारून क्षणभर माझ्याकडे पाहिलें. त्या कार्डाचे राईराई-एवढे तुकडे करून ते फेकून दिले नि ते रागानें उद्गारले, 'माझ्यापाशीं असला फाजीलपणा चालायचा नाहीं ह ! चल, म्हण—बारा एके बारा !'

मीं उच्च स्वरांत सुरवात केली, 'बारा एके बारा, बारा दुणे चोवीस !'

मी तोंडानें पाढे म्हणत होतों; पण मनांत ? माझें मन एकसारखें म्हणत होतें—शरीरसंबंध हा प्राणी वाघ, सिंह, हडळ, राक्षस, वगैरेंपेक्षांहि भयंकर

असला पाहिजे. त्याशिवाय कांहीं आपले मास्तर तो शब्द वाचून असे घाबरले नसते. एक कोडें मात्र मला त्या वेळीं उलगडलें नाहीं. लग्न म्हणजे वाजंत्री, रांगोळया, बुंदीचे लाडू, मठ्ठा, इत्यादि इत्यादि गोष्टींचें संमेलन अशी माझी त्या वेळीं ठाम समजूत होती. या संमेलनाशीं शरीरसंबंध या भयंकर प्राण्याचा काय संबंध आहे हेंच मला कळेना !

नंतरची आठवण कॉलेजांतली आहे. स्कॉटची 'आयव्हनो' ही कल्पनारम्य ऐतिहासिक कादंबरी आम्हीं मित्रांनीं आनंदानें अभ्यासिली होती. गडकऱ्यांचें 'प्रेमसंन्यास' नाटकहि त्या वेळीं विद्यार्थ्यांत फार लोकप्रिय होतें. प्रेमसंन्यासांतला नायक जयंत याचें लीलेवर प्रेम असतें. तो स्वतः काव्यात्म आहे. उलट त्याची पत्नी मनोरमा ही तोंडाळ व रूक्ष अशी दाखविली आहे. त्यामुळें त्याला मनोरमा आवडूं नये व लीला आवडावी यांत अस्वाभाविक असें कांहींच नव्हतें.

माझ्या मित्रमंडळांत मतभेद झाला होता तो या कथानकाच्या पुढल्या भागाविषयीं. लीलेचे चुलते तात्यासाहेब घरांतल्या स्त्री-पुरुषांनीं एकत्र बसायचें नाहीं किंवा एकमेकांशीं बोलायचें नाहीं असा हुकूम फर्मावितात. त्यामुळें लीला व जयंत यांची भेट होऊं शकत नाहीं. शेवटीं तीं गुप्तपणें बागेंत एकमेकांना भेटतात, खलपुरुष कमलाकर हें पाहतो नि मग–ठिणगी मिळाल्यावर वाळलेल्या रानांत वणवा पेटायला कितीसा उशीर लागतो ?

माझ्या पक्षाचें म्हणणें होतें—जयंत व लीला यांना एकमेकांना भेटण्याची काय जरूरी होती ? पहिली बायको जिवंत असल्यामुळें आपल्याला लीलेशीं लग्न करतां येणें शक्य नाहीं हें जयंताला पुरें ठाऊक होतें. मग खुशाल आपल्या खोलींत तो लीलेचें चिंतन करीत कां बसला नाहीं ? लीला तरी त्याच्या भेटीसाठीं इतकी आतुर कां होते ? जयंतावर आपला हक्क नाहीं हें काय तिला कळत नव्हतें ? ती नुसती त्याची मानसपूजा करीत बसली असती तर मनोरमेचा मत्सर जागृतच झाला नसता. पण लीला पहाटे एकान्तांत जयंताची गांठ घ्यायला जी जाते ती कशाकरितां ? मानसिक प्रेमाकरितां ? प्लेटॉनिक लव्हसाठीं ? छेः ! तरुण स्त्रीपुरुषांचा परस्परांकडला ओढा केवळ मानसिक असूंच शकत नाहीं कित्येकदां प्रेमाचा आरंभ बौद्धिक अथवा भावनात्मक असूं शकेल; पण एखाद्या व्यक्तीविषयीं वाटणाऱ्या उत्कट आकर्षणाचा उगम बुद्धि

किंवा भावना यांच्या जननांतून किंवा समाधानांतून होत असला तरी त्याची परिणति एकमेकांविषयीं वाटू लागणाऱ्या शारीरिक आसक्तींतच होते. विल्हण किंवा ब्राउनिंग यांच्या प्रेमकथा पाहाव्या अथवा वामनराव जोश्यांसारख्या तत्त्वज्ञ कादंबरीकारानें रेखाटलेल्या इंदू काळेच्या चित्राचें पृथक्करण करावें, सर्वत्र एकच गाष्ट आढळून येईल. शरीरमीलनाच्या कल्पनेपासून सर्वस्वीं अलिप्त असें तरुण-तरुणींचे प्रेम ही सशाच्या शिंगाइतकीच दुर्मिळ चीज आहे.

लीलेच्या जोडीनें बाल पतिमूर्तीच्या चिंतनांत गुंग होऊन गेलेली प्रौढ सुशीलाहि गडकऱ्यांनीं घडविली असल्यामुळें, आमच्या प्रतिपक्षाला आपली बाजू बरीच बळकट आहे असें वाटत होतें.

खूप वेळ वादविवाद झाल्यावर शेवटीं मीं प्रतिस्पर्ध्यांना विचारलेला एक प्रश्न अद्यापिहि मला आठवतो. 'सुशीलेसारखी स्त्री असूं शकेल हें कबूल केलें, तरी जगांत लीला किती आहेत नि सुशीला किती आहेत?'

त्यांना वाद जिंकायचा होता. त्यामुळें या प्रश्नाचें उत्तर कुणीच प्रामाणिकपणें दिलें नाहीं. नि आजचा आपला समाजहि सर्व पूर्वग्रह बाजूला टाकून या बाबतींत प्रामाणिक मत द्यायला तयार होईल असे मला वाटत नाहीं.

अद्भुतरम्य पौराणिक कथाचा नि परलोकाच्या कल्पनेमुळें उत्पन्न झालेल्या अवास्तव वैराग्याचा आमच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानावर बसलेला पगडा अजूनहि दूर झालेला नाहीं. काम-क्रोध हे मनुष्याचे षड्रिपु नसून त्याचे जिवलग दोस्त आहेत, असें कुणी एखाद्या देवळात उभ राहून सांगितलें, तर श्रोते त्याची वेड्यांतच गणना करतील. 'न मांसभक्षणे दोषः न मद्ये न च मैथुने। प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला।' हें आमचें जुनें जीवनसूत्र! मैथुन, मद्यपान आणि मांसभक्षण या तिन्ही गोष्टी एका मालिकेंत गोवणाराच्या डोळ्यांपुढें 'श्वानं युवानं मघवानम्' हें पाणिनीचें सूत्र उभें होतें कीं काय कुणाला ठाऊक! कदाचित् या तीन शब्दातल्या अनुप्रासाचाहि हा श्लोक रचणाराला मोह पडला असेल!

मद्यपान ही चैनीची गोष्ट आहे. ही चैन आत्मघातकी आहे ही गोष्ट सोडून द्या; पण मांसभक्षण ही कांहीं नुसती चैन नाहीं. जीवनकलहांतली अपरिहार्य गोष्ट आहे ती. आणि म्हणूनच आजच्या मानवाच्या सुसंस्कृत

बुद्धीला हिंसेविषयीं तिरस्कार वाटणें स्वाभाविक असलें तरी, आज जगांतले बहुसंख्य लोक मांस खाऊनच जगत आहेत! केवळ तात्त्विक दृष्टीनें जगाकडे पाहून सत्प्रवृत्त लोकांनीं ठरविलेले नियम पुस्तकातच कसे पडून राहतात याचें या बाबतींतलें उदाहरण ज्याला पाहायचें असेल त्यानें कोंकणच्या किनाऱ्या-लगतचीं सर्व गांवें पाहावींत—त्यांतल्या गोरगरिबांच्या चुलीपाशीं जाऊन यावें, माशाला जीव नसतो असें कांहीं या लोकांचें मत नाहीं! दुसऱ्याचा जीव घेणें ही चांगली गोष्ट नाहीं हें कळण्याइतकी त्यांची संस्कृतीशीं ओळखहि आहे; पण मासळी खायची नाहीं असें त्यांनीं ठरविलें तर या सर्व लोकांना कसाबसा मूठभर मिळणारा भातसुद्धा कोरडा खायची पाळी येईल! मांसाश-नांत जिह्वालौल्य मुळींच नसतें असें नाहीं. पण मांसभक्षण तेवढ्यामुळेंच रूढ झालें आहे आणि स्मृतिकार, भूतदयावादी सज्जन व मानवी संस्कृतीचें सवर्धन करणारे नीतिशास्त्रज्ञ यांच्या प्रयत्नांनीं तें लवकर नाहींसें होणार आहे असें मात्र नाहीं पृथ्वीच्या पाठीवरल्या सर्व लोकांना पुरेल इतका शाकाहार निर्माण करण्याचा शोध एखाद्या शास्त्रज्ञानें लावला, तरच मनुष्यप्राणी मांसाशन सोडून देण्याचा विचार गंभीरपणानें करूं लागेल.

मैथुनाचा प्रश्न तर या दोन्ही गोष्टींहून सर्वथैव भिन्न आहे. स्त्री-पुरुषांचें परस्परांविषयींचें आकर्षण, आसक्ति आणि मीलन या गोष्टी नुसत्या चैनीच्या नाहींत किंवा प्रयत्नानें टाळतां येण्याजोग्याहि नाहींत. इतकेंच नव्हे, तर या बाबतींत निवृत्ति फलदायक आहे असें मानणें हीच एक विकृति आहे. रामदास आणि विवेकानंद यांच्यासारख्या महापुरुषांच्या जीवनाला ही निवृत्ति लाभदायक झालीहि असेल; पण महापुरुषांच्या जीवनाचे नियम सामान्य माणसांच्या आयुष्याला लावून त्यांना मार्गदर्शन करणें ही मानव-तेची वंचना आहे. सूर्याच्या गतीचे नियम इतर ग्रहांना कुणी लावले आहेत का?

मनुष्य पशु नाहीं नि देवहि नाहीं. त्याचा अधःपात झाला कीं, तो पशूहूनहि वाईट वागूं लागतो नि त्याला उदात्ततेचें शिखर गाठतां आलें तर देवांनाहि असाध्य असे गुण तो प्रगट करूं शकतो हें खरें आहे. पण याचा अर्थ प्रत्येक सामान्य मनुष्य देव होऊं शकेल किंवा मानवाचा अतिमानव होणें हें त्याच्या आयुष्याचें ध्येय असलें पाहिजे, असा मुळींच होत नाहीं. अतिमानव

होण्याची निष्फळ धडपड करणाऱ्या लोकांचें आल्डस हक्स्लेनें केलेलें वर्णन वाचण्याजोगें आहे. तो म्हणतो, " In practice the vast majority even of superhumanists live inconsistently. They are one thing in Church and another out; they believe in one way and act in another; they temper spirituality with fleshliness, virtue with sin, rationality with superstition.'

हक्स्लेच्या या वर्णनाची सत्यता पटविणारीं माणसें इतिहासांतच नव्हे, तर आपल्याभोंवतीं आजकाल वावरणाऱ्या राजकारणी पुरुषांत, सार्वजनिक पुढाऱ्यांत, साहित्यिकांत, कलवंतांत, कुठेंहि हवीं तेवढीं मिळतील. त्या सर्वांच्या जीवनक्रमाचें तात्पर्य एकच आहे–मनुष्य म्हणजे नुसता आत्मा नव्हे. मनुष्य म्हणजे शरीर व आत्मा यांचें विलक्षण मिश्रण. मनुष्याचा बुद्धिविकास, त्याचा भावनाविलास आणि मानवतेनें आतांपर्यंत संपादन केलेली संस्कृति, या गोष्टी जगाला वरच्या पायरीवर नेण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यांत त्यांना आज ना उद्यां थोडेंफार यशहि येईल. पण उद्यांच्या या उज्ज्वल मानवी संस्कृतींतहि मनुष्य मनुष्यच राहील; तो देव होणार नाहीं. शरीरसुख हा त्याच्या आयुष्यांतला उपेक्षणीय भाग होईल अशी वेडेपणाची आशा कुणीहि करूं नये. खतांतून शोषून घेतलेल्या द्रव्यांतून ज्या जगांत फुलांचें पोषण होतें, तिथें शरीरधर्म आणि शरीरसुख याच्याविषयीं मनुष्यानें उदासीनता दर्शविण्यांत काय अर्थ आहे ?

आयुष्यांत धर्ममोक्षांचें जेवढें महत्त्व आहे, तेवढेंच अर्थकामांचेंहि आहे. त्यांच्यापैकीं अमुक श्रेष्ठ व अमुक कनिष्ठ हें ठरविणेंच मुळीं चुकीचें आहे. कळसावाचून देवळाला शोभा नाहीं हें जितकें खरें, तितकेंच तो कळस स्थिर राहायला त्या देवळाचा पाया मजबूत असला पाहिजे, हेंहि खरें ! पण यशस्वी जीवनाला धर्ममोक्षांइतकीच अर्थकामांची आवश्यकता आहे. इतकेंच नव्हे, तर त्यांच्याकडे शास्त्रीय दृष्टीनें पाहण्याचीहि आवश्यकता आहे, हें आपल्याला अजून पटतच नाहीं. गीतेच्या एका श्लोकाचे शंभर अर्थ लावण्याची पिढ्या न् पिढ्या धडपड करणाऱ्या आमच्या बुद्धिमत्तेला, समाजांतले खालच्या थराचे लोक शतकानुशतकें कसे जगत आले आहेत त्याची चौकशी करण्याची जशी जरूरी भासली नाहीं, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांचे संसार सुखाचे कसे होतील

याविषयींहि तिला कधीं काळजी वाटली नाहीं. पत्रिका पाहणें, हुंड्याची रक्कम मोजून घेणें आणि वधूला 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' म्हणून आशीर्वाद देणें, हाच काय तो जुन्या दृष्टीनें लग्नाचा अर्थ होता. नव्या दृष्टीनें लग्न म्हणजे प्रेम हें समीकरण मांडलें; पण त्या प्रेमाचें पृथक्करण करण्याच्या भानगडींत तीहि पडली नाहीं. आणि त्याचा परिणाम—

संसाराला फुलबाग मानून हल्लीं तरुण-तरुणी त्यांत प्रवेश करतात. पण त्यांच्यापैकीं अनेक जोडपीं लवकरच काट्यानीं पाय रक्तबंबाळ होऊन सैरावैरा धांवूं लागतात. हे काटे कुठून येतात हें त्यांच्यापैकीं कुणालाच कळत नाहीं. पण मध्यमवर्गामध्यें वैवाहिक असंतोष किती मोठ्या प्रमाणांत धुमसत आहे हे मधून मधून होणाऱ्या विचित्र विवाहामुळे लोकांच्या लक्षांत येतेंच येतें.

व्यक्तिजीवनाच्या पूर्वार्धात अर्थ व काम यांना स्वाभाविकच प्राधान्य येतें. परिस्थितीमुळे अथवा खोट्या ध्येयवादाला बळी पडून पुष्कळ माणसें या बाबतींत निसर्गाच्या प्रवाहाविरुद्ध पोहण्याचा प्रयत्न करतात. पण शेवटीं प्रवाहच त्यांना आपणाबरोबर ओढून घेऊन जातो. त्याच्या वेगांत त्यांचीं डोकीं खडकावर आपटतात नि मग त्या खोकांतून येणारें रक्त जन्मभर पुसत बसण्यापलाकडे त्यांना कांहींच करता येत नाहीं. बालविधवा असूनहि चाळिशी उलटेपर्यंत लग्न करायचें नाहीं, नि एके दिवशीं कुणाबरोबर तरी बोहल्यावर अगर रजिस्ट्रारच्या कचेरीमध्यें जाऊन उभें राहायचें, हें काय यशस्वी सांसारिक जीवनाचे लक्षण आहे ? आपल्याहून वयानें लहान असलेल्या तरुणाशीं लग्न करायचें, नि मग चिरपरिचयानें त्याला आपला वीट येईल म्हणून आपले आकर्षण टिकविण्याकरतां दोन बिऱ्हाडें करण्याची योजना आंखायची ! हें काय जीवनांतलें सुखसर्वस्व प्राप्त झाल्याचें प्रत्यंतर आहे ? 'पुरुषजात तेवढी निमकहराम अशी गर्जना करीत समाजसेवेचा विडा उचलायचा, नि शेवटीं पूर्वीचीं बायकामुलें असलेल्या एखाद्या अवलियाच्या गळ्यांत माळ घालून त्याला विडा देत बसण्यात आनंद मानायचा ! हा काय जीवनाच्या सफलतेचा पुरावा आहे ?

सध्यांच्या तरुणतरुणींच्या प्रेमजीवनांत अशा किती तरी स्पष्ट-अस्पष्ट विकृति दिसून येत आहेत. एरवीं बुद्धिवान् व कर्तबगार असलेलीं माणसें या

विकृतीच्या भोवऱ्यांत सापडलीं कीं निस्तेज व कार्यशून्य होतात असा अनुभव येत आहे.

या विकृतींच्या मुळाशीं अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं एकावर या कादंबरींत थोडासा प्रकाश टाकण्याचा मीं प्रयत्न केला आहे. पति-पत्नींच्या बौद्धिक व भावनात्मक समरसतेइतकें या कारणाला महत्त्व देण्यांत अर्थ नाहीं, असें म्हणणारे अनेक लोक निघतील. आपल्याकडे स्त्री ही अजूनहि गरीब गाय असल्यामुळें, नि असल्या नाजुक बाबतींत तोंडाला कुलूप घालणें हेंच बरें, असें पुरुषालाहि वाटत असल्यामुळें आंकडे देऊन त्यांचें तोंड बंद करणें कुणालाहि शक्य नाहीं. पण त्यांना विश्वासार्ह वाटेल असा एक उतारा इथें सादर करायला हरकत नाहीं. 'At the Institute of Family Relations, Los Angeles, where domestic difficulties are studied, it was found that out of 500 consecutive cases of unsuccessful marriage examined in 1930, all but one showed sexual mal-adjustment as a complicating factor. In what percentage this was the primary factor in the domestic upheaval and in what percentage a contributory one, it is impossible to say. Nor is this necessary. Our emotional life is too complicated to allow of our seeing clearly the part played in its pattern by every strand that enters into its composition. It is enough to know that physical mal-adjustment is almost always present when marriages come to grief.'

—'*The Physiology of Sex*,'
by Kenneth Walker.

तरुण स्त्री-पुरुषांनीं प्रेमजीवनांत शरीरसुखाचा भाग अतिशय महत्त्वाचा मानला पाहिजे, परस्परांच्या आनंदसवर्धनाकरतां आपण एकमेकांचे हात हातांत घेतले आहेत, याचा त्यांनीं स्वतःला कधींहि विसर पडूं देऊं नये, आयुष्याच्या प्रवासांतली खरीखुरी मौज असल्या सोबतींतच आहे, इत्यादि गोष्टी मीं सांगितल्या असल्या तरी, केवळ कामतृप्ति हें संसाराचे कधींच ध्येय होऊं शकत नाहीं, हें कोण नाकबूल करील? आकाशांतल्या चंद्राला हात

लावण्याच्या धडपडींत माणसाचे पृथ्वीवरले पाय सुटले तर तो तोंडघशीं पडतो, एवढेंच मला सुचवायचें आहे. तो चंद्र योग्य वेळीं अनेकांच्या हाताला लागतो, नाहीं असें नाहीं; पण त्याचा लाभ संसाराच्या सुरुवातीला होत नाहीं. दहावीस वर्षे संकटें आणि सुखें यांची चव जोडीनें घेतल्यावरच त्या चांदण्याची वृष्टि होऊं लागते. त्या दृष्टीनें उदात्त प्रीति हा शुक्लपक्षांतला चंद्र नाहीं; तो वद्य पक्षांतला आहे.

कोल्हापूर,
८-१०-४१

वि. स. खांडेकर.

## स्वैरालाप

'जळलेला मोहर' या कादंबरीचा विषय व तिचें तंत्र हीं दोन्ही चाकोरी-बाहेरचीं आहेत याची जाणीव ती लिहितांना मला पदोपदीं होत होती. म्हणून या कादंबरीला स्वतः प्रस्तावना न लिहितां ती या विषयाशीं अधिक निकट संबंध आलेल्या व आपले विचार निर्भीडपणानें बोलून दाखवायला न कचरणाऱ्या एखाद्या सद्गृहस्थाकडून घ्यावी असें मी मनांत ठरविलें होतें. साहजिकच मला डॉ० साठ्यांचें नांव सुचलें. त्यांच्यामुळेंच या कादंबरींतल्या नमूताईची व माझी ओळख झाली होती. 'खोटी लाज, खोटा ध्येयवाद, खोटं पावित्र्य, यांचीं पांघरुणं घालून प्रेमांतलीं दुःखं जगापासून लपवितां येतात; पण तीं मनाला जाळून टाकतात.' हे त्यांचे उद्गार तर मी कधींच विसरलों नव्हतों.

डॉ. साठ्यांच्या व माझ्या जेव्हां जेव्हां बैठकी होत, तेव्हां तेव्हां त्यांच्या भाषणांत दिसून येणाऱ्या सामाजिक दृष्टिकोनाचें, पुस्तकांपेक्षां माणसांचा अभ्यास करून सत्य शोधण्याच्या त्यांच्या उत्कट इच्छेचें आणि कुणाच्याहि मोठेपणानें दिपून न जातां त्यानें प्रतिपादिलेला सिद्धांत बुद्धिवादाच्या

निकषावर घांसून पाहण्याच्या त्यांच्या ईर्ष्येचें मला नेहमींच कौतुक वाटे. जगांत अस्सल दुष्टपणाइतकाच जातिवंत शहाणपणा ही चीजहि दुर्मिळ आहे. जगाच्या बाजारांत प्रत्येक प्रकारचा मूर्खपणा मात्र विपुल मिळतो. 'लग्नापूर्वी पतिपत्नी हीं दोघेंहि कवि असतात. पण लग्न झाल्यावर तीं एकमेकांचे टीकाकार बनतात,' 'स्त्रियांना छळणाऱ्या पुरुषाइतक्याच नवऱ्यांना त्राहि भगवान् करून सोडणाऱ्या बायका जन्माला आल्या आहेत. तुम्हां लेखकांना मात्र त्या कधींच दिसत नाहींत!' असलीं वाक्यें व त्यांच्या समर्थनाकरितां त्यांनीं सांगितलेल्या सत्यकथा यांच्यामुळें त्यांच्याशीं गप्पागोष्टी करतांना वेळ कसा जाई, हें माझें मलाच समजत नसे.

म्हणून 'जळलेला मोहर'च्या पहिल्या आवृत्तीचें प्रास्ताविक त्यांच्याकडून लिहून घ्यायचा मीं प्रयत्न केला. पण बहुश्रुत, रसिक व मार्मिक मनुष्याला केवळ सराव नसल्यामुळें लेखनाविषयीं अकारण एक प्रकारची भीति वाटत असते. साऱ्यांचेंहि तसेंच झालें असावें. त्या वेळीं कांही त्यांनीं माझ्या विनंतीला मान दिला नाहीं.

या कादंबरीची पहिली आवृत्ति प्रकाशित झाल्यानंतर तिच्यांतल्या नावीन्याचें जसें कांहीं लोकांकडून स्वागत झालें, तशी कांहीं वाचकांकडून तिच्यावर टीकाहि झाली. तिच्यांत अतिवास्तवता ( Surrealism ) आहे असें कुणी म्हणाले, तर कुणी खांडेकरांनीं बाचकत बाचकत या विषयाला हात घातला आहे, असे उद्गार काढले. मीं कादंबरी न लिहितां या विषयावर एक शास्त्रीय ग्रंथच लिहायला हवा होता, असें एका सद्गृहस्थांचें म्हणणें पडलें. एक दोन गुजराथी लेखकांनीं तिचा विषय व तंत्र यांविषयीं गौरवपर उद्गार काढले. पण तिचा गुजराथी अनुवाद प्रसिद्ध झाल्यावर या कादंबरीची रचना भूमिती-पद्धतीची वाटते, अशी तिच्यावर टीकाहि झाली. या नाजुक विषयाला अनेक परस्परविरोधी बाजू आहेत व त्या सर्व चित्रित न करणें अप्रामाणिकपणाचें होईल, या दृष्टीनें लेखकानें विशिष्ट रचनेचा अंगीकार केला आहे, ही गोष्ट त्या टीकाकारांच्या बहुधा लक्षांत आली नसावी. नायक-नायिकांची जागा विषयाला देण्याचा या कादंबरींत मीं प्रयत्न केला. तो यशस्वी झाला

नसेल; पण लेखकाच्या यशापयशाची मीमांसा त्यानें गृहीत धरलेल्या गोष्टी-कडे पाहून केली, तरच टीकाकार त्याच्या अंतरंगाचा खराखुरा आविष्कार करूं शकतो असें मला वाटतें.

पढिक पंडितापेक्षां सर्वसामान्य वाचक हाच कुठल्याहि कलाकृतीचा अधिक रसिक टीकाकार होऊं शकतो हा अनुभव गेल्या दोन तपांत मीं अनेकदां घेतला आहे. म्हणून दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत कादंबरीच्या वाङ्मयीन गुणावगुणांची चर्चा न करतां तिच्या विषयाचाच ऊहापोह होणें बरें असें मीं ठरविलें. या खेपेला डॉ० सान्यांकडून प्रस्तावना वसूल कराय-चीच, असा माझा निश्चय होता. त्यांनीं प्रथम बरेच आढेवेढे घेतले. पण शेवटीं पत्ररूपानें लिहिलेलें आपलें लिखाण त्यांनीं माझ्याकडे पाठवून दिलें. त्यांच्या पत्राच्या आरंभींचा खाजगी मजकूर तेवढा गाळून तें जसेंच्या तसें मी खालीं देत आहें.

३०-६-४८ वि. स. खांडेकर

## डॉ. साने यांचें पत्र

स्त्री-पुरुषसंबंधाच्या बाबतींत आपला समाज अद्यापि फाजील सोवळा आहे, असेंच मला वाटतें. नैसर्गिक वासनांचा प्रामाणिकपणानें विचार करण्याऐवजीं त्या धार्मिक पडद्याआड लपवून, आपण संस्कृतीचा विकास करीत आहों, समाजाचा गाडा मोठ्या शिकस्तीनें आवरून धरून तो खड्ड्यांत पडणार नाहीं अशी दक्षता आपण घेत आहों, असें मानणारे लोक कळत न कळत आत्मवंचना करीत असतात. पडद्याआड कांहीं झालें तरी हरकत नाहीं; पण त्या गोष्टीची उघडपणें चर्चा करतां कामा नये, असा आपल्या समा-जाचा सनातन दंडक आहे. या दंडकामुळें कामवासनेचें स्वरूप अधिक उन्नत झालें, समाजांतल्या विविध विकृतींना आळा पडला किंवा पतिपत्नींची एकमेका-

विषयींची निष्ठा वाढत गेली, असें मुळींच नाहीं. उलट या बाबतींत मोकळेपणानें बोलण्याची चोरी असल्यामुळें अर्धवट ज्ञान व संपूर्ण अज्ञान यांतून निर्माण होणारे अनेक अनर्थ पिढ्या न् पिढ्या आपल्या सामाजिक जीवनांत थैमान घालीत राहिले आहेत. आपल्या दैनंदिन जीवनांतल्या लहानसहान गोष्टींवरसुद्धां धार्मिकतेचा एवढा मोठा पगडा होता, ( अद्यापिहि आहे असेंच म्हणावें लागेल ) कीं त्यामुळें जीवन नैसर्गिक, सुखकारक आणि व्यक्ति व समाज ह्यांना उपकारक व्हावें म्हणून ज्या शास्त्रीय दृष्टीचा अवलंब करावा लागतो, ती आपल्यात कधींच विकसित झाली नाहीं. रूढींचे दास हे दुर्दैवानें आपल्याकडे सामाजिक जीवनाचे नेते मानले गेले, प्रामाणिक विचारवंताला पिढ्या न् पिढ्या नास्तिक म्हणून हिणविण्यांत आलें, बंडखोर ठरविण्यांत आलें. या सर्व गोष्टींचा परिणाम आपल्या समाजावर किती भयंकर झाला आहे, ह्याची कल्पना तुमच्यासारख्या लेखकांना करतां येणार नाहीं. घराच्या चार भिंती याच तुमच्या चार दिशा असतात. माझ्यासारख्या डॉक्टराचें तसें नाहीं. चार तासांच्या अवधींत त्याला दहा दुःखी जीवनकथा पहायला मिळतात. त्या दुःखाला कारणीभूत झालेले अज्ञान, दारिद्र्य आणि पशुत्व याचे नग्न दर्शन त्याला होतें. माझ्या सारख्या डॉक्टरपुढे दररोज माणसाचे चित्रविचित्र नवे नवे नमुने उभे राहतात. ते पाहिले कीं, आपल्या समाजातल्या अज्ञानाला, त्यांतून निर्माण झालेल्या खोट्या लज्जेला आणि शिष्टाचाराच्या व सभ्यपणाच्या नांवाखालीं असह्य कुचंबणा करून घेणाऱ्या आपल्या संस्कृतीला हंसावें कीं रडावें, हेंच अनेकदां कळेनासें होतें.

कालचीच एक गोष्ट सांगतों—काल संध्याकाळीं एक अपरिचित तरुण माझ्या दवाखान्यांत आला. तसा कांहीं तो अगदीं अडाणी नव्हता. आपल्याला थंडी वाजून ताप येत आहे असें त्यानें मला प्रथम सांगितलें. मी थर्मामीटर काढून तो त्याला खाकेंत लावायला सांगतांच स्वारी म्हणाली, 'तसा कांहीं फार ताप येत नाहीं मला. अवघड जागीं एक गळू झालंय ! त्यामुळं थंडी वाजल्यासारखी वाटते. बहुधा थोडी कसर येत असावी !' तो खोटें बोलत आहे, हें लगेच माझ्या लक्षांत आलें. बनावट साक्षीदारापेक्षांहि अधिक खोटें बोलल्यावर आढेवेढे घेत घेत आपल्याला गुप्त रोगापासून त्रास होत असल्याचें त्यानें शेवटीं कबूल केलें !

डॉक्टरकडे जाऊन त्याच्यापुढें सुद्धां आपला रोग कबूल न करण्याची ही जी वृत्ति दिसते, तिचें मूळ आपल्या हरिदासांनीं आणि पुराणिकांनीं रूढ केलेल्या आणि समाजानें आंधळेपणानें शिरोधार्य मानलेल्या सांकेतिक कल्पनांत आहे. कामविकार हा माणसाचा नंबर एकचा शत्रु आहे, हें आम्हीं हजारों वर्षें घोकीत आलों आहों. विश्वामित्रासारखे उग्र तपश्चर्या करणारे महर्षीसुद्धां मेनकेच्या एका कटाक्षानें घायाळ होऊन तिच्या पायाशीं लोळण घेतात, असें आपलीं पुराणें आणि काव्यें, आपले संत आणि साहित्यिक शतकानुशतकें समाजाला पढवीत आले आहेत. या पिढीजाद पोपटपंचीचा कामविषयक नीति सुधारण्याच्या कामीं किती उपयोग झाला असेल, तें एका परमेश्वरालाच माहीत ! या पोपटपंचीच्या मुळाशीं असलेलें तर्कशास्त्रच मोठें अजब आहे. लोहपिष्ट भक्षण करून साठ सहस्र वर्षें उग्र तपश्चर्या करणाऱ्या अलौकिक ऋषींला जो मोह टाळतां आला नाहीं, त्याच्यावर सामान्य मनुष्य सहजासहजीं मात करूं शकेल, ही कल्पना किती हास्यास्पद आहे ! पण अस्तित्वांत नसलेल्या स्वर्गसुखाच्या मागें धांवत सुटलेल्या आणि ज्या पृथ्वीवर आपणांला प्रत्येक क्षण घालवावा लागतो तिच्याकडे पाठ फिरवून कल्पनेंतल्या परलोकाकडे डोळे लावून बसलेल्या माणसांना तर्कशुद्ध विचार करतां येणार तरी कसा ? कटु सत्य आणि गोड असत्य, यांच्यामधला भेद जाणून घेण्याची त्यांना इच्छाच नसते. आत्मविकास हें मानवी जीवनाचें उच्चतम ध्येय असलें, तरी मनुष्य हा केवळ आत्मा नाहीं, तो शरीरहि आहे, शरीरधर्माकडे दुर्लक्ष करून आत्म्याच्या पाठीमागें लागणें म्हणजे तहानेलेल्या मनुष्यानें अंतराळांत विहीर खणून तिचें पाणी पिण्याची इच्छा करण्यासारखें आहे. ही गोष्ट सर्वांनींच नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे. पण 'असेल माझा हरि तर देईल खाटल्यावरी' हें ज्याचें जीवनविषयक तत्त्वज्ञान, कुठल्याहि संकटाशीं झुंज घेण्याऐवजीं तें आपलें पूर्वजन्मींचें पाप आहे, म्हणून कसायापुढें मान टाकणाऱ्या बकऱ्याप्रमाणें त्याला शरण जाण्याची तयारी करणें हा ज्याचा धर्म, त्या समाजांत एवढा विवेक कुणाला सुचणार ? या विवेकभ्रष्टतेमुळेंच माणसाला मनुष्य म्हणून जगूं देण्याइतकें विचारांचें औदार्य आपल्यापाशीं नसल्यामुळेंच, पहिल्या बाजीरावासारख्या अलौकिक पराक्रमी पुरुषाचा मोठा दुःखद अंत झाला. बाजीरावाचें मस्तानीवरलें प्रेम, ही त्या

काळांतल्या नीतिकल्पनांना न पटणारी गोष्ट होती, हें कांहीं खोटें नाहीं. पण परंपरागत नीतीच्या पलीकडे जाऊन या प्रेमाचें स्वरूप पाहण्याचा त्या काळीं एखाद्यानें तरी प्रयत्न केला असेल का? इतर देशांत ही प्रेमकथा अलौकिक आणि अद्भुतरम्य अशा काव्याचा विषय म्हणून गौरविली गेली असती. पण आपले त्या काळचे कवी रामकृष्णांच्या लीला वर्णन करण्यांत आणि 'जनीं निंद्य ते सर्व सोडून द्यावें' या उपदेशाचे घुटके लोकांना पाजण्यांत गुंग होऊन गेले होते. त्यांना या प्रेमकथेंतली उत्कटता, वास्तवता आणि भव्यता कुठून प्रतीत होणार? जिथें समाजांतलें कविमनच असें रूढि-ग्रस्त असतें आणि ठराविक चाकोरींतून फिरत राहतें, तिथे बिचाऱ्या जन-मनाला दोष लावण्यांत काय अर्थ आहे?

पहिल्या बाजीरावाची बायको नेहमीं आजारी असे, अशा स्थितींत मस्तानी-सारखी लावण्यवती त्याच्या पराक्रमावर लुब्ध होऊन त्याच्या गळ्यांत पडली. मराठेशाहीच्या सीमा भरतीच्या लाटांप्रमाणें पुढें पुढे लोटीत नेणारा, निजामाला हां हां म्हणतां खडे चारणारा, नादिरशहासारख्या आग्या-वेताळाला आपल्या शौर्यानें दहशत बसविणारा, असा हा पराक्रमी पुरुष स्त्री-प्रेमासाठीं भुकेला असावा, यांत अस्वाभाविक असें काय होते? राज्याचा भरिभार वाहून श्रांत झालेलें त्याचें मस्तक प्रेयसीच्या बाहुपाशांत विसाव्याची अपेक्षा करीत होतें. तो कितीहि शूर असला, मुत्सद्दी असला, देशभक्त असला, तरी शेवटीं मनुष्यच होता! नेमकें याच गोष्टीकडे त्या काळांत कुणी लक्ष दिलें नाहीं. तें देणें कुणाला शक्यच नव्हतें. आपलें व्यक्तिजीवन अंध धर्मकल्पनांनीं आणि रूढ नीतिनियमांनीं इतकें करकचून बांधलेलें होते कीं बाजीराव आणि मस्तानी यांच्या प्रीतीकडे सहानुभूतीनें पाहणें हें त्या वेळच्या समाजांत निःसंशय मोठें पाप ठरलें असतें.

पण त्याच काळांतलीं इतर देशांतली माणसें स्त्री-पुरुषसंबंधाकडे, कामतृप्ति ही जीवनांतली आवश्यक गोष्ट आहे, या तत्त्वाकडे, न बुजतां, न बाचकतां, कशीं पाहत होतीं, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. तुम्हांला पत्र लिहीत असतांना माझ्यापाशीं बेंजामिन फ्रॅंकलिनचें आत्मचरित्र पडलें आहे. या पुस्तकांत आत्मवृत्ताबरोबर त्याचे कांहीं लेखहि दिले आहेत. पुण्यांतले ब्राह्मण मस्तानी-प्रकरणीं पहिल्या बाजीरावाला वाळींत टाकण्याचा

ज्या वेळीं प्रयत्न करीत होते, त्याच वेळीं बेंजामिन फ्रॅंकलिन हा एक प्रसिद्ध अमेरिकन पुरुष आपल्या लेखनाच्या द्वारें लोकांपुढें कोणते विचार मांडीत होता, हे पाहिलें म्हणजे त्यांतला विरोध मनाला बोंचल्याशिवाय राहत नाहीं. फ्रॅंकलिनने एका तरुण मनुष्याला उपदेश म्हणून १७४५ मध्यें एक पत्र लिहिलें आहे. त्या पत्रांतला मुख्य मजकूर असा आहे—

'प्रिय मित्रा, तूं आपल्या मनाच्या अनावर वृत्तींचें जें वर्णन केलें आहेस, तिच्यावर जगांत फक्त एकच औषध आहे. तें म्हणजे लग्न ! विवाह केल्यानेच तुला खऱ्याखुऱ्या सुखाचा लाभ होईल. आज तें लग्न न करण्याचीं तूं जीं कारणे सांगत आहेस, तीं मला तर्री पटत नाहींत. पुरुष निसर्गतः अपूर्ण आहे, हे कधींहि विसरूं नकोस ! त्याच्या जीवनाला स्त्री पूर्णता आणते. तिची मृदुता, व्यावहारिकता आणि सौंदर्य-दृष्टि त्याच्या आयुष्यांत गोडवा निर्माण करते. स्त्रीचे जीवनहि पुरुषा-वांचून असेंच अपुरें आणि ओकें ओकें होतें. पुरुषाची पराक्रमाची शक्ति आणि विवेकबुद्धि तिच्या जीवनाला पूर्णता आणते. म्हणूनच तुझ्यासारखा अविवाहित तरुण हा एका दृष्टीनें अर्धवट मनुष्य आहे, असें मला वाटतें. कात्रीच्या एका पात्यासारखी तुझी स्थिति आहे.'

फ्रॅंकलिनचें इथपर्यंतचे हें पत्र आपल्याकडल्या सनातनी लोकांनासुद्धां आवडेल. पण त्यानें पुढें जो मजकूर लिहिला आहे तो ऐकल्यावर मात्र ते 'अब्रह्मण्यम्' म्हणून कानावर हात ठेवतील ! फ्रॅंकलीन पुढें म्हणतो—

'पण लग्न करण्याचा माझा हा सल्ला तुला पटत नसेल, लग्न न करतांच तुला रहायचें असेल, तर माझ्या एका सूचनेचा अवश्य विचार कर. ती म्हणजे स्त्रीसुख मिळवितांना तरुणीपेक्षां प्रौढ स्त्रियाच तूं पसंत करीत जा. तुला माझा हा सल्ला प्रथमदर्शनीं मोठा विचित्र वाटेल. पण

तो पूर्ण विचारांतीं मी देत आहें. प्रौढ स्त्रियांना व्यवहारज्ञान अधिक असतें. जगाच्या अनुभवानें त्यांचीं मनें समृद्ध झालेलीं असतात. त्यामुळें त्यांच्या संभाषणांत चातुर्य आणि मोहकता अधिक आढळते. उलट तरुण स्त्रियांना आपल्या रूपाचा मोठा अभिमान असतो. या गर्विष्ठ-पणामुळेच त्या बेपर्वाईनें वागतात. आपल्यापाशीं सौंदर्याचा हुकमी पत्ता नाहीं, हें प्रौढ स्त्रीला कळत असतें. त्यामुळें सौंदर्याची उणीव ती सौजन्यानें भरून काढते. आजारीपणांत तिच्याइतक्या प्रेमळपणाने दुसरी कोणतीच स्त्री रोग्याची शुश्रूषा करूं शकणार नाहीं. स्त्री जितकी वयानें अधिक मोठी, तितकी ती स्वभावानें अधिक चांगली, असा सर्वसामान्य सिद्धांत सांगितला तर तो कांहीं सर्वस्वीं चुकीचा ठरणार नाहीं! अशा स्त्रियांशीं मैत्री करण्यांत फारसे पापहि नसतें. कुमा-रिकेला आपल्या प्रेमपाशांत गुंतविल्यानें एखादे वेळीं तिच्या आयु-ष्याचा सत्यानाश होण्याचा संभव असतो. कदाचित् तिला सारा जन्म रडत आणि कुढत काढावा लागेल, अशी परिस्थिति एखादे वेळीं उत्पन्न होते. तसल्या संबंधामुळें आपल्या मनांत पश्चात्तापाचीं शल्यें सलत राहतात. प्रौढ स्त्रीच्या बाबतींत असें कधींच होत नाहीं. उलट तिची कृतज्ञताच आपल्या पदरीं पडते.'

फ्रॅंकलिननें एका तरुणाला केलेल्या उपदेशातला अधिक सभ्यपणाचा असा भाग मी इथें उद्धृत केला आहे. विवाहबाह्य संबंधाच्या बाबतींत तरुणी-पेक्षां प्रौढ स्त्रियाच अधिक सुखप्रद कां होतात, याचीं त्यानें जीं आणखी दोन-तीन कारणें दिलीं आहेत, त्यांचा या पत्रांत उल्लेख करण्याचीसुद्धां मला छाती होत नाहीं. मीं तीं नुसतीं सूचित केलीं तरी सारीं संस्कृतिसंरक्षक मंडळें माझ्यावर हिरीरीनें तुटून पडतील. कृष्णराव मराठे गुंड कायद्याखालीं मला पकडावें, म्हणून सरकारच्या मागें लागतील. एवढेंच नव्हे तर स्वतःला पुरोगामी म्हणविणारीं अनेक माणसेंहि कानांत बोटें घालून आपल्या भुंवया वर चढवितील.

याचा अर्थ फ्रॅंकलिन हा एक चावट मनुष्य होता, असा मात्र मुळींच नाहीं.

तो व्यवहाराकडे वास्तव दृष्टीनें पाहतो. पदोपदीं प्रत्येक गोष्टीला काव्याचा मुलामा देणें त्याला पसंत नाहीं. निसर्गावर पांघरूण घालून किंवा त्याची शाब्दिक उपेक्षा करून कुणी त्याच्या पाशांतून मुक्त होत नाहीं. उलट नैसर्गिक गोष्टी वेळीं अवेळीं चोरून ठेवल्यामुळें त्यांना रहस्यांचें स्वरूप प्राप्त होतें. आणि रहस्याविषयीं आकर्षण वाटणें हा तर मनुष्याचा स्वाभाविक धर्मच आहे. जीवनांत कामवासनेचें स्तोम माजविणें जितकें चुकीचें आहे, तितकेंच तिला क्षुद्र किंवा ओंगळ लेखणेंहि चुकीचें आहे. ही दुसरी चूक भारतीय समाज गेलीं दोन हजार वर्षे करीत आला आहे. निवृत्तीचा पगडा सर्वसामान्य समाज-मनावर कधींच बसणें शक्य नसतें. पण त्याला वैराग्याचें सोंग मात्र आणतां येते. तसाच काहींसा प्रकार या बाबतींत झाला आहे. ऐतिहासिक काळांत राजे लोक सुंदर स्त्रियांसाठीं लढाया करीत होते, पळवून आणलेल्या बायकांचे जनानखाने बाळगीत होते! सामान्य लोक सामान्य व्यभिचार करीत होते. स्त्रीच्या पायीं इतिहासाचा प्रवाह बदल्याचे दाखले तुम्हांला हवे तेवढे मिळतील. पण असें असूनहि स्त्री-पुरुषसंबंध हा मानवी जीवनांतला एक आवश्यक आणि विचारणीय भाग आहे, असें म्हणायची मात्र आपल्याकडे कुणाचीच तयारी नव्हती.

या बाबतींत आपलें प्राचीन साहित्य अधिक प्रामाणिक आहे, असें म्हणतां येईल. जातां जातां महाभारतांतलें एक उदाहरण आठवलें. तेंच इथें देतों. **अर्जुनानें धर्म व द्रौपदी ह्यांना चुकून एकांतांत पाहिलें. या नियमभंगाचें प्रायश्चित्त म्हणून अर्जुनाला पुढें तेरा वर्षे तीर्थयात्रा करावी लागली. एखाद्या आधुनिक लेखकाला अर्जुनाच्या या तीर्थयात्रेचें वर्णन करायचें असतें तर या प्रायश्चित्ताच्या काळांत तो किती विरक्त वृत्तीनें वागत होता, ईश्वरचिंतना-शिवाय त्याला दुसरें कांहींहि कसें सुचत आणि रुचत नव्हतें, इत्यादिकां-विषयीं त्यानें गोड गोड थापा मारल्या असत्या. पण महाभारतकाराला असला लपंडाव संमत नव्हता. या तीर्थयात्रेंतलीं अर्जुनाचीं अनेक प्रेमप्रकरणें त्यानें सविस्तर वर्णन केलीं आहेत. अर्जुनाच्या ह्या प्रणयिनींपैकीं उलूपीचें महाभारतांतलें वर्णन स्त्री-पुरुषाच्या प्रेमसंबंधाकडे पाहण्याच्या आपल्या काव्यमय परंतु कृत्रिम पद्धतीवर पूर्ण प्रकाश टाकणारें असल्यामुळें तें मुद्दाम जसेंच्या तसें पुढें देत आहें.—**

**वैशंपायन सांगतात**—राजा, कुरुकुलाला कीर्तीस चढविणारा तो महाबाहु अर्जुन वनांत जाऊं लागला असतां विद्वान्, वेदवेदांगवेत्ते व ब्रह्मचिंतन करणारे ब्राह्मण, भिक्षुक, भगवद्भक्त, सूत, पुराणिक, मधुरवाणीनें देवादिकांचीं आख्यानें गाऊन दाखविणारे कथेकरी, उर्ध्वरेते ब्रह्मचारी, सन्यासी, वगैरे श्रमणसंज्ञक वनौकस हे सर्व व दुसरे कित्येक मृदुभाषी अनुचर बरोबर असल्यानें, मरुद्गणांनीं परिवेष्टित अशा इंद्राप्रमाणें तो शोभूं लागला. मार्गांत त्यानें कित्येक रमणीय, विचित्र वनें, सरोवरें, नद्या व समुद्र, देश व पवित्र तीर्थें पाहिलीं. नंतर त्यानें गंगाद्वारीं वास्तव्य केलें. राजा, त्या स्थळीं त्या पांडवश्रेष्ठानें जें अद्भुत कर्म केलें, ते ऐक. तो तेथें असतां त्याचे आश्रयावर सर्व ब्राह्मणांनीं अनेक ठिकाणीं अग्निहोत्रें आरंभिलीं, त्याकरिता सर्व तीरावर जागजागीं कुंडें बांधलीं होतीं. आणि जितेंद्रिय व सत्यनिष्ठ ब्राह्मणांनीं स्नानसंध्या करून अग्निप्रबोधन केल्यामुळें त्यांतील अग्नि धडाडले होते. ब्राह्मण हे मंत्रघोषपूर्वक आंत आहुती देत होते व होमांतीं अग्नीची पुष्पांनीं पूजा करीत बसले होते. अशा समयीं त्या गंगाद्वाराचा देखावा कांहीं अवर्णनीयच दिसत होता. याप्रमाणें वेदींनीं व ब्राह्मणांनीं तें स्थान गजबजून गेलें असतां एके दिवशीं अर्जुन स्नानार्थ गंगेत उतरला; व स्नान आणि पितृतर्पण करून अग्निकार्य करण्याच्या हेतूनें तो गंगेतून बाहेर पडणार, तों त्याचें रूप पाहून मदनार्त झालेल्या उलूपी नामक नागकन्येनें त्याला एकाएकीं पाण्यांत ओढून पाताळांत नेलें. सुदैवानें तेथें कौरव्यनामक नागाचे घरीं उत्कृष्ट रीतीनें पूजिलेला अग्नि आयताच त्याला आढळला. तेव्हां त्या अग्नींतच अर्जुनानें निःशंकपणें आहुति देऊन आपलें अग्निकार्य संपादिलें; आणि त्यायोगानें हुताशन संतुष्ट झाला. नंतर अग्निकार्य उरकल्यावर त्या उलूपीकडे वळून व गालांतल्या गालांत हंसून तो तिला म्हणाला, 'हे कल्याणि, हें तूं कां साहस केलेंस ? हे सुभगे, हा देश कोणाचा ? तूं कोण व कोणाची कन्या ? सुंदरी, हें सर्व मला सांग.'

**उलूपी म्हणाली**—ऐरावत कुलांत उत्पन्न झालेला कौरव्य नांवाचा नाग आहे, त्याची मी कन्या. माझें नांव उलूपी. तूं स्नाना-

करितां गंगेंत उतरला असतां तुला पाहतांच मी मदनाकुल झालें. हे निष्पापा, मला अद्यापि दुसऱ्या पुरुषाचा स्पर्श नाहीं, व तुझ्यापायीं हा मदन मला पीडा देत आहे! तर तूं आपला देह माझे कामीं लावून मला आज संतुष्ट कर.

. **अर्जुनानें उत्तर दिलें**—हे कल्याणि, तूं म्हणतेस तें नीट आहे; परंतु मी स्वतंत्र नाहीं; मी धर्मराजाच्या आधीन असून त्यानें बारा वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य पाळण्याची मला आज्ञा केली आहे. हे जलचारिणी नागकन्ये, खरें पुसशील तर तुझ्यासारख्या सुंदरीला संतुष्ट करण्याला मी तयार आहें. परंतु मी धर्माज्ञा स्वीकारून चुकलों आहें व ती मला मोडतां येत नाहीं. कारण, मी आजपर्यंत कोणत्याहि कारणास्तव अनृत बोललों नाहीं. तस्मात्, हे नागकन्ये, तुझी इच्छा तर पूर्ण व्हावी, आणि मजवर खोटेपणा येऊन माझी धर्महानि होऊं नये, अशी कांहीं तरी तोड काढ!

**उलूपी म्हणाली**—हे पांडुपुत्रा, तूं पृथ्वीपर्यटन कां करीत आहेस, वडील भावानें तुझे गळ्यांत ब्रह्मचर्य कां बांधलें, तें सर्व मी जाणतें. द्रौपदीशीं एक बंधू एकांतांत असतां चुकूनसुद्धां दुसरा तेथें प्रवेश करील, तर त्याने बारा वर्षें वनांत ब्रह्मचर्यानें काढावीं, असा तुमचा परस्पर करार आहे. परंतु हें ब्रह्मचर्य केवळ द्रौपदीसबंधानें होय. कारण तिच्याकडे अकालीं दृष्टि टाकल्याबद्दल बारा वर्षेंपर्यंत तिचा उपभोग अपराधकर्त्यास मिळूं नये, हा या कराराचा तात्पर्यार्थ आहे. तस्मात्, या ब्रह्मचर्याचें पालन द्रौपदीपुरतेंच आहे. इतर स्त्रियां-सबंधानें नाहीं हें उघड दिसतें. यासाठीं माझे अंगीकारानें तुझा व्रत-भंग होत नाहीं, हें सिद्ध झालें. शिवाय, हे कमलनयना अर्जुना, मी अगदीं मदनार्त झालें आहें, आणि आर्तांचें परित्राण करणें हा राजधर्मच आहे. तेव्हां या दृष्टीनें पहातां मदनपीडेपासून माझें त्वां संरक्षण केल्यानें तुजकडे अधर्म येत नाहीं. बा अर्जुना, या कृतीनें थोडा तरी धर्माला बाध येईल असेंहि तुला वाटत असलें तरी मी तुला सांगतें कीं, तेवढा दोष माझे मनोगत पूर्ण करून मला जिवंत राख-ल्याच्या पुण्यानें निवृत्त होईल. पार्था, तुझ्या ठिकाणीं माझी अनन्य

भक्ति आहे; व भक्ताची उपेक्षा करूं नये असें सज्जनांचें मत आहे. यास्तव, पार्था तूं या दासीचा अंगीकार कर. असें न करशील तर मी खचीत वांचणार नाहीं! हे महाबाहो, दीन, अनाथ अशांचें तूं सदासर्वदा संरक्षण करतोस, असा तुझा लौकिक आहे. मग मजपुरतांच तूं इतकी ओढाताण कां मांडिली आहेस? अरे, माझे प्राण रक्षण करून प्राणदान दिल्यानें अनुपम पुण्य तूं गाठीं बांध. हे पुरुषोत्तमा, मी तुला आज शरण आलें असून, मदनपीडेनें गांजून गेल्यामुळें धाय मोकलून रडत आहें, इकडे लक्ष दे. मी काय करूं? तूं दृष्टीस पडतांच माझ्या शरीरांत या मदनानें जसा कांहीं पेट घेतला आहे; आणि म्हणूनच मी इतक्या तुझ्या विनवण्या करीत आहें! तस्मात् कृपाळू होऊन तूं आपला देह मला वाहून माझ्या मनासारखें कर!

**वैशंपायन सांगतात**—याप्रमाणें त्या नागकन्येनें गळ घातली, तेव्हां तिचें म्हणणें धर्माला धरूनच आहे असें पाहून तो प्रतापी अर्जुन त्या रात्रीं तिचेच महालांत राहून तिच्या इच्छेप्रमाणें वागाला; व सूर्योदय होतांच तेथून उठून पुन्हां गंगाद्वारीं आला. मग त्याला तेथें सोडून ती साध्वी उलूपी आपल्या घरीं गेली. जाण्यापूर्वी, 'तूं जलांत सर्वत्र विजयी होऊन, सर्व जलचर तुला वश राहतील!' असा तिनें अर्जुनास वर दिला.

उलूपीची ही शृंगाररसपरिप्लुत कथा आमच्या हिंदी चित्रपटनिर्मात्यानीं अजून पडद्यावर कशी आणली नाहीं, याचें मला राहून राहून नवल वाटतें. अर्घ्यदान करण्याकरितां पाण्यांत उभा राहिलेल्या अर्जुनाला एक लावण्यवती नागकन्या ओढून पातळांत नेते! चित्रणाच्या दृष्टीनें केवढा कलात्मक प्रसंग आहे हा! फोटोग्राफीच्या दृष्टीनें Bathing Beauty वर असलें चित्र सहज ताण करूं शकेल! पातळांतले भव्य देखावे, तीं तिथलीं रत्नखचित सुंदर मंदिरें, शेंकडों अर्धावृत नागकन्यांची आकर्षक नृत्यें, वगैरे मालमसाला या कथेंत भरपूर घालतां येण्याजोगा आहे. पहा बुवा हे कथानक

कुठें खपतेंय का ? तें खपलें तर पडद्यावर माझें नांव तरी चमकेल—' मूळ कल्पना-डा. साने.'

मी मात्र या कथेकडे नेहमींच निराळ्या दृष्टीनें पाहत आलों आहें. रामायण-काळीं आर्य लोक या देशांत स्थिर झाले नव्हते. स्थैर्य प्राप्त करून घेण्याच्या धडपडींत असलेला समाज साहजिकच आदर्शवादी बनतो. प्रत्येक भावनेचें उज्ज्वल स्वरूप त्याला आकृष्ट करतें. रामायणांत महाकवि वाल्मीकीनें अशा आदर्शांचीं चित्रें रेखाटलीं आहेत. पित्याच्या हातून वचनभंग होऊं नये म्हणून चौदा वर्षें वनवास स्वीकारणारा राम, सिंहासनावर बसण्याची सोन्या-सारखी संधी प्राप्त झाली असतांना संन्यस्त वृत्तीनें रामाच्या पादुकांची पूजा करीत राहणारा भरत, पत्नीप्रेमाकडे पाठ फिरवून भावाच्या सेवेकरितां अरण्य-वासाचे कष्ट हंसतमुखानें स्वीकारणारा लक्ष्मण, लोकानुरंजनाकरितां प्राणाहूनहि प्रिय असलेल्या पत्नीचा त्याग करणारा राजा—गूहकापासून मारुतीपर्यंत आदिकवीनें निर्माण केलेलीं सर्व लहानमोठीं स्वभावचित्रें पाहिलीं म्हणजे तीं ध्येयवादित्वांतून निर्माण झालीं आहेत, मनुष्य कसा आहे हें सांगण्यापेक्षां तो कसा असावा, याचें चित्रण करण्याची प्रेरणा कविमनावर अधिक प्रभाव गाजवीत आहे, हें उघड दिसून येतें. यामुळें आदर्शांचें सौंदर्य रामायणांत विपुल असले तरी वास्तवाच्या विविध छटा, मनुष्यस्वभावाचे अगणित पैलू, जीवनाचे सारे कानेकोपरे त्यात कवीनें रंगविलेले आपल्याला आढळून येत नाहींत. त्यांचें खरेंखुरे दर्शन आपल्याला महाभारतांतच होतें. वाल्मीकीची सृष्टि दैवी आहे. व्यासाची मानवी आहे. महाभारत हा पांचवा वेद मानण्याचा प्रघात पडला तो कांहीं उगीच नाहीं! व्यासांच्या काळीं आर्य समाज सुस्थिर झाला होता. त्यामुळें मनुष्यस्वभावांतल्या चिरंतन गुणावगुणांचा, विविध वासनाभावनांचा आणि नैसर्गिक व सामाजिक संघर्षांचा जितका वास्तव तितकाच मार्मिक आविष्कार महाभारतांत प्रकट झाला आहे. 'सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीसुद्धां मी पांडवांना देणार नाहीं' असें म्हणणारा अहंकारी दुर्योधन, पतिव्रता असूनहि, क्षणभर का होईना, कर्णाविषयीं मनांत अभिलाषा बाळगणारी द्रौपदी—

जाऊं दे! डॉक्टरी चालत नसल्यामुळें मी हल्लीं पुराणसंशोधक झालों आहे, असा कदाचित् तुमचा या लिखाणावरून ग्रह व्हावयाचा! आतां

एखाद्या अक्षरें उडून गेलेल्या शिलालेखाचें चरित्र सुरू होईल, या भीतीनें तुम्ही माझें पत्र कदाचित् वाचणारहि नाहीं. म्हणून हें पुराण प्रकरण इथेंच संपवितों.

माझा मुख्य मुद्दा उलूपीच्या कथेवरून प्राचीन काळांतल्या स्त्री-पुरुष-संबंधावर पडणारा प्रकाश हा आहे. चुकून हातून झालेल्या नियमभंगाचें प्रायश्चित्त घेण्याकरितां अर्जुन तीर्थाटनाला निघालेला असतो. हीं बारा वर्षें आपण संन्यस्त वृत्तीनें काढलीं पाहिजेत, याची पुरेपूर जाणीव त्याला आहे. पण उलूपीसारखी नागकन्या आपल्यावर फिदा झाली आहे असें पाहतांच या व्रतस्थ वीराचें मन डळमळूं लागतें. तो उलूपीला म्हणतो, 'धर्मराजाची आज्ञा पाळणें हें माझें कर्तव्य असून त्यानें बारा वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य पाळण्याविषयीं मला सांगितलें आहे. पण खरें विचारशील तर तुझ्यासारख्या सुंदरीला संतुष्ट करण्यास मी तयार आहे.' अर्जुनाच्या वैराग्याचा हा तकलुपीपणा पाहून त्याच्या मनाची रुखरुख घालविण्याकरितां उलूपी जो युक्तिवाद करते, तोहि मोठा मजेदार आहे. ती म्हणते, 'मी अगदीं मदनार्त झालें आहें आणि आर्तांचें परित्राण करणे हा राजधर्मच आहे. पार्था, तुझ्या ठिकाणीं माझी अनन्य भक्ति आहे व कुणीहि भक्ताची उपेक्षा करूं नये, असें सज्जनांचें मत आहे. तूं या दासीचा अंगीकार केला नाहींस तर मी खचित वांचणार नाहीं. माझें प्राणरक्षण करण्याकरितां तरी माझ्या मनासारखें कर!' तिचा हा सारा कोटिक्रम पाहून आधुनिक काळीं ही नागकन्या जन्माला आली असती, तर ती उत्तम फौजदारी वकील झाली असती असें वाटल्यावाचून राहत नाहीं. अर्जुनाचें मन ताब्यात असते तर असल्या शाब्दिक कोटिक्रमानें फसून त्यानें उलूपीचा कधींच स्वीकार केला नसता. पण त्यानें तिला होकार दिला तो तिच्या शब्दांच्या जाळ्यांत सांपडून नाहीं; तर सौंदर्याच्या जाळ्यांत सांपडून! तो पडत्या फळाच्या आज्ञेची वाटच पाहत बसला होता! उलूपीचें हें भाषण ऐकतांच तें धर्माला धरून आहे अशी त्याची खात्री झाली व तो रात्रीं तिच्या महालांत राहिला. या प्रकरणाचा समारोप करतांना मदनबाधेनें व्याकुळ होऊन अर्जुनाच्या गळ्यांत पडणाऱ्या उलूपीला साध्वी हें विशेषण वैशंपायनानें लावलें आहे, ही गोष्टहि तुम्ही विसरूं नका.

इतक्या विस्तारानें मी या कथेचा ऊहापोह करीत आहें, याचें कारण एकच

आहे. तें म्हणजे जीवनाकडे—विशेषतः सामान्य मनुष्याच्या जीवनाकडे—आणि आदर्शापेक्षां वास्तवाच्या दृष्टीनें पाहणें आवश्यक आहे, हें होय. हीं आवश्यकता आपल्या भारतीय संस्कृतीनें कधींच लक्षांत घतली नाहीं. आदर्श हा आकाशांतला चंद्र असतो, त्याचा प्रकाश पृथ्वीला मोहक रूप देतो, पण तो चंद्र पृथ्वीवरल्या माणसांच्या हातांत कधींच येत नाहीं, याचें तिला विस्मरण झालें. समाजांत आदर्श अवश्य असावे लागतात. ते नसले तरी कवींनीं व संतांनीं, सुधारकांनीं आणि समाजनेत्यांनीं ते जनमनापुढें निर्माण करून ठेवायचे असतात. पण त्याच वेळीं आदर्शांचा उपयोग सामान्य मनुष्याच्या मनावर सुसंस्कार करण्यापुरताच होतो, हेंहि त्यांनीं लक्षांत ठेवले पाहिजे. पण आम्हीं इहलोकापेक्षां परलोकाकडे दृष्टि देऊन शतकानुशतकें काढलीं. प्रवृत्तीच्या उन्हांत धांवण्यापेक्षां निवृत्तीच्या छायेंत स्वस्थ बसण्यांत जीवनाचें साफल्य आहे, अशी आम्ही आमची खोटी समजूत करून घेतली. जीवनाविषयींच्या या एकांगी तत्त्वज्ञानाचीं कटु फळें आज आपण प्रत्येक क्षेत्रांत चाखीत आहोंत. काळाबरोबर धावण्याचें सामर्थ्य आम्हीं कधींच संपादन केलें नाहीं. 'थांबला तो संपला!' या उक्तीचा विचार करण्याऐवजीं 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' याचा काथ्याकूट करण्यात आम्हीं आमची बुद्धि शिणवली. जुनीं ध्येयें आम्हीं कधीं प्रामाणिकपणें आचरणांत आणलीं नाहींत; मात्र ढोंगीपणानें त्यांची पूजा करण्यांत आमचा सारा जन्म गेला. दुटप्पी आणि दुबळ्या मनुष्याला आपल्या ढोंगाचें आणि दुबळेपणाचें स्तोम माजवावेंसें वाटूं लागतें. आपल्या समाजाचेंहि तसेंच झालें आहे. न पाळलें जाणारें पावित्र्य, आचरणांत न उतरणारीं नीतिमूल्यें, निसर्गाशीं व प्रचलित जीवनक्रमाशीं सुसंगत नसलेलीं ध्येयें, यांचा अंत्र बडिवार माजविण्यांत अजूनहि आम्हाला मोठा आनंद होतो! आमचा दैनंदिन आयुष्यक्रम व आमचे जीवनविषयक तत्त्वज्ञान यांचा जवळ जवळ कांहीं संबंधच उरलेला नाहीं!

बंगालच्या काळ्या दुष्काळांत लाखों लोकांच्या राक्षसी हत्येला कारणीभूत झालेले लोभी नराधम दररोज देवपूजा करीत होते, घरांतल्या प्रत्येक मंगल कार्याला धर्मशास्त्राप्रमाणें मुहूर्त पाहत होते, भटभिक्षुकांना दानधर्म करीत होते, नियमानें गीता पाठ करीत होते, स्वर्गात इंद्राच्या दरबारांत आपल्यासाठीं पहिल्या रांगेंत खास खुर्ची राखण्यांत आली आहे, अशा खात्रीनें

स्मशानकळा आलेल्या शहरांत स्वतःपुरतें नंदनवन निर्माण करीत होते. भाताच्या चार शितांसाठीं टाहो फोडणाऱ्या निष्पाप अर्भकांच्या केविलवाण्या किंकाळ्यांनीं त्यांची झोंप कधीं उडाली नाहीं. पोटांतली आग विझविण्या-करिता रुपया दोन रुपयांसाठीं आपलें प्राणाहून प्रिय असलेलें शील विकावें लागणाऱ्या अल्लड खेडवळ तरुणींच्या हृदयविदारक वेदना पाहून त्यांचीं निर्घृण मनें कधीं अस्वस्थ झालीं नाहींत. कलकत्त्यांतल्या रस्त्यात कुजत पडलेल्या प्रेतांच्या दुर्गंधीचा त्यांच्या नाजूक नाकांना कधींच त्रास झाला नाहीं. तो होणार तरी कसा? त्यांच्या बड्या बंगल्याभोंवतालच्या बागांत सुगंधी फुलांचे ताटवे फुलत होते, त्यांच्या कपाटांतल्या सुंदर सुंदर बाटल्यां-तून निरनिराळ्या अत्तरांचे मधुर गंध घरभर दरवळत होते. आपल्या हजारों दुर्दैवी देशबांधवांचीं प्रेतें कोल्हीं-कुत्रीं फाडीत आहेत, अनेक बालकांचे प्राण पुरे जाण्यापूर्वीच त्यांचे डोळे गिधाडे फोडीत आहेत, हें भयानक दृश्य त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहून त्याना कधींच भेवडावूं शकलें नाहीं. त्यांच्या डोळ्यांपुढें क्षणोक्षणीं जार्जेटच्या तलम साड्या नेसलेल्या आणि विविध रीतीनें नटलेल्या त्यांच्या नाजुकसाजुक ललना गुंजारव करीत होत्या, त्यांच्या मालकीच्या ऐटबाज 'मर्क्युरी' आणि 'ओपेल' गाड्या त्यांच्या सेवेला क्षणोक्षणीं हजर होत होत्या. दुपारीं भोजनाच्या वेळीं दारात उभे राहून कुणी अतिथि येत आहे कीं काय हें पहावे, तसा कोणी आल्यास त्याला आदरानें आपल्या पंक्तीला घेऊन मग गृहस्थानें जेवण करावें हा ज्या संस्कृतींतला दंडक, त्याच संस्कृतींत जन्माला आलेल्या विसाव्या शतकांतल्या सुशिक्षित आणि सुसंपन्न माणसानीं आपल्यासमोर हजारों निरपराधी माणसें तडफडत, टांचा घाशीत मृत्युमुखीं पडताना पाहिलीं. असे होण्याचें एक प्रमुख कारण आपला परंपरा-गत जीवनविषयक दृष्टिकोन हें आहे.

हा दृष्टिकोन सर्वच बाबतींत दुबळा, आंधळा आणि म्हणून दैववादी झाला आहे. वास्तववादाकडे सोयीस्कर रीतीनें पाठ फिरविण्यात, जें उग्र आहे तें उघड्या डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां डोळे झांकून घेऊन तें सौम्य आहे अशी आत्मवंचना करून घेण्यांत, जे कटु आहे ते धैर्यानें चाखण्यापेक्षां ते न चाख-ण्यात धैर्य आहे असे मानण्यांत, जें नैसर्गिक आहे त्याचा प्रामाणिकपणानें स्वीकार करण्यापेक्षां त्याची निंदा करून आपलें अज्ञान आणि अतृप्ति

लपविण्यांत किंवा गुप्तपणानें त्याच्या उपभोगाचा आनंद चाखून ढोंगीपणानें जगण्यात, आपल्या समाजाला अजूनहि समाधान वाटतें! या ढोंगीपणाला तुमच्यासारख्या कवींनीं आणि लेखकांनीं फार मोठा हातभार लावला आहे असें माझें मत आहे. उदाहरण म्हणून पुन्हां एका पौराणिक कथेचा उल्लेख करतों. हें वाचून माझ्या अंगांत आज पुराणिक संचारला आहे किंवा काय असें मनातल्या मनांत म्हणत तुम्ही मला हंसाल. या कथेसारख्या ऐतिहासिक किंवा सामाजिक अनेक गोष्टी मला सांगतां येतील, नाहीं असें नाहीं; पण या कथेशीं तुमचाहि संबंध येत असल्यामुळे मी तिचा मुद्दाम उल्लेख करीत आहें.

सुभद्राहरणाच्या कथेवर जुन्या कवींनीं लिहिलेलीं आख्यानें आपण सोडून देऊं. पण किर्लोस्करांच्या ‘ सौभद्र ’ नाटकापासून तुमच्या ‘ सुभद्रा ’ चित्रपटापर्यंत सर्व लेखकांनीं या कथाभागाला मधुर प्रणयरम्यतेचा मुलामा दिला आहे. अर्जुन आणि सुभद्रा यांचे लहानपणापासून एकमेकावर प्रेम होतें, तीं दोघेहि जणूं काहीं एकमेकांसाठींच जन्माला आलीं होतीं, त्यांचे प्रेम अत्यंत सात्त्विक आणि अतिशय उदात्त होतें, वगैरे वगैरे गोष्टी तुम्ही सर्वांनीं गृहीत धरल्या आहेत. पण महाभारत वाचलें म्हणजे तुम्हां सर्वांच्या गोड गोड कल्पना या कवींच्या थापा आहेत, असें स्पष्टपणें दिसून येतें. बारा वर्षें तीर्थयात्रा करून आणि त्या तीर्थयात्रेंत उलूपीबरोबर एक दिवस आणि चित्रांगदेबरोबर तीन वर्षे विलासांत घालवून अर्जुन पुढें द्वारकेला गेला अशी मूळ कथा आहे. तो तिथें गेला तेव्हां रैवतक पर्वतावर एक महोत्सव सुरू झाला होता. या उत्सवांत सुभद्रा प्रथम अर्जुनाच्या दृष्टीला पडली. त्यापुढचें महाभारतांतलें वर्णन असे आहे—

‘ तिला पाहतांच अर्जुनाच्या मनात मदनाचा प्रादुर्भाव झाला व तो तिच्याकडे टक लावून पाहूं लागला. हें कृष्णाच्या ध्यानांत आलें आणि तो अर्जुनास हंसत हंसत म्हणाला, ‘ पार्था, वनवास करणाराचें मन कामानें असें व्याप्त व्हावें हें मोठें आश्चर्य आहे रे! ही सारणाची भगिनी—माझी बहीण सुभद्रा ना? ही बाबाची फार लाडकी आहे. हिच्यावर जर तुझें मन जात असेल, तर मी स्वतः त्याविषयीं पित्या-

जवळ गोष्ट काढील.' मदनपीडित अर्जुन सुभद्रेचा स्वीकार करायला एका पायावर तयार होताच. पण कृष्ण त्याला म्हणतो, 'अर्जुना, क्षत्रियांनी स्वयंवर विधीनें विवाह करावा, हा उत्तम पक्ष होय. परंतु स्त्री स्वभावतःच चंचल असल्यामुळें तसें केल्यास आपला कार्यभाग होईलच असा नियम नाहीं. आता बलात्कारानें स्त्रीस हरण करावे हेंहि क्षत्रियास प्रशस्त होय. शूरांनीं याच प्रकारें विवाह करावा असें धर्मशास्त्रज्ञ सांगतात. यास्तव अर्जुना, तूं माझ्या बहिणीस बलात्कारानेंच हरण कर. कारण स्वयंवर केल्यास ती कोणास माळ घालील कोण जाणे ?'

कवींच्या पलटणीने ही प्रेमकथा रंगवितांना पदरचा मालमसाला वापरून आणि काव्यमय संकेतांची फोडणी देऊन तिचें स्वरूप किती बदललें आहे हें लक्षांत आणलें म्हणजे कवीइतके लबाड लोक उभ्या दुनियेंत दुसरे कोणीहि नसतील असें वाटूं लागतें. प्लेटोनें आपल्या राज्यातून कवींना हद्दपार करण्याचें ठरविलें होतें ना ? त्याचें कारण कवींचा असला कल्पनाविलास हेंच असावें ! कलादृष्टीनें लेखकाला मूळ कथेंत बदल करावा लागणें अपरिहार्य आहे. अशा फेरफाराकडे वाचकानें रसिकतेच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे, हें मी मान्य करतों. पण स्त्री-पुरुषांच्या प्रेमाचें चित्रण करतांना आमचे कवी प्रीतीच्या क्वचित् प्रतीत होणाऱ्या आत्मिक भागांवरच वेळीं अवेळीं भर देतात ! प्रीति जितकी आत्मिक तितकीच शारीरिक असते, हें ते सोयीस्करपणानें विसरतात. परंपरागत संकेतांची आणि समाजाच्या अंध निषेधाची त्यांना बहुधा भीति वाटत असावी ! पण यामुळें प्रीतीचें खरेखुरें चित्रण करून तिच्यांतल्या बिकट समस्यांवर प्रकाश टाकणें आणि मानवी स्वभावाचें रम्य, गूढ, उदात्त, विकृत, असे जे निरनिराळे भाग असतात, त्यांच्या प्रीतीशीं होणाऱ्या विविध संघर्षांतूनच जीवनांतलीं अनंत लहानमोठीं सुखदुःखें निर्माण होतात हें दाखविणें त्यांना अशक्य होऊन बसतें. त्यांच्या संकेतनिष्ठ साहित्यानें वाचकांच्या वरवरच्या भावना संतुष्ट होत असल्या, तरी जीवनमूल्यांची

यथार्थ जाणीव करून देणें हें कार्य त्यांच्या प्रीतिकथांतून सहसा पार पडत नाहीं.

'जळलेला मोहर' मीं प्रथमच वाचले तेव्हां तुम्ही या कोंडींतून बाहेर पडण्याची धडपड करीत आहांत असें मला दिसून आले. सर्वसामान्य वाचकांच्या मनांत शृंगारविषयक सुप्त आसक्ति स्वाभाविकच असते. ती चाळविणें हें कांहीं मोठ्या कुशलतेचें काम नाहीं. रेखीव शारीरिक वर्णनांनीं, सांकेतिक नीतीच्या मर्यादेंत बसणाऱ्या चुंबनालिंगनाच्या सूचक उल्लेखांनीं आणि साहचर्यामुळें शृंगारपोषक वाटणाऱ्या काव्यमय वातावरणानें वाचकाच्या मनांतल्या प्रीतिभावनेला गुदगुल्या करण्याचे कार्य बहुतेक लेखक करीत असतात. पण संकेतांच्या पकडींतून सुटण्याचें धैर्य नसल्यामुळें म्हणा, अथवा सत्य सांगण्याचें धाडस केल्यास आपली लोकप्रियता जाईल या भीतीनें म्हणा, त्यांच्या नायक-नायिका एकीकडून शारीरिक मीलनाकरितां धडपडत असल्या तरी दुसरीकडून प्रीतीच्या उदात्त, उज्ज्वल आणि उत्कट स्वरूपाचा आपल्याला पदोपदीं साक्षात्कार होत आहे, असा त्या आव आणीत असतात. लग्नपूर्व प्रणयातच नव्हे तर लग्नोत्तर जीवनांतहि स्त्री-पुरुषांमधलें शारीरिक आकर्षण ही एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. या आकर्षणाचें स्वरूप प्रामाणिकपणे समजावून घेण्याचा प्रयत्न न केल्यामुळें लाखों जोडपीं नेहमीं दुःखी होतात. 'बापहो, संयम पाळा, ब्रह्मचर्य सांभाळा.' किंवा 'खा, पी, मजा कर. आयुष्य हा दोन घडींचा डाव आहे.' या दोन्ही घोषणा जीवनाचें अज्ञानच दर्शवितात.

प्रीति हे नुसते काव्य नाहीं; तें शास्त्रहि आहे, हें कटु सत्य 'जळलेला मोहर' मध्ये सूचित करण्याचा तुम्हीं जो प्रयत्न केला आहे, तो अनेकांना आवडला नाहीं हें मला ठाऊक आहे. पण वाचकांच्या आवडीनिवडीचीं कारणें प्रत्येक पुस्तकाच्या बाबतींत भिन्न भिन्न असूं शकतात. या कादंबरी-संबंधीं तुम्हांला आलेलीं कांहीं निवडक पत्रें तुम्हीं मला पाठवून दिलीं आहेत तीं मीं लक्षपूर्वक वाचलीं. त्या पत्रांवरून ज्यांच्यासाठीं ही कादंबरी तुम्ही लिहिली होती त्यांना ती आवडली असें मला वाटतें. सर्व प्रौढ पत्र-लेखक तुमच्या बाजूचे आहेत. आतां एखाद्या सतरा-अठरा वर्षांच्या मुलीनें 'तुमच्या कादंबऱ्यांपैकीं जळलेला मोहर तेवढी मला आवडत नाहीं. बाकीच्या सर्व

आवडतात.' असें लिहिलें तर तें एक प्रकारें तुम्हांला दिलेलें शिफारसपत्रच नाहीं का ? तुमच्या जागीं मी असतों तर त्या मुलीला सरळ उत्तर पाठविलें असतें, ' बाई, चाकू-कात्र्या हीं जशीं लहान मुलांचीं खेळणीं नव्हत, तशीं असल्या कादंबऱ्या हीं अल्लड मुलांमुलींची करमणूक करणारीं पुस्तकें नव्हेत. एखाद्या कथेतलें काव्य-सौंदर्य कळणें निराळें आणि तिच्यांतलीं जीवनसत्यें जाणवणें निराळें ! तीस-पस्तीस वर्षांपूर्वी मी कॉलेजांत गेलों तेव्हां मला पहिल्या वर्षी संस्कृतला शाकुंतल होतें. त्यांतला चौथा अंक वाचतांना कालिदासाच्या सुंदर कल्पनांचें मला मोठें कौतुक वाटलें. पण पतिगृहीं जायला निघालेल्या शकुंतलेचें दुःख पाहून माझ्या डोळ्यांत तेव्हां कांहीं पाणी उभें राहिलें नाहीं. पण गतवर्षी माझ्या वडील मुलीचें लग्न झालें. कन्यादान करतांना मी मोठ्या आनंदांत होतों. तेव्हां उत्सवाची धुंदी नाचत होती माझ्या डोळ्यांवर ! पण जेव्हां वरात निघाली आणि माझ्या मुलीनें सासरीं जाण्याकरितां मला नमस्कार केला, तेव्हां मला एकदम भडभडून आलें. तिला पोटाशीं धरून मी एखाद्या लहान मुलासारखा रडलों. दुसरे दिवशीं मला शाकुंतलाची आठवण झाली. मी मुद्दाम तें पैदा करून चौथा अंक पुन्हां वाचला. बरेच दिवस संस्कृत वाचण्याचा सराव नसल्यामुळें कांहीं कांहीं ठिकाणीं मला अडखळल्यासारखें झालें; नाहीं असें नाहीं. पण तें वाचतांना कॉलेजांत न चाखलेल्या एका नव्या अपूर्व रसाचा आस्वाद मला मिळाला. कण्व, शकुंतला, तिच्या सख्या, गौतमी किंबहुना शकुंतलेची आवडती हरिणी आणि लाडकी नवमल्लिका या सर्वांच्या विरहदुःखाशीं मी समरस होऊन गेलों. 'बाबा, पुन्हां केव्हां मला या तपोवनाचं दर्शन घडेल ?' या शकुंतलेच्या वाक्यानें तर माझ्या पापण्या ओलावल्या. अनुभूतीशिवाय काव्य खरेंखुरें समजत नाहीं हेंच खरें ! ' जळलेला मोहर ' या कादंबरीच्या बाबतींत थोडेंसें असेंच म्हणतां येईल. आज तुला ती न आवडणंच स्वाभाविक आहे. पण उद्यां तिशी-चाळिशींत तूं ही कादंबरी वाचलीस तर तिचें मर्म समजून ती कदाचित् तुला आवडेलहि ! नाहीं कुणीं म्हणावं ?'

कला, वाङ्मय, वगैरे दृष्टींनी या कादंबरीची योग्यता ठरविण्याची लायकी माझ्या अंगीं नाहीं. तें काम मी तुमच्या टीकाकारांकडे सोंपवितों. पण

असूनाहि बुद्धया उपेक्षिला गेलेला असा विषय समतोलपणानें हाताळण्याचा तुम्हीं या कादंबरींत जो प्रयत्न केला आहे, तो माझ्यासारख्या प्रौढ वाचकांना निःसंशय महत्त्वाचा वाटतो. असे अनेक उपेक्षित विषय, लोक काय म्हणतील या भीतीनें आपले कलावंत बहुधा हातीं घेत नाहींत. पण मला वाटतें, कलावंत हा लोकांचा गुलाम नाहीं. तो स्वतंत्र आहे. तो सत्याचा सार्था आहे, स्वतःच्या आत्म्याचा प्रामाणिक साक्षीदार आहे. लोकांच्या लहरींच्या तालावर तो नाचूं लागला कीं, त्याच्या कलेचा अधःपात होतो. हळूहळू जीवनाकडे भेदक आणि प्रामाणिक दृष्टीनें पाहण्याची त्याची शक्तिच नाहींशी होते. लोकांच्या अंध आवडी-निवडी, त्यांच्या संकुचित कल्पना आणि आकांक्षा, अज्ञानामुळे त्यांना आवडणारीं अर्धसत्यें, इत्यादिकांची कळत न कळत तो पोपटपंची करूं लागतो. मानवी जीवनाचा श्रेष्ठ मार्गदर्शक हें जें त्याचे स्वरूप आहे तें साहजिकच लोप पावतें. लोकाराधन हा कलेचा शाप आहे.

शरीर व आत्मा यांचे परस्परसंबंध हा विषय आपल्या वाङ्मयांत आजपर्यंत उपेक्षिला गेलेला आहे. समाजांतले बहुसंख्य लोक शारीरिक प्रेरणांनाच जीवन समजतात, वासनांच्या तृप्तींतच आनंद मानतात, सात पडद्यांआड लपलेल्या आपल्या आत्म्याचें दर्शन घेण्याइतकी धडपड त्यांच्यापैकीं एखाद्याच्याच हातून होते. पण परंपरागत कल्पनांची पोपटपंची करण्यापलीकडे त्यांच्या बुद्धीची उडी जात नसल्यामुळें ते नेहमीं शरीरापेक्षां आत्मा फार श्रेष्ठ आहे असें तावातावानें सांगत सुटतात. आपल्या जुन्या निवृत्तिपर तत्त्वज्ञानांतून आणि गोंधळलेल्या पारमार्थिक कल्पनांतून या विचारसरणीचा उगम झाला आहे हें उघड आहे. पण शरीरापेक्षां आत्मा मोठा आहे असें मानणारीं हीं असंख्य माणसें त्या आत्म्याच्या विकासाकरितां कितीसे कष्ट करतात? उलट ज्या शरीराची ते निंदा करतात, त्याचींच तीं गुलाम झालेलीं असतात.

एक दंतकथा आहे. रामदासस्वामींना खीर फार आवडत असे म्हणे! जिभेची ही आसक्ति नाहींशी व्हावी म्हणून त्यांनीं ओकारी येईपर्यंत खीर खाल्ली. या ओकारीच्या रामबाण औषधानें स्वामींचें खिरीवरलें अमर्याद प्रेम नाहींसें झालें, असें त्या दंतकथेंत वर्णन आहे. पण केवळ उपभोगाच्या अतिरेकानें माणसाच्या मनांत कुठल्याहि गोष्टीविषयीं विरक्ति उत्पन्न होते, ही कल्पना किती चुकीची आहे हें महाभारतांतलें ययाति राजाचें चरित्रच सांगत

आहे. या दंतकथेचें मर्म माझ्या दृष्टीनें निराळेंच आहे. एवढे वैराग्यशाली रामदास स्वामी! महाराष्ट्राचें आनंदवनभुवन बनविण्याच्या आपल्या कार्यांत व्यत्यय येऊं नये म्हणून लग्नाची बेडी पायांत पडण्याच्या आधींच बोहल्यावरून त्यांनीं पळ काढला! पण अशा विरक्त व्यक्तीलाहि खिरीचा मोह कांहीं केल्या आवरतां आला नाहीं. हेंच या दंतकथेचें सार आहे. समर्थभक्त माझ्या या तर्काला तर्कट म्हणून संबोधतील, माझ्यावर अश्रद्ध, नास्तिक, वगैरे शिक्के मारतील हें मी जाणून आहे. पण रामदास काय किंवा तुकाराम काय, केवढेहि मोठे संत असले, मानवी जीवन उन्नत करण्याचें अमोघ सामर्थ्य त्यांच्या वाणींत असले तरी तींहि माणसेंच होतीं. तुकारामाची पहिली बायको दुष्काळात मेल्यानंतर त्याने दुसरे लग्न केलें. ही दुसरी बायको मनानें प्रेमळ पण जिभेनें कठोर होती; तिचा तो विलक्षण तोंडाळपणा पचवून तुकारामानें तिच्याबरोबर संसार केला. त्याला मुलेंबाळेंहि झालीं. त्याचा हा सारा चरित्रभाग असामान्य माणसांच्या जीवनांतहि शरीरसुखाला स्थान असतें, नव्हे असलेंच पाहिजे, हेच सिद्ध करीत नाहीं काय?

शरीर हे मातीने भरलेलें साडेतीन हातांचे पोते आहे. शरीरसुख क्षणभंगुर आहे, आत्मसुख हेंच काय ते जगांतले खरें सुख, वगैरे पोपटपंची आपल्या देशांतलीं अगदीं सामान्य माणसेंसुद्धां पिढ्या न् पिढ्या करीत आलीं आहेत. पण त्यांच्यापैकीं कितीकांना शरीरसुखाचा मोह आवरतां आला आहे? आत्मविकासासाठीं 'हें पहा माझं शरीर मीं फेंकून दिलं.' असे प्रामाणिक उद्गार कितीकांच्या तोंडून बाहेर पडले आहेत? इहलोकीं शरीरसुख तुच्छ मानणाऱ्या या पोपटांची परलोकांतल्या सुखाविषयींची कल्पना कितीशी उच्च असते तें पाहण्याजोगें आहे. किंबहुना आपल्या समाजांतल्या स्वर्गाच्या साऱ्याच कल्पना मला हास्यास्पद वाटतात. तिथें म्हणे सुंदर सुंदर अप्सरा असतात. मनुष्य जितका अधिक पुण्यवान् तितकी अधिक वरच्या नंबरची अप्सरा त्याच्या गळ्यांत तिथें पडते! तिथल्या या अप्सरा कुमारिका असतात असें थोडेंच आहे? उर्वशी, मेनका, वगैरे त्यांतल्या अनेक प्रमुख सुंदरींचीं निरनिराळीं कुलंगडीं आपल्या पुराणकारांनीं ठिकठिकाणीं नमूद करून ठेवलींच आहेत. स्वर्गांत गेल्यावर पुण्यवान् माणसें वेश्यागमन करतात, एवढाच या अप्सराप्रकरणाचा अर्थ आहे. जें शरीरसुख इहलोकीं

निषिद्ध मानावयाचें, तेंच स्वर्गांत उपभोग्य व उच्च दर्जाचें ठरवायचें, हें अजब तर्कशास्त्र फक्त रूढीच्या आंधळ्या राज्यांतच चालूं शकतें. आमच्या प्रचलित धार्मिक कल्पना जितक्या खुळचट आहेत, तितक्याच शरीर आणि आत्मा यांच्या परस्परसंबंधाच्या, शरारसुखाच्या क्षुद्रपणाच्या, आणि जीवनमूल्यांच्या कल्पना भ्रामक आहेत. अजामिळानें जन्मभर पापें केलीं; पण मरतांना मुलाला हांक मारण्याच्या निमित्तानें त्याच्या तोंडांतून 'नारायण, नारायण' असे शब्द बाहेर पडले. विष्णूच्या हजार नांवांपैकीं नारायण हें एक असल्यामुळें त्यानें मरतांना देवाचें नाव घेतलें म्हणून त्याच्या खात्यावर चित्रगुप्ताला फार मोठे पुण्य नोंदून ठेवावें लागलें! आणि त्या पुण्याईच्या बळावर सदरहू अजामीळ-महाशय विमानांत बसून वैकुंठाप्रत गमन करते झाले! पिढया न् पिढया आमचे हरदास आणि पुराणिक ही गोष्ट लोकाना रंगवून सांगत आले आहेत. या मूर्खपणाच्या तत्त्वज्ञानाचा सामाजिक परिणाम किती विचित्र झाला असेल, याची कुणालाहि सहज कल्पना करतां येईल. पाप आणि पुण्य, ऐहिक आणि पारलौकिक, सुख आणि दुःख, जीवन आणि मरण, इत्यादि बाबतींत वस्तुनिष्ठ पद्धतीनें, बुद्धिवादी दृष्टीनें, आणि जीवन जगताना जे अनुभव येतात, त्यांतूनच जीवनाचे सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण झाले पाहिजे, या श्रद्धेनें आम्ही विचार करीत राहिलों असतों तर आपल्या समाजाला आजची अवनत अवस्था कधींच प्राप्त झाली नसती. आज स्वराज्य प्राप्त होऊनहि आपण कुठें उभे आहोंत? अज्ञानाच्या चिखलांत, दारिद्र्याच्या खातेऱ्यांत, धर्मभोळेपणाच्या धुंदींत, निष्क्रियतेच्या नशेत—

शरीरसुखाची मनसोक्त निंदा करीत करीत त्याच्या आसपास सदैव घुटमळत राहिल्यामुळें येणाऱ्या मानसिक दुबळेपणाचें, भारतीय जीवनांतल्या प्रत्येक क्षेत्रांत आज आढळून येणाऱ्या अगतिकतेचें मूळ आणखी एके ठिकाणीं आहे. माझें पत्र मारुतीच्या शेपटाप्रमाणें लांबत चाललें आहे ही जाणीव असूनहि त्याचा उल्लेख केल्यावांचून मला राहवत नाहीं. आपण असामान्य तत्त्व-ज्ञानाचें कलम सामान्यांच्या आयुष्यावर करण्याचा वायफळ खटाटोप करीत आलों. माणसांतले इतर भेद कधीं काळीं तरी नाहींसे होतील, अशी कल्पना करणें चुकीचें होणार नाहीं. पण सामान्य आत्मा व असामान्य आत्मा हा भेद मात्र चिरंतन आहे. असामान्य मनुष्य कसा निर्माण होतो याची

मीमांसा करणें फार कठीण आहे. पण तो सामान्यापेक्षां नेहमींच निराळा असतो. केवळ बुद्धीनें हे असामान्यत्व निर्माण होत नाहीं. त्या आत्म्याच्या ठिकाणीं एक स्वयंभू शक्ति असते. तिच्या तेजानें सामान्यांचे डोळे दिपून जातात. त्या तेजाची पूजा करण्याचा मोह त्यांना अनावर होतो. त्यामुळे तो असामान्य आत्मा जें जें म्हणेल ते तें त्यांना वेदवाक्य वाटूं लागते. पण असामान्य माणसें हीं धूमकेतूप्रमाणें असतात. त्यांचे उदयास्त जितके आकस्मिक तितकींच त्यांच्या जीवनांतून सूचित होणारीं उच्च तत्त्वेंहि सामान्यांना सहसा न पेलणारीं! एक प्रेत आणि एक रोगी मनुष्य पाहून बुद्धाला उपरति झाली. अभूतपूर्व ऐश्वर्य, लावण्यवती पत्नी, पितृत्वाचा नवा सुखद अनुभव, इत्यादिकांचा त्याग करून एका मध्यरात्रीं तो आपल्या अस्वस्थ आत्म्याच्या समाधानाकरितां राजगृहाबाहेर पडला. आत्म्याचा हा जिवंतपणा (Sensitiveness) ही कांहीं केवळ प्रयत्नानें मिळवितां येणारी, पोपटपंचीनें प्राप्त होणारी, धार्मिक ग्रंथाच्या पारायणानें पदरात पडणारी गोष्ट नाहीं. या कारणामुळें असामान्य व्यक्तीनें पुरस्कारलेलें तत्त्वज्ञान कितीहि उच्च असले तरी ते संपूर्णपणें सामान्य मनुष्याच्या पचनीं पडत नाहीं. बुद्धाच्या अवसानानंतर त्याच्या धर्माची काय स्थिति झाली हें इतिहास सांगतच आहे. बुद्ध धर्माचें अनुयायित्व अभिमानानें मान्य करणाऱ्या चीन व जपान या राष्ट्रांत गेल्या दहा-वीस वर्षांत काय काय उत्पात झाले, मानवाचें दुःख कमी व्हावें म्हणून तळमळणाऱ्या बोधिसत्वाच्या तत्त्वांचीं बिरुदें मिरविणाऱ्या या दोन देशात मनुष्याला जें जें दुःख होणें शक्य आहे ते तें लक्षावधि लोकांच्या कपाळीं कायमचें ठाणें देऊन कसे बसलें आहे, हें तुम्ही जाणतांच. हा सामान्य मानवानें असामान्यावर उगवून घेतलेला सूड आहे.

गेल्या पांच हजार वर्षांचा जगाचा इतिहास पाहिला म्हणजे महात्म्यांचीं तत्त्वज्ञानें हीं महाकवींच्या काव्याप्रमाणेंच असतात असे मनांत आल्यावांचून राहत नाहीं. तीं काव्यें वाचून सामान्य मनुष्याला बौद्धिक व भावनात्मक आनंद होतो, त्याच्या मनावर थोडेफार सुसंस्कार घडतात; पण त्या संस्कारांच्या शक्तीला अनंत मर्यादा आहेत. रामायण वाचणाऱ्या कुटुंबांतले भाऊ भाऊ भांडणार नाहींत ही आशा वेडेपणाची आहे! मोठ्या माणसांच्या तत्त्वज्ञानाचीहि अशीच गत होते. गांधीजींचीं सत्य, अहिंसा, अपरिग्रह, वगैरे वगैरे

तत्त्वें त्यांच्यापुरतीं अगदीं बावनकशी होतीं. हिंदुस्थानांतल्या सर्वसामान्यांनीं त्यांच्या व्यक्तित्वानें दिपून जाऊन या तत्त्वांना माना डोलावल्या. पण एका विशाल देशांतल्या पिढीच्या मनावर अपूर्व प्रभुत्व गाजवूनहि गांधीजी सामाजिक मनांत हीं तत्त्वें कितीसे उतरवूं शकले ? त्यांच्या डोळ्यांदेखत नौखालीचें हत्याकांड झालें. ती आग विझते न विझते तोंच पंजाबमध्यें वणवा पेटला. कोणत्याहि कारणाकरितां मानवी रक्ताचा एक थेंबहि या देशांत सांडला जाऊं नये, ही गांधींच्या अंतरींची उत्कट इच्छा होती. पण पराभूत हृदयानें आणि विषण्ण मनानें त्यांना आपल्यासमोर निरपराधी रक्ताच्या नद्या वाहत असलेल्या पाहाव्या लागल्या. त्यांच्या अपरिग्रहाच्या तत्त्वाचा खून त्यांचे लहान मोठे अनुयायी आजकाल किती लीलेनें करीत आहेत ! एका छोट्या पांढऱ्या टोपींत केवढा मोठा काळा बाजार दडलेला असतो हें प्रसंगीं सहस्त्राक्ष सरकारलासुद्धां उमगत नाहीं. याचा अर्थ गांधींचीं तत्त्वें चूक होतीं असा मुळींच नाहीं. तीं त्यांच्यापुरतीं सर्वस्वीं बरोबर होतीं. पण कुशल शस्त्रवैद्याच्या हातांत जीं शस्त्रें रोग्याला प्राणदान देणारीं ठरतात, तींच शस्त्रक्रियेचें ज्ञान नसलेल्या मनुष्याच्या हातांत पडलीं म्हणजे निरुपयोगी होतात किंवा तो मनुष्य माथेफिरू असला तर तीं हजारांच्या हत्येला कारणीभूत होतात. म्हणूनच असामान्य माणसें आणि सामान्य माणसें यांचीं जीवनविषयक तत्त्वज्ञानें निश्चितपणें भिन्न असलीं पाहिजेत असें मला वाटतें. चिमणीचें खरें सामर्थ्य काड्या आणि कापूस जमवून घरांतल्या एखाद्या कोंपऱ्यांत सुंदरसें घरटें बांधण्यांत असतें. बाहेर कुठेंहि पडलेले दाणे चटकन् टिपण्यांत ती आपली चतुरता दर्शवूं शकते. पण गरुडाप्रमाणें उंच अंतराळांत जाऊन तिनें सूर्याकडे टक लावून पहावें, किंवा गगनमंडलांतून वेगानें खालीं येऊन पृथ्वीवर सरपटणाऱ्या सर्पावर झडप घालावी अशी अपेक्षा करणें चुकीचें नाहीं काय ? सामान्य माणसाचें जीवन या चिमणीसारखें असते. त्याचीं सुखदुःखें, त्याचे विचार-विकार किंवा त्याच्या वासनाभावना असामान्याच्या मोजमापानें मोजून चालणार नाहीं. त्याच्या जीवनांत शरीरसुखाला फार मोठें स्थान आहे असें मी म्हणतों याचें कारण हेंच आहे. तें सुख त्याला विवेकपूर्ण दृष्टीनें भोगून देण्यानेंच त्याची उन्नति होण्याचा संभव आहे. तुळस कितीहि वाढली तरी ती कांहीं ताडमाडाइतकी उंच होत नाहीं. सामान्याच्या आत्म्याचा

विकास असाच असतो. तो हळूहळू होतो. एका विशिष्ट मर्यादेपर्यंतच तो होण्याची शक्यता असते, हें आदर्शवाद्यांनीं क्षणभरहि विसरतां कामा नये. मानवाला बुद्धीच्या रूपानें देवत्वाची देणगी निसर्गानें दिली आहे हें कांहीं खोटें नाहीं. पण त्याच्याकडे पशुत्वाचाहि वारसा त्याच निसर्गाच्या कृपेनें आला आहे, हेंहि तितकेंच खरें आहे.

प्रख्यात चिनी लेखक लिन यू टांग यानें मनुष्याच्या पहिल्या भुकेविषयीं जें लिहिलें आहे तें त्याच्या दुसऱ्या भुकेच्या बाबतींतहि तितकेंच यथार्थ आहे. तो म्हणतो—

> 'अगदीं जीवश्च कंठश्च असलेले दोन मित्र घ्या. दोघांनाहि सपाटून भूक लागली आहे अशी कल्पना करा. अशा वेळीं त्यांची गांठ पडून एखाद्या मुद्यावर त्या दोघांचा वाद सुरू झाला तर त्याचा शेवट हटकून भांडणांत झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण पोटभर जेवून स्वस्थ चित्तानें त्याना त्या मुद्याचा खल करायला बसवा. मतभेद होण्याऐवजीं त्यांचें लौकरच एकमत होतें असे तुम्हांला दिसून येईल. आपल्याला घरीं जेवायला बोलावून पंचपक्वान्नाचा आग्रह करणाऱ्या मनुष्याच्या पुस्तकांचें परीक्षण करण्याची पाळी आपल्यावर आली तर त्याच्याविरुद्ध लिहिणें आपल्या जीवावर येतें. मनुष्यस्वभावाचें हें मार्मिक ज्ञान असल्यामुळेंच सर्व भांडणतंटे आणि वादविवाद यांचा निकाल न्याय-मंदिराऐवजीं भोजनाच्या पंक्तींत लावण्याचा प्रघात प्राचीन चिनी लोकांनीं रूढ केला.'

लिन यू टांगच्या या लिखाणांतला विनोद थोडा बाजूला केला म्हणजे मी म्हणतों त्या सत्याचें दर्शन त्यांत झाल्यावांचून राहत नाहीं. जग सुधारूं इच्छिणाऱ्यांनीं, मानव अधिक अधिक सुखी व्हावा म्हणून धडपड करणारांनीं त्याला वेळीं अवेळीं आत्मिक भुकेचीं औषधें पाजण्यापेक्षां त्याच्या ज्या नैसर्गिक शारीरिक भुका अज्ञानामुळें, विषम समाजरचनेमुळें, अथवा अंध पावित्र्यामुळें अतृप्त रहात आहेत, त्या आधीं पूर्ण करण्याची दक्षता घेतली

पाहिजे. कबुतरांनाहि ज्याचा कंटाळा येईल अशा खुराड्यांत राहणारा, आठ आठ तास गिरणीच्या भट्टींत शिजून निघणारा, कोणत्याहि प्रकारचें शिक्षण नसल्यामुळें बौद्धिक आनंदाला पारखा झालेला आणि आपल्या लाडक्या मुलांबाळांच्या कपाळीं हेंच जनावराचें जिणें येणार आहे, या कल्पनेनें जीवनाला विटलेला मजूर मद्यपानापासून परावृत्त व्हावा म्हणून पावित्र्यवाद्यांनीं प्रयत्न करणें प्रामाणिकपणाचें असलें तरी फारसें शहाणपणाचें ठरणार नाहीं. पावसाळ्यांत नदीला महापूर येऊन तिचें पाणी वाट मिळेल तिकडे पसरूं लागतें. मुंबईसारखीं अवाढव्य नगरें सध्यां अशींच बेफाम वाढत आहेत. अशा शहरांत लाखों तरुणांना पोटासाठीं रहावें लागतें, राबावें लागते. त्यांना आपल्या बायकामुलांना घेऊन तिथें राहतां आलें तर तें नको आहे असें थोडेंच आहे? पण जिथे पथारी पसरायला जागा मिळावी म्हणून पांच-पांचशेंची पागडी द्यावी लागते, तिथे कुटुंबवत्सल सामान्य मनुष्याला या साध्या सुखाचा लाभ कुठून होणार? आणि जोंपर्यंत अशीं पत्नीपासून दीर्घकाल दूर रहावें लागणारीं, मुलांबाळांच्या गोड सहवासांत फुलणाऱ्या नाजुक भावनांना पारखीं झालेलीं, कौटुंबिक जीवनामुळे सहजासहजीं निर्माण होणाऱ्या संयमाचा संपर्कहि नसलेलीं माणसें बकाली शहरांत आपलें दारिद्र्यामुळें कंटाळवाणें झालेलें जीवन कंठीत आहेत, तोंपर्यंत सरकारनें वेश्यांनीं अमुक ठिकाणीं राहूं नये आणि तमुक ठिकाणीं जाऊं नये असे कितीहि निर्बंध घातले तरी त्यांचा चिरस्थायी असा सामाजिक फायदा काय होणार आहे?

अंध रूढीच्या आहारीं गेलेल्या आपल्या संस्कृतींत धर्माच्या नांवाखालीं शरीर व आत्मा यांची फारकत करण्यांत आली. 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' हें कविवचन अनेक अर्थांनीं खरें आहे याची जाणीव आपला समाज विसरत गेला. आत्मविकास शरीरसुखापेक्षां श्रेष्ठ असला तरी कवित्वाप्रमाणे विशेष व्यक्तींतच प्रगट होणारी ती एक शक्ति आहे, समाजांतल्या सर्व लोकांना सक्तीनें कवि करण्याचा उपद्व्याप जितका मूर्खपणाचा ठरेल, तितकाच शरीरसुखाकडे दुर्लक्ष करून सर्वसामान्य मनुष्याची आत्मिक उन्नति साधण्याचा प्रयत्न विफल होईल, ही साधी गोष्ट आमच्यांतल्या मोठमोठ्या लोकांच्या ध्यानीं क्वचित्‌च आली. म्हणूनच माझ्यासारख्याला वारंवार मनांत येणारे वरच्यासारखे विचार कुठेंतरी व्यक्त केल्यावांचून राहवत नाहीं. त्यांत

'जळलेला मोहर' च्या पहिल्या आवृत्तीला प्रस्तावना लिहिण्याविषयीं तुम्ही माझा पाठपुरावा केला होता, त्या वेळीं मी तुमच्या तडाक्यांतून कसाबसा बचावलों. दुसऱ्या आवृत्तीपर्यंत तुम्हीं ती गोष्ट विसरून जाल अशी माझी कल्पना होती. पण माझ्या दुर्दैवानें तसें घडलें नाहीं. गेले सहा महिने तुम्ही माझा चागला पिच्छा पुरविला. तेव्हा धंद्याच्या निमित्तानें जे अनेक चित्रविचित्र सामाजिक अनुभव मला मिळाले, माझ्या तपासण्याच्या खोलींत माणसाच्या मनाचे मला जें दर्शन झालें, तें साररूपाने तुमच्यापुढे मांडावें, व तुम्ही माझ्यावर टाकलेल्या जबाबदारींतून माकळे व्हावे, असें मीं ठरविलें. लेखणीपेक्षा थर्मामीटरशींच माझा अधिक सबंध आला असल्यामुळें 'मी स्वैर काहीं तरी लिहीन; त्याचा तुम्हांला फारसा उपयोग होणार नाहीं.' असें मध्यें मी एकदां तुम्हांला लिहिलें होते. पण उत्तरादाखल तुम्ही लगेच लिहिलेंत, 'तुमचे स्वैरालापहि वाचकांना मार्गदर्शक होऊं शकतील. अरण्यांतल्या वृक्षवेली कांहीं माळ्यानें लावलेल्या अथवा जोपासलेल्या नसतात. पण त्यांच्यांतहि एक प्रकारचें सौंदर्य असतेच.' बहुधा तुमच्या ह्या स्तुतीला बळा पडूनच मीं तुम्हाला चार शब्द लिहून पाठवायचें कबूल केलें असावें. ते चार शब्द गप्पागोष्टींच्या पद्धतीनेंच लिहिणें मला शक्य होतें. त्याप्रमाणे हे लांबलचक पत्र तुम्हाला पाठवीत आहे. त्याचा तुम्हांला योग्य वाटेल तो उपयोग करावा. एक गोष्ट मात्र सांगतों. ज्यांचे स्वैरालाप कथांइतकेच रंजक व बोधक होतात अशीं माणसें जगात नसतात असें नाहीं. पण डॉ० सान्याची मात्र त्यांत गणना करतां येणार नाहीं.

माझ्या या सर्व लिहिण्यावरून मी शरीरसुखालाच फार महत्त्व देतों, असा अनेकांचा ग्रह होण्याचा सभव आहे. म्हणून जातां जातां माझें एक मत स्पष्टपणे नमूद करतों. अष्टौप्रहर अनिर्बंध शरीरसुखाच्या मागें लागल्यामुळें मनुष्याच्या बुद्धीचा व हृदयाचा विकास कुंठीत होतो, हें मलाहि मान्य आहे. मानवधर्माचे खरे शत्रु नास्तिक लोक नव्हत. 'कशाला उद्यांची बात? बघ उडुनि चालली रात!' हें मनामध्ये चोवीस तास गुणगुणत चंचल चैनीच्या मागे धावत सुटणारे उथळ सुखवादी लोक, हेच मानवतेचे खरे शत्रु होत. चालू घडी हेंच त्याचें युग असतें. ती पिळून तिच्यांतून शक्य तेवढी मजा लुटणें, हेंच ते आपलें जीवितकार्य मानतात. स्वतःच्या सुखासक्त जीवनापलीकडे दुसरें जग ते जाणतच नाहींत. अंतर्मुखता, सामाजिकता, चिंतनशीलता,

वगैरे गोष्टींचा त्याना सहसा स्पर्श होत नाहीं. शरीराला जी जी गोष्ट सुखप्रद वाटत जाईल, ती ती पुनः पुन्हा करीत रहावयाचें, एवढेंच त्याना ठाऊक असतें. त्यामुळें उथळ उपभोग हाच त्याचा देव बनतो. गजबजलेल्या शहराबाहेर ज्याला क्षणभर करमत नाहीं, क्षणोक्षणीं शरीरसुखाचा नवा चाळा जवळ केल्याशिवाय ज्याचा वेळ जात नाहीं, असा बहिर्मुख यांत्रिक मनुष्य विसावें शतक निर्माण करीत आहे; या मनुष्याची जात जगात सर्वत्र झपाट्याने वाढत आहे, हें मी मुळींच नाकारूं इच्छीत नाहीं. या लोकांना ख्रिस्त, बुद्ध, श्रीकृष्ण, यांचे जुने धर्म नकोत; मार्क्स, गांधी किंवा विवेकानंद, यांचीं नवीं तत्त्वज्ञानेंहि नकोत! संपत्ति आणि सत्ता यांची सदैव पूजा करणें हाच त्याचा धर्म!

भारतीय संस्कृतींत आत्म्याच्या गौरवाकरिता शरीराचा बळी देण्याची प्रथा पडली. आता जो नवा यांत्रिक मनुष्य निर्माण होत आहे, तो शरीराच्या क्षुद्र अथवा क्षणभंगुर सुखाकरितां आत्म्याचा बळी देण्यात आनंद मानीत आहे. शारीरिक सुखाच्या अंध आसक्तींतून, उपभोगाच्या अमर्याद लालचींतून, जास्तींत जास्ती द्रव्याचा संग्रह करण्याचें वेड मनुष्याला जडतें. या हृदयशून्य लोभातून इतरांवर राक्षसी प्रभुत्व गाजविण्याची इच्छा उत्पन्न होते. लोभ आणि मद यानीं मनाचा मृदुपणा मारून टाकल्यामुळे त्याची प्रीति एका व्यक्तीच्या ठिकाणीं स्थिर होऊं शकत नाहीं. कामवासनेची स्वच्छंद आराधना आणि एक स्त्री मिळाली कीं, दुसरीच्या मागें लागण्यानें जो शिकारींतला कैफ चढतो त्याची उपासना, हींच दुर्दैवानें त्याच्या प्रीतीचीं व्यक्त स्वरूपें ठरतात.

अशा प्रकारचा चंचल, उथळ आणि समाजविन्मुख मनुष्य निर्माण होणें हें मानवी संस्कृतीचे दुर्दैव आहे. संयमाचे वावडें असलेला आणि अंतर्मुखतेची उभ्या आयुष्यात ओळख न होणारा सामान्य मनुष्य कधींच सुखी होऊं शकणार नाहीं. पण संयमाचें जे तत्त्वज्ञान समाजापुढें ठेवावयाचे तें ढोंगीपणाचे असता कामा नये. अज्ञानातून, विषमतेतून आणि धर्मभोळेपणातून त्याचा उगम होता कामा नये. व्यक्तिविकास व मानवतेची प्रगति, या दोन्ही दृष्टींनीं आवश्यक असलेल्या संयमाचें मी नेहमींच समर्थन करतो. पण 'जळलेला मोहर' मध्यें तुम्ही चर्चिलेला प्रश्न काय किंवा त्याहून बिकट असलेल्या अनेक सांसर्गिक समस्या काय, त्याचीं उत्तरे देण्याची आजपर्यंतची आपली दृष्टि केवळ निषेधाची, कोंडमाऱ्याची, ऐहिक आयुष्य हा तुरुंग असून

मनुष्य-प्राणी हा त्यांत ठेवलेला कैदी आहे, अशा अर्थाची होती. शरीर व आत्मा या दोन्हींचें नैसर्गिक समाधान व विकास कोणत्या मार्गांनीं साधता येतील, सामान्य मनुष्याच्या जीवनांत असलेलें शरीरसुखाचें महत्त्व ओळखून व त्याला योग्य तें स्थान देऊन त्याला संयमी कसें बनवितां येईल, या दृष्टीनें आपण कांहींच विचार केलेला नाहीं. आतां तो करणें अगत्य आहे. देव-धर्माच्या भ्रामक कल्पनांवर आधारलेलीं जुनीं सामाजिक बंधनें तटातट तुटून पडत आहेत. बुद्धीला पटणारें उन्नत ऐहिक जीवन हेंच माणसाचें ध्येय होत आहे. या ध्येयाशीं सुसंगत असणारीं आणि शरीर व आत्मा या दोन्हींचा सुंदर समन्वय साधणारीं नवीं सामाजिक बंधनें निर्माण झालीं, तरच नवा मानव, नवें जग, इत्यादिकांविषयींचीं कवींचीं, शास्त्रज्ञांचीं, सज्जनांचीं आणि तत्त्वज्ञांचीं स्वप्नें अंशतः सत्यसृष्टींत उतरतील. पण त्याकरितां एक गोष्ट आपण कटाक्षानें लक्षांत ठेवली पाहिजे. मनुष्य हा नुसता आर्थिक, केवळ कामुक किंवा निव्वळ आध्यात्मिक असा प्राणी नाहीं. आर्थिक किंवा कामविषयक समाधान हें कांहीं त्याच्या आयुष्यांतलें एकमेव सुख नाहीं. नैसर्गिक वासनांचा कोंडमारा करून सामान्य मनुष्याचा आत्मविकास साधण्याची कल्पना ही मृगजळ शिंपून नंदनवन निर्माण करण्याइतकीच मूर्खपणाची आहे. मार्क्स, फ्राइड व गांधी, हे सर्व आधुनिक मानवसमाजाची चिकित्सा करणारे प्रतिभावान् धन्वंतरी आहेत. या प्रत्येकाच्या चिकित्सेंत सत्यांश आहे; पण पूर्ण सत्य मात्र एकींतहि नाहीं. हे सर्व सत्यांश जीवनांत समरस करून, त्यांच्या साहाय्याने नवें जग निर्माण करण्याचें सामर्थ्य जर सामान्य मनुष्य दाखवील, तरच यापुढ तो सुखी होण्याचा संभव आहे.

आणखी पुष्कळ लिहावेंसें वाटत आहे. कितीहि बडबडलें तरी वेड्याची तृप्ति होत नाहीं! तसेंच आहे हें. म्हणून आतां इथेंच थांबतों. तुम्ही माझें हें पत्र छापलें तर तुमच्या कादंबरीचे वाचक तुमची कोणत्या प्रकारची संभावना करतील याची कल्पना मला नाहीं. त्यांनीं आपली नापसंती दर्शविल्यास पुढल्या आवृत्तींतून तुम्हांला माझें हें लिखाण गाळण्याची परवानगी मी आतांच देऊन ठेवतों.

२७-६-४८ }

तुमचा स्नेहांकित,
डॉ. साने

# पारिजातकाचीं फुलें १

कॉलेजांत संस्कृतचा लेक्चरर म्हणून नेमणूक झाल्याची तार रघुनाथाच्या हातांत पडतांच त्याचें मन आनंदानें फुलून गेलें. त्या फुलांच्या सुगंधावर तरंगतां तरंगतां त्याच्या मनांत आलें—आपलें मन ही आज साधी वेल राहिलेली नाहीं; पारिजातकाचें झाड झालें आहे तें! लहानपणीं हिंवाळ्यांत सकाळी उठून थंडीची पर्वा न करतां पारिजातकाच्या झाडाखालीं गेलें कीं जें दृश्य त्याच्या दृष्टीला पडत असे त्याची त्याला एकदम आठवण झाली. झाडाखालीं त्या नाजुक चिमुकल्या फुलांचा गालिचाच पसरलेला असे! या गालिचावरून नजर वर केली, कीं डहाळी न् डहाळी कळयाफुलांनीं डवरून गेलेली दिसे. त्या कळयाफुलांकडे पाहतां पाहतां रघुनाथाला शेजारच्या कुसुमची आठवण होई. कुसुम गोरीगोरी पान होती. या गोरेपणामुळें तिचे लाल ओठ नेहमींच अधिक मोहक दिसत. रघुनाथ फुलें वेचायला लागला, कीं कुसुमहि तेथें धांवत येई नि फुलें वेचूं लागे. सारीं फुलें वेचून झालीं कीं रघुनाथ तिला थट्टेनें म्हणे, "आणखी एक फूल वेचूं का?"

छोटी कुसुम भोळ्या भावानें म्हणे, "हं!"

मग रघुनाथ तिला दोन्ही हातांनीं वर उचलून हंसूं लागे. कुसुम मात्र न हंसतां गंभीरपणानें म्हणे, "मी नाहीं बाबा प्राजक्ताचं फूल होणार! हें फूल

काय नुसतं देवाच्या उपयोगी ! जें फूल केसांत घालतां येईल, जें कधीं कधीं कोमेजणार नाहीं, असं फूल होणार आहें मी ! ”

बाळपणच्या आठवणींचीं गोड स्वप्नें कधींच संपत नाहींत. त्यामुळें रघुनाथाचें मन या बाळपणच्या आठवणींत आणखी किती तरी वेळ गुंगून राहिलें असतें. पण त्याच्यासमोर पडलेली तार म्हणत होती, “ चल, आटप लवकर, तयारी कर ! संध्याकाळच्या मेलनं निघायलाच हवं तुला !”

लगेच त्याच्या मनात आलें–आतां परकऱ्या कुसुमच्या आठवणींत कोण रमून जाईल ? तिच्या सासरच्या गावींच आपण प्रोफेसर म्हणून जात आहों. आता कुसुमच्या घरींच आपला संध्याकाळचा चहा होणार. तिच्या नवऱ्याबरोबर आपण सिनेमाला जाणार. तिच्या दारात पाऊल टाकलें कीं सशाचीं दोन पिलें—“ मामा आले, आले-” म्हणून आपलें स्वागत करणार...

रघुनाथाचें भावनाशील मन भूतकाळातून भविष्यकाळात भराऱ्या मारूं लागलें. आपल्या या सुखस्वप्नाचें त्याचें त्यालाच हंसूं आलें. तो हंसत मनांत म्हणाला, “ मनुष्याचं मन हें विमानासारखं आहे ! त्याला विशाल पोकळींतच उडतां येतं. मग ती पोकळी भूतकाळाची असो, नाही तर भविष्यकाळाची असो !”

× × ×

कॉलेजातला त्याचा पहिला तास सुरू होईपर्यंत त्याचे हें विमान एकसारखें भ्रमंती करीत होतें—या कॉलेजात आपणाला प्रेमळ सहकारी मिळतील का ? इथलीं मुलें दंगेखोर आहेत कीं सालस आहेत ? नि मुली ? या परक्या गांवांत आपलें मन रमेल का ?– एक ना दोन ! अनेक प्रश्न त्याच्या मनाला भंडावून सोडीत होते नि तो त्या प्रश्नाचीं एकसारखीं अनेक उत्तरें तयार करीत होता. मात्र त्या उत्तरांपैकीं एकाचा दुसऱ्याशीं मेळ नसल्यामुळें त्याच्या मनाचा गोंधळ कांहीं केल्या कमी होत नव्हता. ‘ या परक्या गावात आपल मन रमेल का ?’ या प्रश्नाचें त्याचे पहिलें उत्तर ‘ हे गाव आपल्याला परकं नाहीं !’ असे होत. हा, ज्या गावात कुसुमसारखी आपली बालमैत्रीण राहत आहे, तें गाव आपल्याला परकं वाटण्याचं कारण काय ? कुसुम मोठी बुद्धिवान मुलगी आहे. मॅट्रिक होताच लग्न झाल्यामुळें तिला कॉलेजचें शिक्षण मिळालें नाहीं; पण मॅट्रिकच्या वर्गांत असतांनासुद्धां ती किती वाचीत असे आणि त्याहीपेक्षां

किती सुंदर लिहीत असे! तिचे सुंदर निबंध वाचून आपण तिला नेहमीं चिडवीत असूं–"एक मुलगी उद्यां मोठी लेखिका होणार आहे. पुढं साहित्य-संमेलनाचं अध्यक्षस्थानसुद्धां तिला मिळेल नि मग ती आमच्यासारख्या माणसाशीं बोलणारसुद्धा नाहीं! हो, मोठ्या लेखकाच्या प्रत्येक शब्दाला किंमत असते म्हणे!"

भरती पुरी झाल्याबरोबर ओहोटी सुरू होते, त्याप्रमाणें कुसुमविषयींच्या या अनुकूल विचारांच्या पाठोपाठ प्रतिकूल विचारहि त्याच्या मनांत येऊं लागले. कुसुमचा नवरा सुस्वभावी असल तर सर्व ठीक आहे! पण—

तिच्या नवऱ्याविरुद्ध त्याने एक अवाक्षरहि ऐकलें नव्हतें. तो शहरातला एक प्रमुख सावकार व कापड दुकानदार आहे एवढेंच त्याला ठाऊक होतें. मात्र नेहमीं पुस्तकी जगांत वावरल्यामुळें असो, अथवा लहानपणीं एका कापड-दुकानांत धोतरावरलें रंगीत चित्र फाडल्याबद्दल दुकानदारानें दिलेल्या प्रसादाची आठवण अंतर्मनांत जागृत असल्यामुळें असो, कापड-दुकानदार हा सद्गृहस्थ असूं शकतो हें कांहीं केल्या रघुनाथाच्या मनाला पटत नव्हतें. शेवटीं कुसुमचा नवरा तुसडा आहे असें आढळून आलें तर तिच्या घरीं न जातां 'संस्कृत वाङ्मयांतला प्रेमविकास' हा आपला संकल्पित प्रबंध लिहायला घ्यायचे त्याने जेव्हां मनात ठरविलें तेव्हां कुठें या प्रश्नानें त्याचा पिच्छा सोडला.

संध्याकाळीं पाचच्या सुमाराला तो कुसुमच्या घराचा पत्ता काढीत पायींच निघाला. घर सांपडलें नाही तर निदान फिरण्याचें श्रेय तरी पदरांत पडेल असें तो मनात म्हणत होता.

पण त्याला भेटलेल्या पहिल्याच मनुष्यानें त्याला कुसुमच्या घराचा अचूक पत्ता सांगितला तेव्हां त्याला आश्चर्य वाटले. तो मनुष्य मोठा बडबड्या होता. तो आणखी म्हणाला, "मालक मात्र आत्तां घरीं तुम्हांला भेटायचे नाहींत! पलीकडच्या मैदानांत मोठी सभा आहे तिथं गेले आहेत ते!"

रघुनाथाचें कुतूहल जागृत झालें. त्यानें विचारले, "कशाला गेले आहेत?"

"अहो, त्यांचंच मुख्य भाषण आहे आज!"

रघुनाथाला विजेचा धक्का बसल्यासारखें वाटलें. कापड-दुकानदार सभेंत

भाषण करूं शकतो ? सुदाम्यानें द्रोणागिरी उचलून आणला असें एखाद्या पुराणिकानें सांगावें तशी ती बातमी वाटली त्याला.

तो मुद्दाम मैदानाकडे वळला. कुसुमच्या नवऱ्याचें भाषण नुकतेंच सुरू झालें होतें. "शहरांतल्या सर्व वेश्यांना अगदीं बाजूच्या भागांत म्युनिसिपालिटीनें वस्ती करायला लावली पाहिजे," हा ठराव मांडून तो त्याच्यावर बोलत होता. संस्कृति, नीति, पावित्र्य, वगैरे शब्द त्याच्या प्रत्येक वाक्यांत येतच होते. पण "वेश्यावर्ग हा मधुमेहाच्या जखमेसारखा चरत जाणारा सामाजिक रोग आहे. तो शस्त्रक्रियेसारख्या जालीम उपायानंच बरा केला पाहिजे!" या त्याच्या वाक्याला तर टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. वक्त्याच्या बोलण्यांत विचारांचा गोंधळ असला तरी, एक प्रकारचा आवेश आहे, हें रघुनाथालासुद्धा मान्य करावें लागलें. पांच मिनिटें तो भाषण ऐकत उभा राहिला. मग तींच वाक्यें आणि तेच तेच शब्द ऐकून त्याला वाटूं लागलें—गाण्याच्या तबकडीला पडलेल्या चऱ्यांतून टाचणी फिरूं लागली म्हणजे तें गाणें ऐकणें जसें अशक्य होतें तसें हें भाषण ऐकणेंहि—

तो चालूं लागला.

मध्येंच त्यानें मागें वळून पाहिलें. लोकांचा तो भला मोठा जमाव हंशा-टाळ्यांनीं वक्त्याचें अभिनंदन करीत होता.

कां कुणास ठाऊक, त्याच्या डोळ्यांपुढें दोन दृश्यें उभीं राहिलीं—एक खेडेगांवांतला दारूचा गुत्ता. घोंगावणाऱ्या माशांप्रमाणें तेथें संध्याकाळीं लोक जमतात.

दुसरें दृश्य—शर्यतीचें मैदान. मुंग्यांसारखी तेथें माणसांची गर्दी होते!

दारू, शर्यत नि व्याख्यान—या तिन्हींमध्यें कांही तरी साम्य आहे अशी विचित्र कल्पना त्याच्या मनांत येऊन गेली.

× × ×

कुसुमचें घर त्याला लगेच सांपडलें. कुसुम घरांच होती. तिनें त्याला चटकन् ओळखलें.

पण त्यानें मात्र—

तो क्षणभर दचकलाच! कालपासून जेव्हां जेव्हां त्याच्या डोळ्यांपुढें कुसुमची मूर्ति उभी राहिली होती, तेव्हां तेव्हां त्याला लहानपणचें आपलें

तें वाक्यहि आठवलें होतें, "पारिजातकाचं आणखी एक फूल वेचूं का ?" त्याच्या कल्पनेला गोरीगोरीपान आणि लाल लाल ओठ असलेली अशी कुसुम एकसारखी दिसत होती. पण आतां त्याचें स्वागत करण्याकरितां त्याच्यापुढें येऊन उभी राहिलेली कुसुम–

पारिजातकाचे देठ पांढरेफिक्कट झाले होते !

आणि त्या फुलाच्या पांढऱ्याशुभ्र रंगांतला मोहकपणाहि नाहींसा झाला होता. संगमरवराला चुन्याची कळा यावी, तशी तिची कांति फिक्कट वाटत होती.

रघुनाथाला राहवेना. त्यानें प्रश्न केला, "आजारी आहेस वाटतं, कुसुम ?"

तिनें हंसत उलट प्रश्न केला, "तूं प्रोफेसर होऊन इथं आलायस की डॉक्टर होऊन ?"

कुसुम चहा करीत असतांना तो एकसारखा तिच्याकडे निरखून पाहत होता. एखाद्या यांत्रिक बाहुलीप्रमाणें ती सर्व व्यवहार करीत होती. त्याच्या मनांत आलें—पूर्वीच्या कुसुमची हालचाल एखाद्या नर्तिकेप्रमाणें मोहक असे. पण आतांचें हिचें बोलणेंचालणें–छेः ! त्यांत सौंदर्य तर नाहींच; पण जीवसुद्धां नाहीं ! इतक्या दिवसांनीं आपला बालमित्र भेटायला आला म्हणून तिनें आनंदानें नाचायला हवें होतें !

पण—

कुसुमनें पुढ्यांत ठेवलेला चहा घेतां घेतां तो म्हणाला, "लिहितेबिहितेस की नाहीं हल्लीं ?"

"थोडं लिहिते."

"कविता ?"

"अंहं."

"गोष्टी ?"

"छेः !"

"मग काय गीतारहस्याचं लेखन चाललंय् ?"

"हूं !"

तिच्या त्या 'हुं'कारांत विषादाचाच भाग अधिक

रघुनाथाला पुढें कांहीं बोलण्याचा धीरच झाला नाहीं. "मुलं कुठं गेलीं

आहेत ?" म्हणून त्यानें विचारल्याबरोबर "तीं मावशीकडे गेलीं आहेत." असें अगदी निर्विकार स्वरानें तिनें सांगितलें.

"तुला सोडून बरीं राहतात तीं ?"

"पिकवील त्याचा मळा नि लावील त्याचा लळा !" तिनें उत्तर दिलें.

आल्यासारखें तिच्या नवऱ्याला भेटून जावें म्हणून रघुनाथानें इकडल्या तिकडल्या गोष्टी काढून पाहिल्या. पण पूर्वीची बोलकी कुसुम आतां अबोल झाली आहे, असा पदोपदीं त्याला अनुभव येऊं लागला. तो पुनःपुन्हां हंसत म्हणाला, "तूं माझ्यापासून मुद्दाम लपवून ठेवते आहेस; पण तुला कांहीं तरी होतंय्. होय ना ?"

"सारेच आजार सांगण्यासारखे नसतात, रघुनाथ."

एखादा गलिच्छ रोग—नवऱ्यानें कुठून तरी पैदा करून बायकोला दिलेला प्रसाद—दुसऱ्या एखाद्याच्या बाबतींत रघुनाथाला या शंका खऱ्या वाटल्या असत्या; पण कुसुमच्या नवऱ्याचें मघांचें तें भाषण त्याच्या कानांत घुमत होतें. 'जगाला स्वच्छतेचा उपदेश करणारा मनुष्य स्वतः घाणींत लोळणें शक्य नाहीं' असें तो मनांतल्या मनात तीनचारदा तरी म्हणाला.

तिन्हीसांजा झाल्या; कुसुम त्याला जाण्याचा आग्रह करूं लागली. "ते बाहेरून दमून आले म्हणजे कुणाशीं बोलत नाहींत. ते बोलले नाहींत म्हणजे तुला वाईट वाटेल ! पुन्हा केव्हा तरी ये म्हणजे गांठभेट होईल. आता काय, इथंच आहेस तूं !"

हे तिचे शब्द ऐकल्यानंतर त्याला उठणें प्राप्तच होतें; मात्र बिऱ्हाडीं परत जाईपर्यंतच नव्हे, तर रात्रीं अंथरुणावर झोपीं जाईपर्यंत त्याच्या मनांत एकच शल्य सलत होतें—"पुन्हा केव्हां तरी ये" असें कुसुम म्हणाली. "उद्यां ये" असें ती का म्हणाली नाहीं ? हिच्या नवऱ्याला एखादें व्यसन आहे कीं तो फाल्गुनरावासारखा भलताच संशयी आहे ?

थोड्या वेळानें रघुनाथाला झोंप लागली.

पण रात्रभर त्याला एकसारखीं स्वप्नें पडत होतीं. त्या स्वप्नांत एकच गोष्ट त्याला वारंवार दिसत होती... पारिजातकाच्या नाजुक फुलांचा सडा आणि त्याच्यावर नाचणारीं वेडींवांकडीं राक्षसी पावलें !

× × ×

पहांटे उठल्याबरोबर रघुनाथाला पुन्हां कुसुमची आठवण झाली. या आठवणीनें आपलें मन उगीच व्यग्र होत राहणार हें त्याच्या लक्षांत आलें. लगेच 'संस्कृत वाङ्मयांतला प्रेमविकास' या आपल्या संकल्पित प्रबंधाच्या टांचणवह्या त्यानें टंकेंतून बाहेर काढल्या. पहिल्या वहीच्या पहिल्या पानावरल्या—

दुष्यंत—शकुंतला
राम—सीता
चारुदत्त–वसंतसेना
पुंडरीक–महाश्वेता
चंद्रापीड–कादंबरी

या पांच प्रेमी युगुलांकडे पाहतांच त्याचें मन एका मधुर सृष्टींत विहार करूं लागलें. एकवेणी वियोगिनी शकुंतला, स्पर्शानें संजीवनी देणारी पतिव्रता सीता, मुसळधार पावसांतून प्रियकराकडे धांव घेणारी प्रणयिनी वसंतसेना, प्रेमासाठीं संन्यासिनी झालेली गंधर्वकन्या महाश्वेता—किती सुंदर चित्रें! किती रम्य मूर्ती! प्रीतिलतिकेवर फुललेलीं स्वर्गीय फुलेंच जणूं!

मध्येंच कुसुम त्याच्या डोळ्यांपुढें उभी राहिली.

पारिजातकाचें फूल? छेः! एक वाळून गळून पडलेले पान!

एखाद्या गायिकेनें मध्येंच बेसूर व्हावें, तशी या नायिकांत कुसुमची मूर्ति त्याला वाटली.

तिची आठवण मनांतून काढून टाकून तो आपलीं टिपणें चाळूं लागला.

थोड्या वेळानें बॉय चहा घेऊन आला. चहाबरोबर त्यानें एक वर्तमानपत्रहि आणलें होतें. स्थानिक दैनिकाच्या संपादकाचें हें व्यवहारचातुर्य पाहून रघुनाथाला आश्चर्य वाटलें. काल आपण इथें लेक्चरर म्हणून येतां काय आणि आज आपल्या नांवानें अंक सुरू होतो काय! रघुनाथानें थोडा विचार केला असता तर या तत्परतेंत व्यवहारचातुर्यापेक्षां सुशिक्षितपणाचाच भाग अधिक आहे, हें त्याच्या सहज लक्षांत आलें असतें. पण त्याला विचार करायला वेळ होता कुठें?

वर्तमानपत्राच्या पहिल्याच पानावर कुसुमच्या नवऱ्याचें भाषण, प्रत्येक वाक्यानंतर हंशा आणि टाळ्या घालून छापण्यांत आलेलें होतें. गांवांतल्या

वेश्यांची वस्ती एका बाजूला नेण्याच्या या महत्त्वाच्या चळवळीचें नेतृत्व योग्य मनुष्याकडे असल्यामुळें ती लवकरच यशस्वी होईल, अशी आशाहि भाषणाच्या शेवटीं संपादकांनीं प्रदर्शित केली होती.

कुसुमच्या नवऱ्याचें गांवांत चांगलेंच वजन असून त्याच्या चारित्र्याबद्दल सर्वांना आदर वाटत होता, हें वर्तमानपत्रांतल्या त्या मजकुरावरून उघड होत होतें.

मग कुसुम इतकी दुःखी कां? ही गाणारी मैना मुकी कां झाली? ही सदा हंसतमुख असणारी मैना—

कालचें कुसुमचें वागणें आठवून रघुनाथाला एकदम घुबडाची आठवण झाली.

ही अभद्र कल्पना मनांतून नाहींशी करण्याकरितां त्यानें वर्तमानपत्राचें आंतलें पान उघडलें—

परक्या घरांत ताठ मानेनें चालतां चालतां कुठल्या तरी दारांत धाडकन् डोकें आपटावें नि क्षणभर तें बधिर होऊन जावें तसें रघुनाथाला झालें!

त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना!

तो पुन्हां वाचूं लागला—

### वधू पाहिजे

"सुंदर, सुदृढ, सुशिक्षित. वराचें वार्षिक उत्पन्न कापड-दुकानाचें तीन हजार रुपये. याशिवाय शेतीवाडी. पहिली बायको जिवंत असली तरी तिचीहि या लग्नाला समति आहे."

पुढें रघुनाथाला वाचवेना, आणि वाचायचें तरी काय राहिलें होतें असें? कुसुमच्या नवऱ्याचें नांव, त्याचा पत्ता, तें सारें रघुनाथाला ठाऊक होतेंच!

नाहीं नाहीं त्या शंकांनीं त्याचें मन भरून गेलें. कॉलेजला जाईपर्यंत त्यानें नित्यव्यवहार कसेबसे पार पाडले. पण ढेकूण चावत असतांना झोंपलेल्या मनुष्याची जी अवस्था होते, तशी त्याच्या मनाची स्थिति झाली होती.

त्याला एकदां वाटे-कुसुमचें दुसऱ्या कुणावर प्रेमबीम तर नसेल ना?

तें फारसें शक्य दिसत नव्हतें. आणि तें असलें तरी दोन मुलें झाल्यावर संसारांत रमून न जाण्याइतकें तें उत्कट असणें शक्य नव्हतें.

आज कॉलेजांत शाकुंतल शिकवितांना शकुंतलेऐवजीं राहून राहून कुसुमची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढे उभी राहूं लागली. एकदां तर 'शकुंतले'ऐवजीं 'कुसुम' हा शब्दच त्याच्या तोंडून बाहेर पडला. त्याबरोबर उजवीकडल्या बाकावरच्या दोन मुलींनीं आपापसांत नेत्रपल्लवी केली. "आपल्या नव्या प्रोफेसरांचं प्रेम कुसुम या नांवाच्या मुलीवर बसलं आहे हं!" हा त्या नेत्रपल्लवांचा अर्थ रघुनाथाच्या लक्षांत येतांच त्यानें मल्लीनाथी केली, "कुसुम म्हणजे फूल. शकुतला ही वनांत विकसित झालेल्या एखाद्या फुलाप्रमाणं होती. व्यवहारांतल्या कांट्याकुट्यांशीं तिचा कधींच संबंध आला नव्हता म्हणून मीं तिला कुसुम म्हटलं. असलीं फुलं डोक्यावर मिरवायचीं असतात, पायदळीं तुडवायचीं नसतात. पण दुर्दैव दुर्वासाच्या शापासारख्या गोष्टींच्या रूपानं उभं राहतं आणि—"

एखाद्या लहान मुलानें आईला "बाळ कुठून येतं ग?" म्हणून विचारावें, तसें तास संपल्यावर रघुनाथाचें मन त्याला एकच प्रश्न विचारूं लागलें—"कुणाच्या शापामुळें कुसुम दुःखी झाली आहे?"

पूर्वकाळीं शाप द्यायला बिचारे कोपिष्ट ऋषी तरी असत; पण सध्यां—सध्यां माणसांचेच शाप माणसांना भोवत असतात!

कॉलेज सुटतांच रघुनाथ तडक कुसुमच्या घराकडे गेला.

कालच्यासारखी ती एकटीच घरांत होती. कालच्याप्रमाणेंच तिनें चहा केला.

तिनें चहाचा पेला पुढें ठेवल्यावर रघुनाथ म्हणाला, "मी चहा प्यायला आलेलों नाहीं!"

कुसुमनें निर्विकार मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें.

खिशांतून वर्तमानपत्राचा अंक काढून त्यांतली जाहिरात दाखवीत रघुनाथ म्हणाला,

"ही जाहिरात पाहिलीस का?"

"पाठ झाली आहे ती मला."

रघुनाथ स्तंभित झाला

"या दुसऱ्या लग्नाला तुझी परवानगी आहे ?"

कुसुमनें होकारार्थी मान हालविली.

"बायकांना सवत आवडत नाहीं अशी माझी कल्पना होती !"

"ती काव्यातली कल्पना आहे. काव्यांतले अनुभव व्यवहारांत नेहमीं येतातच अस नाहीं !"

"पण हें लग्न झाल्यावर—"

"मी थोडी तरी सुखी होईन !

"तुला वेड तर लागलं नाहीं ना, कुसुम ?" रघुनाथ रागानें उद्गारला.

त्याच्याकडे शांतपणानें पाहत कुसुम म्हणाली,

"रघुनाथ, कांहीं कांहीं वेळा वेड लागणं हें सुद्धां भाग्याचं लक्षण असतं."

ती क्षणभर थांबली. आवंढा गिळून ती पुन्हा बोलूं लागली—

"रघुनाथ, माझं दुःख...तें आईलासुद्धा सांगायचा धीर झाला नाहीं मला ! लाज, अभिमान, राग, काय वाटेल तें म्हण; पण माणसानं आपल्या दुर्दैवाशीं टक्कर मारतांना उगीच आरडाओरडा करूं नये असं मला वाटतं. पण जखमेंत पू फार झाला म्हणजे ती कोणी तरी पिळावी असं वाटतं ना ? तसं झालंय् माझ्या दुःखाचं. तुझ्याशीं बोलून तें मला सांगतां येणार नाहीं ! पण..."

आंतल्या खोलींत झटकन् जाऊन ती एक पत्र घेऊन आली. तें त्याच्या हातांत देत ती म्हणाली, "डॉक्टरपुढं माणूस लाज बाळगत नाहीं. तशीच मांहि तुझ्यासारख्या बाळमित्रापुढं—आज ना उद्यां तुला सारं सांगावं लागणार हें कालच माझ्या लक्षात आलं. म्हणून–"

पुढें तिला बोलवेना.

आलेला हुंदका आंतल्या आंत दाबण्याचा तिनें प्रयत्न केला. पण जाळ मोठा असला म्हणजे उतूं जाणाऱ्या दुधावर पाणी शिंपडलें तरी तें खालीं जात नाहीं. तिच्या दुःखाचेंहि असेंच झालें. तोंड फिरवून ती डोळे पुसूं लागली.

रघुनाथ ते पत्र घेऊन जड पावलांनीं तिच्या घराबाहेर पडला.

× × ×

व्हरांड्यांतल्या आरामखुर्चीतून रघुनाथला टेबलावरील सर्व पुस्तकें दिसत

होतीं—शाकुंतल, मृच्छकटिक, कादंबरी! या सुंदर काव्यमय पुस्तकांतला प्रेमाचा अनुभव आणि त्याच्या हातांत असलेल्या पत्रांतला प्रेमाचा अनुभव—दोन्हींत काय साम्य होतें?

तीं काव्यमय पुस्तकें म्हणत होतीं—प्रेम हे पौर्णिमेचें चांदणें आहे. त्याच्या हातांतलें पत्र तळतळून सांगत होतें—प्रेम हें उन्हाळ्यांतलें भर दुपारचें ऊन्ह आहे!

कालिदास, शूद्रक आणि बाण हसत म्हणत होते—तरुणतरुणींची प्रीति ही फुलबाग आहे. कुसुम स्फुंदत सांगत होता—तरुणतरुणींची प्रीति ही भयंकर आग आहे!

रघुनाथ सुन्न मनानें तें हातांतलें पत्र दुसऱ्यांदा वाचूं लागला—

"रघुनाथ,

काल तूं दारांत दिसलास...नि मला फार आनंद झाला. पण तो क्षणभरच! दुसऱ्या क्षणीं माझ्या मनांत आलं—तुला या कॉलेजांतली जागा मिळाला, हें फार वाईट झालं!

दुःखानं माणसाचें मन दुष्ट होतं का रे?

लहानपणीं पारिजातकाचं फूल म्हणून तूं माझी थट्टा करीत होतास. रघुनाथ, तुला कल्पनाहि नसेल, ती थट्टा तूं करीत नव्हतास; माझं नशीब तुझ्या रूपानं भविष्य सांगत होतं!

कधींहि न कोमेजणारं गुलबकावलीचं फूल होणार होतें मी! पण—दैवानं माझ्या कपाळावर 'प्राजक्त' हींच अक्षरं लिहून ठेवलीं होतीं!

उगीच लांबण लावीत नाहीं. माणूस मेल्यावर त्याचं प्रेत फार वेळ घरांत ठेवीत नाहींत. माझं सुख मेलं आहे. मग आतां त्याला कवटाळून बसण्यांत—

तूं मनांत म्हणत असशील—कुसुमला काय कमी आहे? प्रकृति बरी नसली तर मुंबईचा डॉक्टर विमानानं येईल तिला पाहायला!

एखाद्या घराला बाहेरून चांगला रंग काढलेला असावा; पण आंतल्या भिंती मात्र वाळवीनं पोखरून टाकलेल्या असाव्यात! तसं झालं आहे माझं आयुष्य.

याला कारण माझे पतिराज! लगेच तुझ्या मनांत येईल–हिचा नवरा दारू पीत असेल किंवा बाहेरख्याली असेल. पुस्तकं वाचून माणसांची दुःखं पाहणाऱ्या लोकांना दारू आणि बाई यांच्याखेरीज नवऱ्यांत दुसरं वाईट असं काय दिसायचंय्‌?

पण तुला आश्चर्य वाटेल, दारू आणि बाई या दोन्ही बाबतींत त्यांचे शत्रूसुद्धां त्यांच्याविषयीं शंका घेणार नाहीत!

लिहूं नये असं वाटतं––आपलं गुपित आपल्यापाशींच ठेवावं आणि एके दिवशीं मरून जावं, असं मनांत येतं! पण पुन्हां वाटतं––माझ्यासारख्या किती तरी मुली आंतल्या आंत जळत असतील! किती फुलं अशीं कोमेजून जात असतील! त्यांचं दुःख कुणी तरी वेशीवर टांगायला नको का?

येईल तसं लिहितें––क्षमा कर मला.

लग्नाच्या वेळीं मी गौरीहर पूजायला बसलें तेव्हां पतीच्या प्रेमळ सहवासाचीं आणि पुढल्या सुखाच्या संसाराचीं किती रम्य चित्रं माझ्या डोळ्यांपुढं उभीं राहिलीं होतीं! आम्ही चांदण्यांत फिरायला जाऊं, कविता गाऊं, अवळजवळ जेवायला बसलों कीं हळूच एकमेकांच्या ताटांतले घांस घेऊं. मी त्यांचं फूल होईन आणि ते माझं फूल होतील. कविता, गोष्टी नि कादंबऱ्या वाचून जें जें सुचलं तें तें माझ्या डोळ्यांपुढं उभं राहिलं. 'प्रेम हें अगदीं नाजुक वासाचं सुंदर फूल आहे' असं मनांत म्हणत मीं त्यांना माळ घातली.

पण आमच्या पहिल्याच भेटींत मला कटु सत्य कळलं––प्रेम हें एक उग्र वासाचं फूल आहे असा मला अनुभव आला.

प्रेमांत शरीरसुखाचा भाग आहे हें कळण्याइतकी मी भोळी किंवा ढोंगी नाहीं. पण त्यांच्या प्रेमाच्या कल्पनेंत शरीरसुखापेक्षां दुसरं कांहींच नाहीं! त्यांनीं मला जॉर्जेटचीं पातळं दिलीं नि सुंदर दागिने घातले; पण हा शृंगार माझ्या मनाच्या सुखाकरितां नव्हता. त्यांच्या शरीराच्या सुखाकरितां होता!

मी एक विकत घेतलेली आणि त्यांनीं आपल्या आवडीप्रमाणें शृंगारलेली सुंदर बाहुली आहें अशा दृष्टीनं ते माझ्याकडे चोवीस तास पाहत होते. बाहुलीशीं लहर लागेल तेव्हां मूल खेळतं. तेंहि लहर लागली कीं—

दिवस नाहीं, रात्र नाहीं; वेळ नाहीं, अवेळ नाहीं! गंमत म्हणून माणसं हवा तेव्हां चहा पितात ना? त्यांच्या हिशेबीं—

किती लवकर त्यांची किळस आली मला! माझ्या शरीराचीहि लाज वाटूं लागली मला. एकदां भर दिवसा...काय सांगूं, रघुनाथ? थोरल्या मुलानें आम्हां दोघांना एके ठिकाणीं पाहिलं. त्याच दिवशीं मीं मुलांना मावशीकडे पाठवून दिलं.

त्यांचं माझ्यावरलं प्रेम ही शुद्ध गुलामगिरी आहे माझी! तुरुंगांतल्या कैद्याप्रमाणं माझं आयुष्य झालं आहे. माझं शरीर कधींच मेलं! मनहि मरण्याच्या पंथाला लागलं आहे.

कमळाच्या वेलीचीं मुळं चिखलांत असतात. पण तिचीं फुलं—तीं पाण्यावर उमलतात आणि सूर्यप्रकाशाला कवटाळतात. म्हणून कमळाची वेल आपल्याला आवडते. पण माझ्या पतीचं प्रेम—नुसता चिखल! सूर्यप्रकाश कुठंच नाहीं! असल्या चिखलांत जगण्यापेक्षां—कुजण्यापेक्षा...

पुरुषाच्या पशुत्वाला जगांतल्या लाखों बायका दररोज बळी पडताहेत! त्यांतलीच मी एक. पण त्याच्या या पशुत्वावर लग्नाचा नि पावित्र्याचा केवढा मोठा छाप आहे!

या तुरुंगांतून सुटून जाण्याचा एक मार्ग दिसूं लागला. मी विरोध करूं लागलें. माझ्या बंडखोरीला कंटाळूनच त्यांनीं दुसऱ्या लग्नाची जाहिरात दिली आहे.

त्यांचं दुसरं लग्न झालं तर मी सुटेन! पण ती दुसरी मुलगी—

तिचा बळी देऊन मी सुखी होऊं? एका पारिजातकाच्या फुलाचा चोळामोळा झाला; आतां दुसऱ्याचा..."

रघुनाथानें मोठा सुस्कारा सोडून हातांतलें पत्र पुढ्यांतल्या टी-पॉयवर ठेवलें

आणि आंतल्या टेबलावरल्या पुस्तकांकडे वळून पाहिलें; जणूं कांहीं तो बाण, कालिदास व शूद्रक यांना विचारीत होता–"तुम्हीं रंगविलेलं प्रेम हें अर्धसत्य आहे. होय ना?"

बॉयनें टी-पॉयवरल्या पत्रावर बागेतल्या पारिजातकाचीं फुलें आणून ठेवलीं.

रघुनाथ म्हणाला, "हीं फुलं आवडत नाहींत मला. उद्यां कुठं गुलाबाचीं फुलं मिळालीं तर बघ।"

# गुलाबांचे काटे

२

दारावरल्या पाटींतलीं 'आहेत' हीं अक्षरें बदलून 'नाहीत' अशीं केलीं आणि मी जिन्याच्या पायऱ्या चढूं लागलों. पाटींतला हा बदल चित्रगुप्ताच्या वहींत माझ्या 'पापा'च्या खात्यांत जमा होणार याची मला खात्री होती. पण तो केल्याशिवाय दुसरी गतीच नव्हती मला! मुंबईत मी तब्बल महिना काढला होता या एका महिन्यांतलीं तुंबून राहिलेलीं सारीं कामें उरकायला दिवस पंचवीस तासांचा झाला तरी मला हवाच होता. तेव्हां—

मी तिसऱ्या मजल्यावरल्या माझ्या खोलीकडे वळलों. दार उघडतां उघडतां सहज मागे वळून पाहिलें मी. आठहि कुंड्यांतलीं गुलाबाचीं झाडें खूप वाढलीं होतीं. पण या आठ कुंड्यांत एकसुद्धा फूल दिसत नव्हतें.

मुंबईला जाण्यापूर्वी या कुंड्यांतलीं फुलें प्रत्येक दिवशीं मला मूक समाधान देत असत. सकाळीं उठून खोलीचें दार उघडलें कीं एका ना एका झाडावर गुलाबाचें सुंदर फूल उमललेलें दिसे. पूर्वेकडल्या अरुणोदयाचें सर्व सौंदर्य जणूं कांहीं त्या चिमुकल्या पुष्पाच्या हंसणाऱ्या पाकळ्यांत साठविलेलें आहे असा मला भास होई.

उठल्याबरोबर उमललेलें फूल दृष्टीला पडलें कीं मला वाटे—माझा

आजचा दिवसहि असाच फुलणार आहे, हंसणार आहे; सुगंधानें दरवळून जाणार आहे.

पण आज त्या आठ झाडांपैकीं एकावरहि फूलच काय, पण चिमुरडी कळीसुद्धां दिसत नव्हती! मात्र एका महिन्यांत झाडांच्या फांद्या बऱ्याच विस्तारल्या होत्या. तसें म्हटलें तर फुलांतलें मला कांहीं कळत नाहीं; पण माझ्या मनात चटकन् एक विचार येऊन गेला—झाडाची सारी शक्ति पानाच्या पोषणात खर्च झाली म्हणजे त्याला फूल येत नसावें.

लगेच वनस्पतिशास्त्रांतल्या स्वतःच्या या शोधाचें मला हंसूं आलें. मात्र 'माळ्याला बोलावून हीं गुलाबाचीं झाडें लवकरच व्यवस्थित कापून घेतलीं पाहिजेत.' असें मीं मनाशीं ठरविलें.

खोलींतल्या बैठ्या टेबलापाशीं बसून गेल्या महिन्यांतला सारा पत्रव्यवहार मी चाळूं लागलों. इतक्यांत खालून कुणाचा तरी आवाज आला, "खांडेकर आहेत का?"

आवाज ओळखीचा तर नव्हताच; पण तो थोडासा कठोरहि होता. मीं मनांत म्हटलें—या गृहस्थाला अक्षरओळख असली तर फार बरें होईल. म्हणजे पाटीवरलीं 'नाहींत' हीं अक्षरें वाचून स्वारी मुकाट्यानें निघून जाईल!

पण आपल्या ज्ञानाचा उपयोग न करण्याचेंच त्यानें ठरविलें असावें. खालीं त्याचें नि गड्याचें इतक्या उच्च स्वरांत संभाषण चाललें होतें, कीं त्यांतला शब्द न् शब्द मला ऐकूं येत होता.

तो अपरिचित गृहस्थ म्हणत होता, "मीं पोलिस खात्यांत दहा वर्षें काढलीं आहेत. मला या सगळ्या युक्त्या ठाऊक आहेत. खऱ्यापेक्षां खोटंच जगांत जास्ती असतं! जा, तुझ्या साहेबांना जाऊन साग जा, कीं—"

गडी गोंधळून गेला असावा. पोलिस खात्यांतले कोण सद्गृहस्थ मुद्दाम आपल्या भेटीला आले आहेत हें जाणण्याची इच्छा माझ्याहि मनांत प्रबळ झाली होती. मींच गड्याला हांक मारून म्हटलें, "ते कोण पाहुणे आलेत, त्यांना वर लावून दे."

पोलिस खातें म्हटलें कीं भरदार आणि आकडेबाज मिशा, बांकडी टोपी, हातांत एखादी छडी, विड्यानें रंगलेले ओठ, डोळे थोडेसे तारवटलेले-अशा

प्रकारचें चित्र माझ्या डोळ्यांपुढें उभें राहतें. पण जिना चढून जो मनुष्य माझ्यापुढें उभा राहिला, त्याच्यापाशीं यांपैकीं कुठलेंच भांडवल नव्हतें! ' मी प्रोफेसर आहें.' असें त्यानें सांगितलें असतें, तरी मीं तें मुकाट्यानें मान्य केले असतें!

अपरिचित मनुष्याशीं बोलायला सुरुवात करणें हें एखाद्या नव्या चालीवर पद करण्याइतकेंच कठीण असतें. पदाला सुरुवात करतांना कांहीं केल्या मनासारखे सुंदर शब्द जसे एकदम सुचत नाहींत, त्याप्रमाणें ओळख नसलेल्या मनुष्याशीं बोलताना कोणता प्रश्न विचारला असतांना त्याला आवडेल, हेंच माणसाला कळत नाहीं. पूर्वींच्या काळीं प्रवासाचीं साधनें नसल्यामुळे हवा-पाण्याच्या गोष्टींत नावीन्य असे. परंतु हल्लीं हवापाण्याच्याच काय, पण लढाईच्या गोष्टीसुद्धां शिळ्या वाटतात. सकाळच्या वर्तमानपत्रांत त्या प्रत्येकानें वाचलेल्या असतातच कीं!

मीं माझ्या पाहुण्याकडे पाहूं लागलों. गृहस्थ चांगला उंच होता. सहा फूट नसला तरी पांच फूट अकरा इंचांत कमी भरला नसता. वर्णानें तो सांवळाच दिसत होता. पण त्याचा चेहरा मात्र त्या मानानें गोरा होता. त्यामुळें कमळाच्या पानांमधून डोकावणाऱ्या पांढऱ्या शुभ्र कळीशीं माझ्या मनानें चटकन् त्याची तुलना केली, आणि ही कळीची उपमा शोभून दिसावी असा फुगीरपणाहि त्याच्या मुद्रेला होता. त्या फुगीरपणाचें कारण परकेपणामुळें त्यानें मुद्दाम धारण केलेलें गांभीर्य होतें, कीं त्याच्या ओठांची ठेवणच तशी होती—

एकदम माझी दृष्टि त्याच्या खालच्या ओठाकडे गेली. मी चपापलों. कामशास्त्रावरल्या एकदोन पुस्तकांत वाचलेलें वर्णन मला आठवलें. ज्याचा खालचा ओठ—

बोलण्याकरितां पाहुण्यांचे ओठ हालूं लागल्यामुळें मला माझें निरीक्षण अर्धवट सोडून देऊन वाचनाचा पडताळा पाहण्याची ही अपूर्व संधि गमवावी लागली.

आलेले गृहस्थ आपलें नांवगांव वगैरे सांगून मग इतर गोष्टींविषयीं बोलतील अशी माझी अपेक्षा होती. मी मनांत म्हणत होतों–नट म्हणून पडद्यावर

चमकण्याची तर या गृहस्थाची इच्छा नसेल ना ? हो, पोलिस म्हणून अंधारात काम करण्यापेक्षां नट म्हणून अंधारांत–

त्या गृहस्थांनीं मला पहिलाच प्रश्न केला, "तुम्ही ज्या गोष्टी लिहितां त्या घडलेल्या असतात कीं–"

त्यानें आपलें वाक्य पुरें केलें नाहीं. पण त्याच्या बोलण्याचा रोख मला कळला. माझ्या गोष्टींत कल्पनेचा खेळ असतो कीं वस्तुस्थितीचें प्रतिबिंब असतें, याचें उत्तर त्याला हवें होतें. या बाबतींत माझ्या आवडीचीं दोन उदाहरणें मला चटकन् सुचलीं. एक इब्सेनचें नि दुसरें तात्यासाहेब कोल्हटकरांचें. आपल्या हक्काकरितां नवऱ्याशीं भांडणारी जी नोरा इब्सेननें निर्माण केली तिचें मूळ एका विलासी स्त्रीनें चेकवर केलेल्या खोट्या सहींत आहे, आणि कोल्हटकरांना मूकनायकाचें कथानक सुचलें तें मदिराक्षीला मदिरेचा मत्सर वाटलाच पाहिजे या चमत्कृतिपूर्ण कल्पनेवरून !

हीं उदाहरणें देऊन 'कलेची निर्मिति' या विषयावर एखादें लांबलचक व्याख्यान माझ्यासमोर बसलेल्या पाहुण्यांना सुनावण्याची लहर मला आली होती. पण दोन अडचणींमुळें माझें व्याख्यान मला मनांतल्या मनांतच ठेवावें लागलें. पहिली अडचण ही, कीं माझा श्रोता पोलिस खात्यांतला होता. त्यामुळें इब्सेन लाब राहिलें, पण कोल्हटकर हें नांवसुद्धां त्याच्या कानांवरून गेलें असण्याचा संभव नव्हता. आणि दुसरी गोष्ट–तो म्हापणकरांच्या भविष्याकरितां 'धनुर्धारी' विकत घेत असला तरी, अलीकडे त्यांत आलेल्या कलानिर्मितीच्या चर्चेनें तो आधींच बेजार होऊन गेला असला पाहिजे.

हे विचार मनांत येतांच मी स्वतःशींच हंसलों. पण माझ्या हंसण्याचा पाहुण्यांनीं मात्र विपरीत अर्थ केला. स्वारी थोडीशी चवताळलेली दिसली.

किंचित् रागीट स्वरानें तो म्हणाला, "मला कसं बनवावं याचा विचार करींत असाल तुम्ही ! पण—"

मी आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागलों. मुद्रेवर उसन्या हास्याचें प्रदर्शन करीत तो उद्गारला, "मी पोलिस खात्यांतला मनुष्य आहें. बनावट जबाब आम्हांला हां-हां म्हणतां ओळखतां येतो !"

पहारेकऱ्याच्या हातावर तुरी देऊन वेड्याच्या इस्पितळांतून निसटलेला

मनुष्य तर माझ्यासमोर बसला नाहीं ना, अशी शंका माझ्या मनांत येऊन गेली. पण लगेच त्यानें आपले खिसे चाचपायला सुरवात केली. डाव्या खिशांतून त्यानें एक पाकीट काढलें. थोडेंसें जाडजूडच होतें तें; लगेच तें जागच्या जागीं परत ठेवून त्यानें उजव्या खिशांत हात घातला. कुठल्या तरी मासिकांतले फाडलेले कागद होते ते. ते माझ्यापुढें टाकून तो म्हणाला, "ही गोष्ट तुम्हीं कुणावरनं लिहिलीत ?"

त्यानें टाकलेले कागद उचलून मीं गोष्टीचें नांव वाचलें–'पारिजातकाचीं फुलें.' नुकतीच 'किर्लोस्कर'मध्यें प्रसिद्ध झालेली माझी गोष्ट. कोळी जसें जाळें विणतो, त्याप्रमाणें नुसत्या स्वतःच्या कल्पनेच्या तंतूंनीं कांहीं मीं गोष्ट लिहिली नव्हती. तिला सत्यसृष्टींतला आधार होता. पण—

पण त्या आधाराशीं माझ्यासमोर बसलेल्या या अनोळखी सद्गृहस्थाला काय करायचंय् तें मला कळेना! त्याला मीं जन्मांत पाहिलें नव्हतें. त्याचें नावगांव–एका अक्षरानेंहि त्याची माहिती नव्हती मला! मग—

मी उत्तर देण्याच्या आधींच तो तावातावानें बोलूं लागला, "ही गोष्ट तुम्हीं माझ्यावरनं लिहिली आहे. हिच्यांतला तो संस्कृतचा प्रोफेसर रघुनाथ तुम्हीं आपल्या पदरचा घातला असेल; पण बाकी सारं अगदी जस्संच्या तस्सं आहे! अहो, पोलिस इन्स्पेक्टरचा कापड-दुकानदार केला म्हणून कांहीं इतर गोष्टी कुठं लपत नाहींत!"

त्याचें समाधान करण्याकरितां मी मध्येंच म्हणालों, "पण हें पाहा—"

"तुम्ही काय सांगणार तें ठाऊक आहे मला. जरा स्पष्ट बोललों म्हणून रागावूं नका हं. चोराइतका सावाचा आव दुसरा कुणीच आणीत नाहीं! नित्याचा अनुभव आहे हा आमचा."

त्याच्या या बोलण्याचा मला राग आला. पण वरकरणी हंसत हंसत मीं म्हटलें, "पोलिस खात्यांतल्या लोकांना चोराखेरीज दुसऱ्या कसल्या उपमा सुचणार?"

"त्या उपमा नि अलंकार तुमचे तुम्ही पाहून घ्या. आला दिवस आमचा एकाच अलंकाराशीं संबंध येतो. तो म्हणजे हातापायांतल्या बेड्या!"

आपण मोठा विनोद केला अशा समजुतीनें तो गृहस्थ हंसला. पण उर्

जाणाऱ्या बुधावर थंड पाण्याचा हबका बसावा, त्याप्रमाणें माझ्याकडे दृष्टि जातांच त्याची स्थिति झाली.

मात्र पोलिसाचा कधींच पराभव होत नाहीं, हा अनुभव मला लगेच आला. स्वारीनें पुन्हां उजव्या खिशांत हात घालून वर्तमानपत्राचें एक कात्रण बाहेर काढलें नि तें माझ्या हातांत दिलें.

मी ती जाहिरात वाचूं लागलों—

## वधू पाहिजे

सुंदर, सुदृढ, सुशिक्षित. वराचें वार्षिक उत्पन्न दीड हजार रुपये. शिवाय शेतीवाडी. पहिली बायको हयात. तिचीहि या लग्नाला संमति आहे.

क्ष, C/o विश्वसेवक कार्यालय,
नाशिक.

ही जाहिरात वाचतां वाचतां माझ्यावर या पोलिसबहादुरांनीं हल्ला कां चढविला, याची मला अंधुक कल्पना आली. माझ्या गोष्टींतली जाहिरात जवळजवळ अशीच होती!

मीं कागदावरून दृष्टि वर करतांच तो बोलूं लागला, "गेले सहा महिने 'विश्वसेवकां'त माझी जाहिरात येतेय्, तीच तुम्हीं आपल्या गोष्टींत दिली आहे. उत्पन्न तेवढं दीड हजाराचं तीन हजार केलंय्! तें तुम्हीं दहा हजार सुद्धां केलं असतं! हो, त्यांत कांहीं लेखकाच्या पदरची पैसुद्धां खर्च होत नाहीं!"

'मीं माझी गोष्ट तुमच्यावरून लिहिलेली नाहीं' हें या सद्गृहस्थाला कसें समजून सांगावें या विचारांत मी पडलों. इतक्यांत तोच बोलूं लागला, "सहा महिने जाहिरात देऊन कांहीं जमेना, तेव्हां फोन काढून स्वतः बाहेर पडलों. परवां आगगाडींत तुमची ही गोष्ट वाचली. तेव्हां म्हटलं—दोनतीन मुली पाहायला कोल्हापूरला जायचंच आहे. जातां जातां या खांडेकरांना

पाहून घेऊं! काल मी तुमची चौकशी करून गेलों होतों; पण तुम्ही मुंबईहून आलां नाहीं असं कळलं—"

डाव्या खिशांत हात घालून स्वारी काय शोधीत होती कुणास ठाऊक! पण गृहस्थाच्या आवाजांत मघाचा आवेश उरलेला नाहीं हें मीं ओळखलें. मी भेटणार नाहीं या कल्पनेनेंच मघाशीं त्यानें पाटीवरल्या 'नाहींत' या अक्षरावर टीका केली असावी! पण माझ्यासमोर येतांच—अंतःपुरांत वीरश्रीच्या गोष्टी करणारा उत्तर रणांगणावर थरथर कांपूं लागतो, हा अनुभव कांहीं नवीन नाहीं! ही कल्पना मनांत घोळत असतानाच त्यानें संतापाच्या भरात आपली सर्व हकीगत मला सांगितली असती तर बरें झालें असतें असें मला वाटूं लागलें. हो, ज्योतिष्यांना एक नवा ग्रह सांपडला की जो आनंद होत असेल, तोच लेखकांना एका नव्या माणसाच्या अंतःकरणांतल्या अगदीं चोरकप्प्यांत जायला मिळालें म्हणजे होतो. मनुष्याच्या अंतःकरणाचें यथार्थ वर्णन करायचें झालें तर मी म्हणेन, ती एक गुहा आहे—साधी गुहा नाहीं, अलीबाबाला जिच्यांत केवळ दैवयोगानें प्रवेश करतां आला त्या चोरांच्या गुहेसारखी—

पाहुणे बोलूं लागले होते, "माझी खात्री आहे, कीं तुम्हीं माझी ही जाहिरात वाचलीत, कुणाकडून तरी अर्धवट माहिती मिळविलीत नि ही गोष्ट लिहिलीत."

मीं नकारार्थी मान हालविली. पण त्याचें तिकडे लक्षच नव्हतें. तो म्हणाला, "तुम्हां लेखकांना बायकांच्या दुःखाचा नेहमीं पुळका येतो. पण पुरुषांनाहि दुःखं असतात, हें—"

आतां आपल्याला हवी असलेली हकीकत ऐकायला मिळणार म्हणून मी मोठ्या उत्कंठेनें पाहूं लागलों. पाहुण्यांनींहि डाव्या खिशांत कांहींतरी चुळबूळ करीत आपले ओठ हलविले.

इतक्यांत गडी खालून टपाल घेऊन वर आला. पत्रावरून झरकन् नजर फिरवून मी पाहुण्याकडे पाहूं लागलों. पण मघांच्या भरतीचें रूपांतर आतां ओहटींत झालें होतें. माझ्या पुढ्यांत पडलेल्या पत्रांतल्या वरच्याच पाकिटाकडे स्वारी स्थिर दृष्टीनें पाहत होती.

क्षणभर थांबून त्यानें मला प्रश्न केला, "हें पत्र कुणाचं आहे?"

चेहरे आणि अक्षरें यांच्या थोडयाशा परिचयावरूनसुद्धां आपणाला माणूस ओळखतां येतें. मीं त्या पाकिटावरल्या अक्षरांकडे बारकाईनें निरखून पाहिलें; पण तें पत्र कुणाचें असावें याचा कांहीं तर्क करतां येईना मला!

पाहुणे माझ्याकडे रोखून पाहत म्हणाले, "अगदीं माझ्या बायकोसारखं अक्षर आहे हे!"

आतां मला राहवेना.

मीं पाकीट फोडून खालची सही वाचली—"एक भगिनी—"

तिकिटावरला पोस्टाचा शिक्का पाहिला—Na...... पुढें सारें अस्पष्ट होतें. नाशिक असेल किंवा नागपूरहि असेल!

"काय म्हणतेय् तुमची भगिनी?" पाहुण्यांनीं प्रश्न केला.

"तिनं माझं अभिनंदन केलंय्—'पारिजातकाची फुलं' या गोष्टीसाठीं!"

"तुम्हांला वाचायला वेळ असेल तर माझ्या डायऱ्या मी तुम्हांला पाठवून देईन. त्या वाचल्या म्हणजे स्त्रिया हीं पारिजातकाची फुलं असून पुरुष त्यांचा पदोपदीं चोळामोळा करीत असतात हें सहज तुमच्या लक्षांत येईल..." वगैरे गोष्टी माझ्या या अपरिचित भगिनीने लिहिल्या होत्या. पण त्या सांगितल्या तर समोरचे पाहुणे हे एकदम मेहुणे ठरून अधिक गोंधळ होईल म्हणून मी गप्प बसलों.

मीं पत्र पाकिटांत घालून टेबलावर ठेवतांच पाहुणे
"न्यायाधिशानं निकाल द्यायच्या आधीं दोन्ही बाजूचं म्हणणं ऐकून घ्यायला हवं. तेव्हां..."

त्यानें डाव्या खिशांतून एक जाड पाकीट माझ्या हातांत दिलें आणि खुर्चीवरून उठत उठत तो म्हणाला, "आजहि तुम्ही भेटणार नाहीं असं वाटून हें पत्र मी लिहून आणलं होतं. तें—"

पुढें कांहीं न बोलतां त्यांनीं मला नमस्कार केला आणि मागें वळूनसुद्धां न पाहतां तो खोलीबाहेर पडून जिन्यावरून उतरूनसुद्धां गेला. माझ्या मनांत आलें—किती आकस्मिक रीतीने हा मनुष्य आला नि गेला! जणूं कांहीं एखादा धूमकेतूच!

धूमकेतूचा उदय जगाच्या परिस्थितींत मोठमोठे बदल घडवून आणतो.

अशी एक समजूत आहे. ती आठवून मला वाटलें—माझ्या मनांत क्रांति करणारा कांहीं मजकूर तर या विचित्र मनुष्याच्या पत्रांत नसेल ना?

मोठ्या उत्सुकतेनें मीं तें पत्र फोडलें. माझी गोष्ट—तिच्यांतली जाहिरात—ही गोष्ट स्वतःची हकीकत कर्णोपकर्णी ऐकून लेखकानें लिहिली आहे, ही त्या गृहस्थाची समजूत—माझी दृष्टि भरभर पुढें जात होती. ती एकदम एका जागीं खिळली.

"..............आयुष्य हा तलख कल्पनेचा खेळ नाहीं किंवा नाजुक भावनेचा नाच नाहीं. तुमच्यासारख्या लेखकांना माणसं आहेत तशीं दिसतच नाहींत—निदान आहेत तशीं रंगवितां येत नाहींत. कुठं अधिक सफेती दे, कुठं अधिक काळा रंग फांस, असं केल्याशिवाय तुम्हांला चैनच पडत नाहीं. मी लेखक नाहीं. एक साधा मनुष्य आहें. या साध्या मनुष्याचे साधे अनुभव मी तुम्हांला सांगत आहें. ते सांगतांना मला संकोच वाटत नाहीं, असें नाहीं. पण संकोचानं साधीं माणसं गप्प बसलीं, कीं लेखक हवेंत कल्पनेचे मनोरे उभारूं लागतात आणि—तुम्हांला सांगण्याचा मला अधिकार नाहीं; पण सांगतोंच. खांडेकर, माणसं हवेंतल्या मनोऱ्यावर जिवंत राहूं शकत नाहींत; तीं जमिनीवरल्या बंगल्यांत, घरांत, प्रसंगी झोपड्यांतसुद्धां सुखानं जगतात.

खांडेकर, तुमची गोष्ट वाचून माझ्या मनांत जे विचार आले ते सारे लिहायला लागलों तर एक ग्रंथ होईल! मनाचे ते सारे कढ—

जाऊं दे! सारं चऱ्हाट वाचण्याचा तुम्हांला कंटाळा येईल. पण माझ्या मनांत आलेली एक कल्पना सांगतोंच. लेखक आणि पोलिस यांच्यांत साम्य शोधणाऱ्या मनुष्याला मीं पूर्वी वेड्यांत काढलं असतं. मात्र तुमची गोष्ट वाचल्यापासून मला वाटायला लागलंय्—लेखक हे पोलिसासारखेच असतात. इकडला-तिकडला पुरावा गोळा करून पोलिस निरपराधी माणसालासुद्धां गुन्हेगार ठरवितात ना? तुम्ही लेखकहि तेंच करतां! 'पारिजातकाचीं फुलें' या गोष्टीत तुम्हीं तेंच केलें आहे. त्या गोष्टींतला नवरा निरापराधी आहे! पहिली बायको जिवंत असतांना त्यानं दुसऱ्या लग्नाची तयारी चालविली असली, तरी त्यांत त्याचा कांडीचाहि दोष नाहीं! सारा दोष—

माझीच हकीकत सांगतों म्हणजे तुमची खात्री होईल.

मी एका शाळामास्तराचा वडील मुलगा आहे. माझा पिंड मूळचाच सुदृढ. शाळेंत असतांना मला पोहण्याची नि व्यायामाची खूप आवड होती. त्या वेळीं अंगांत अशी रग होती म्हणतां! शरीर हें जणूं कांहीं एखादं विजेचं यंत्र आहे असं मला वाटे. भावी आयुष्याविषयींचीं विलक्षण स्वप्नं मला त्या वेळीं पडत. आपण कोलंबसाप्रमाणं एका गलबतांत बसून अफाट समुद्रांतून जात आहों, किंवा उत्तर ध्रुवावर जाणाऱ्या धाडसी संशोधकाप्रमाणं—

आयुष्यांत खरीं ठरणारीं स्वप्नं फार थोडीं असतात! आणि हिंदुस्थानांत तर हजारांतलं एकसुद्धां स्वप्न खरं होत नसेल!

इंग्रजी सातवींत असतांना कोलंबस होऊं इच्छिणारा मुलगा मॅट्रिक होतांच नाशिकच्या पोलिस ट्रेनिंग स्कूलमध्यें दाखल झाला. माझ्या वडिलांनीं मोठ्या मिनतवारीनं मला तिथं प्रवेश मिळवून दिला होता. एक तर बी. ए., एम्. ए.चा खर्च त्यांना झेपणं अशक्य होतें आणि दुसरं एम्. ए. होऊन पन्नास एके पन्नास करीत जन्म घालवायला मी तयार असलों तरी, त्यामुळं माझ्या सोन्यासारख्या भावंडांचं आयुष्य मातीमोल झालं असतं.

हें सारं कळत असल्यामुळ मी पोलिस ट्रेनिंग स्कूलमधें मोठ्या आनंदानं गेलों. शाळेच्या संमेलनांतला दुष्यंत राजा सब्-इन्स्पेक्टर होण्याच्या स्वप्नांत गुंग होऊन गेला!

माझे मधले अनुभव–तुम्हांला त्यांत गंमत वाटणार नाहीं! पण एकच गोष्ट सांगतों. पोलिसाचं व्यसनाशीं अगदीं जवळचं नातं असतं, अशी समजूत आहे. ती अगदीं खोटी आहे असं मी म्हणत नाहीं; पण माझ्या वडिलांनीं लावलेल्या शिस्तीमुळं असो, अथवा आईच्या धार्मिक वळणामुळं असो, नोकरी लागून तीनचार वर्षं झालीं तरी मीं दारूला स्पर्श केला नव्हता. मी दोनच गोष्टींत वाडवडिलांनीं घालून दिलेली मर्यादा ओलांडली होती–एक मांसाहार आणि दुसरं धूम्रपान.

याच वेळीं माझं लग्न झालं. मुलगी थोडयाफार बडया घराण्यांतली होती. त्यामुळं माझ्या आईबापांना स्वर्ग अगदीं दोन बोटं राहिलासं वाटलं.

त्यांनाच काय, पण मलासुद्धां त्या वेळीं तसंच वाटलं. मुलगी नाजुक

पण सुंदर होती. स्त्रीसुखासाठीं हपापलेल्या माझ्या मनानें आतांपर्यंत ती तहान शृंगारिक कादंबऱ्या नि चित्रपट यांच्यावरच भागविली होती. चित्रपटांतल्या एखाद्या नायिकेप्रमाणं दिसणाऱ्या विमलला पाहून—

पण पडद्यावर मोहक दिसणाऱ्या नटी घरीं पाहिल्या कीं मनाचा मोठा विरस होतो ना ? तशीच लग्नानंतर वर्ष दीड वर्षानं माझी स्थिति झाली ! मी रूपाच्या दृष्टीनं असंतुष्ट नव्हतों. पण—

खांडेकर, तुम्हां लोकांना नाजुक गोष्टी नटवून सजवून मोहक करतां येतात. माझा पडला पोलिशी खाक्या. मला कदाचित् तें साधणार नाहीं. माझ्या लिहिण्याला हवं तर निर्लज्जपणा म्हणा, पण मला असं वाटतं–ढोंगीपणापेक्षां निर्लज्जपणा शंभर पटींनीं चांगला !

नाटकं, कादंबऱ्या यांतल्या प्रेमासारखं आमचं प्रेम नव्हतं हें पहिल्यांदाच तुम्हांला सांगून टाकतों. तें असणार तरी कसं ? आम्हां दोघांनीं एकमेकांना पूर्वी कधींहि पाहिलं नव्हतं. आमचे स्वभाव एकमेकांना ठाऊक नव्हते. मी एक मिळवता तरुण होतों. विमल ही एक सुंदर तरुण स्त्री होती. यामुळंच प्रेमळ पतिपत्नी होणं हें आमचं ध्येय होतं. पण कुठलंहि ध्येय हें पर्वताचं शिखर असतं. शिखर आणि पायथा यांच्यांत...

जाऊं दे ! मला काव्य करायचं नाहीं. तुम्हाला सत्य सांगायचंय्. कोर्टांत अगदीं ' ईश्वरसाक्ष ' म्हणतात ना ? तशी शपथ घेऊन खऱ्याखुऱ्या गोष्टी मी तुम्हांला सांगणार आहे.

लग्नानंतरचं पहिलं वर्ष दीड वर्ष मी सुखी आहें असं मला वाटे. पण त्या सुखामध्येंहि एक प्रकारची अतृप्ति होती. एखादं सुंदर फूल आपल्या हातांत असावं, त्याच्या वासानं धुंद होण्याकरितां मन उत्सुक व्हावं, पण काहीं केल्या त्या गोड धुंदीचा मात्र अनुभव येऊं नये, तसं मला होत होतं. मी सुखी आहें असा मला भास होई खरा; पण तें खरं सुख नव्हतं. कोणत्याहि नवीन गोष्टीची मनाला जी भूल पडते तिचाच तो एक प्रकार होता.

एक गोष्ट लवकरच माझ्या लक्षांत आली. ज्याला आपण पतिपत्नींचं प्रेम म्हणतों तें पुष्कळ वर्षांच्या सहवासानंतर उदात्त अथवा निरपेक्ष होतं असेल; पण पतिपत्नींच्या प्रेमाचा पहिला दुवा शारीरिक आकर्षण हाच आहे.

ग्नानंतर परस्पराविषयींच्या ज्या विलक्षण आसक्तीनं मन धुद होऊन जातं तिचा मुख्य भाग शरीरसुख हाच असतो. ही आसक्ति पतीइतकीच पत्नीलाहि वाटायला हवी.

पण—

विमलचा मला विपरीत अनुभव येऊं लागला! माझ्या स्पर्शानं तिला गुदगुल्या झाल्या पाहिजेत असं मला वाटे. पण अनेकदा ती अगदीं थंड राही आणि मधूनमधून त्याच्याविषयीं तिरस्कारहि दाखवी.

तिच्या या थंडपणामुळं माझ्या मनाचा हरघडी विरस होऊं लागला. एखाद्या खेळांत आपण रंगून जावं आणि आपल्या जोडीदारानं मात्र पेंगत असावं! असा खेळ खेळण्याची हौस कुणाला वाटणार?

शरीरसुखाविषयी तिला उदासीनता कां वाटावी, हे मला कांहीं केल्या कळेना. विमलला विचारावं तर—"

एके दिवशीं विचारण्याचा अगदीं निश्चय केला मी. पण त्याच दिवशीं एक इंग्लिश कादंबरी मीं वाचली. तिच्यात पहिल्या प्रियकराच्या स्मृती-मुळं नवऱ्याशीं उदासीनतेनं वागणाऱ्या एका स्त्रीचं चित्र रंगविलं होतं.

ती कादंबरी वाचल्यावर विमलशीं या बाबतींत मोकळेपणानं बोलण्याची इच्छाच मला झाली नाहीं!

पण तिच्या या उदासीनतेमुळं मी चिडखोर होत चाललों होतों. आणि एके रात्रीं—

क्षमा करा हं! मी सांगतों हा अनुभव कदाचित् प्रत्येकाला येत असेल. कदाचित् तो माझ्या मनाचा विचित्र रोग असेल. पण डॉक्टराकडे गेल्यावर कांहींहि लपवूं नये म्हणतात ना? तसं—

त्या रात्रीं एका जुगारी अड्ड्यावर छापा घालायला आम्ही गेलों होतों. अशा वेळीं माणसाच्या मनावर किती ताण पडतो याची तुम्हांला कल्पना करतां येणार नाहीं. लढाईवर जाणारा शिपाई किंवा शस्त्रक्रिया करणारा डॉक्टरच त्याचं वर्णन करूं शकेल.

आमचा छापा यशस्वी झाला. त्या छाप्यांत एक सुंदर नायकीण सांपडली. 'माणूस' चित्रपटांतला पहिला प्रवेश आहे ना? अगदीं तस्सा प्रसंग होता तो.

ती खरोखरीच सुंदर होती. तिच्याकडे पाहतांच माझं मन—

विमलला त्रास होऊं नये म्हणून तिच्यापासून कितीतरी दिवस मी दूर राहिलों होतों. त्यामुळं एक प्रकारच्या असमाधानानं—अतृप्तीनंच म्हणा ना—मी अगदीं अस्वस्थ झालों होतों.

मला न मिळालेलं सुख माझ्यापुढं मूर्तिमंत उभं होतं.

पण—

मला देवधर्माची आठवण झाली नाहीं किंवा पुस्तकांतले नीतिनियमहि माझ्या डोळ्यांपुढं उभे राहिले नाहीत. पण—

विमल मात्र माझ्या डोळ्यांपुढं उभी राहिली.

मोसाट्याच्या वाऱ्यावर उडणाऱ्या पतंगाला एखाद्या बारीक दोरीनं मागं खेचावं, त्याप्रमाणं माझ्या बेफाम झालेल्या मनाला तिनं मागं ओढलं.

ती नायकीण तत्काळ सुटली. सुटली म्हणजे माझ्या बरोबरीच्या दुसऱ्या पोलिस ऑफिसरनं तिला सोडवली! दया येऊन नव्हे, तर तिच्यावर खूष होऊन! 'माणूस' चित्रपटांत तुम्हांला हा प्रसंग कधींच दिसला नसेल. दिसणार तरी कसा? आमच्या चित्रपटांत काय किंवा आमच्या कथा-कादंबऱ्यांत काय, खऱ्याखुऱ्या गोष्टी लपवून ठेवण्याचाच प्रघात आहे. जणूं कांहीं सत्य हें एक प्रेत आहे! त्याचा भेसूरपणा कृत्रिम ध्येयाच्या फुलांनीं झांकलाच पाहिजे.

तो पोलिस ऑफिसर त्या नायकिणीला घेऊन गेला तेव्हांची माझी मनःस्थिति—

सुखासुखी ती मला मिळत होती. पण—

माझ्या विमलला मला फसवायचं नव्हतं.

मी घरीं आलों तेव्हां शृंगारिक कल्पनांनीं नि विलासी विचारांनीं माझं मन अगदीं भरून गेलं होतं.

मीं विमलला हांक मारली. नुसतं 'उं...' करून ती या कुशीवरून त्या कुशीवर वळली. मला थोडा राग आला. आज रात्रीं तीन वाजे-पर्यंत मीं जागरण केलं होतं, ते काय केवळ माझ्या सुखासाठीं?

मीं तिला जागं करण्याचा प्रयत्न केला. ती चरफडत उत्तरं देऊं लागली. आणि पुढं—

माझी लाचारी आणि तिची बेफिकिरी या दोन्हींत अधिक विचित्र काय होतं, हें अजूनहि मला सांगतां येत नाहीं.

तिच्या उदासीनतेनं चिडून जाऊन खालीं गुंडाळून ठेवलेल्या एका वळकटीला मी लाथ मारली आणि अस्ताव्यस्त पसरलेल्या त्या अंथरुणांत मी चडफडत पडलों.

पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणं मीं तळमळत होतों.

विमल माझी समजूत घालायला येईल अशी माझी कल्पना होती. पण हट्ट करणाऱ्या एखाद्या लहान मुलाइतकीसुद्धां माझी तिला पर्वा वाटली नाहीं.

एखाद्या भुकेल्या वाघाला पिंजऱ्यांत कोंडून बाहेरून दोन हातांवरून त्याला मांस दाखवीत राहावं—

त्या वेळची माझी मनःस्थिति वर्णन करणं अगदीं अशक्य आहे मला. माझ्या मनांत सैतानानं आपला कारखाना उघडला होता. आतां लिहायची सुद्धां लाज वाटते! पण त्या वेळीं माझ्या मनांत आलं—त्या नायकिणीची मागणी मान्य करणारा आपला दोस्तच बरोबर होता. त्यानं हां-हां म्हणतां हवं असलेलं सुख मिळविलं आणि आपण मात्र—

त्या रात्रीपासून आम्हां दोघांमधें एक अढी उत्पन्न झाली—एक भिंतच उभी राहिली म्हणानात! माझं वागणं—माझी मागणी—तिला अगदीं पशू-सारखी वाटे. उलट माझ्या मनांत येई—मी पशु असलों तर ही दगड आहे. आपला नवरा दिवसाकांठीं आठआठ दहादहा तास राबतो, वेळीं-अवेळीं जेवता, रात्रीं दोनदोन वाजेपर्यंत जाग्रणं करतो, ही गोष्ट तिच्या ध्यानांत कशी येत नाहीं? त्याची शरीरसुखाची मागणी तिला इतकी विलक्षण कां वाटावी? आपल्याला सारीं सुखं मिळवून देणाऱ्या माणसाची तिला दयासुद्धां येत नाहीं, हें कसं?

लहानसहान गोष्टींवरून मी तिच्यावर चिडूं लागलों, रागावूं लागलों. तीहि उलट उत्तरं देऊं लागली. आम्ही मनानं एकमेकापासून अधिक अधिक दूर जाऊं लागलों. शरीराच्या तृप्तीवर मनाचं समाधान किती अवलंबून असतं, याची मला या वेळीं विलक्षण जाणीव झाली. पण माझं दुःख जाणून घ्यायलाच विमल तयार नव्हती. तिच्या माझ्याविषयींच्या बेफिकिरींत हट्ट

आणि विक्षिप्तपणा यांच्याखेरीज दुसरं कांहीं नाहीं, हें मला उघडउघड दिसत होतं.

आपली इच्छा गुंडाळून ठेवण्याइतकी नवऱ्याची तयारी झाली आहे असं दिसतांच तिनं एके दिवशीं माझ्या टेबलावर 'काम आणि कामिनी' ही कादंबरी आणून ठेवली. या कादंबरींतला नायक बायकोला बहीण म्हणून मानून वागतो असं लेखिकेनं वर्णन केलं आहे.

तें वर्णन वाचून मला हंसूं आलं. ज्याला बहीणच हवी आहे तो लग्नाच्या फंदांत कशाला पडेल ? ज्यांना भाऊ नाहींत, अशा अनाथ स्त्रिया जगांत हजारों आहेत. त्याना सोडून मीं विमलशीं लग्न केलं होतं तें कांहीं—

भुकेनं वखवखलेल्या मनुष्याला केव्हां तरी चारदोन घांस मिळावेत तशी पुढल्या दोन वर्षांत माझ्या शरीरसुखाची दशा झाली.

अशाच स्थितींत विमलला दिवस गेले. या पहिल्या बाळंतपणापूर्वीचे सातआठ महिने आणि बाळंतपणानंतरचे आठनऊ महिने मीं कसे काढले, याची कुणालाहि कल्पना करतां येणार नाहीं. बाळंतीण झाल्यावर तीन महिन्यांनीं ती माहेराहून परत आली खरी; पण नुसत्या मुलाला घेऊन नाहीं, तर एका म्हाताऱ्या मावशीला बरोबर घेऊन.

विमल मुलाकरितां नवींनवीं झबलीं शिवत होती आणि तिची मावशी माझे तांदूळ खर्च करून गांवांतल्या प्रत्येक देवाला संतुष्ट करीत होती. पण—

विमलची नि माझी एकांतांत गांठ पडूं नये असा कटच त्या दोघींनीं केला होता कीं काय कुणास ठाऊक !

मी अगदीं अस्वस्थ होऊन गेलों. जें मिळत नाहीं त्याच्याविषयींच मनुष्य अधिक विचार करीत असावा ! माझ्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येऊं लागले. पाप-पुण्याचा मनाला विसर पडला। एक गोष्ट--ही एकच गोष्ट माझ्या मनांत एकसारखं थैमान घालूं लागली.

वेश्याकडे जाणाऱ्या पुरुषांना मी पूर्वी हंसत असें. पण या वर्षांत मला वाटूं लागलं—मनुष्य स्वभावतः व्यसनी नाहीं. त्याची परिस्थितीच त्याला व्यसनी करते.

विमलनं आपल्या मावशीला खूप दिवस ठेवून घेतलं त्याचा मला राग आला नाहीं. राग आला तो नवरा हा आपला शत्रु आणि मावशी ही

त्याच्यापासून संरक्षण करणारी ढाल, या कल्पनेनं तिनं माझ्याशीं जे युद्ध सुरू केलं होतं त्याचा! तिच्या एका स्पर्शानं, एका मिठीनंसुद्धा मला बरं वाटलं असतं. पण—

जाऊं दे! उगीच पाल्हाळ लावीत नाहीं. तुम्हीं आपल्या गोष्टींत लिहिलं आहे, 'एकदा भर दिवसा—'

तुम्हीं लिहिलेलं अक्षरशः खरं आहे. त्यांत एकच लहानशी चूक आहे. भुकेल्या वाघानं एखादं सावज पकडून आणावं, त्याप्रमाणं मीं तिला ओढून आणली हें खरं; पण आम्हां दोघांना एके ठिकाणीं पाहिलं तें तिच्या मावशीनं!

त्या दिवशीं एक गोष्ट मला पुरती कळून चुकली. सामान्य मनुष्याच्या आयुष्यांत शरीरसुखाचा भाग फार मोठा आहे. त्या दृष्टीनं मनुष्य हा पशु आहे! पाळलेले हिंस्र प्राणी किती गरीब दिसतात! ज्यांच्या शरिराच्या भुका तृप्त होतात तो मनुष्यहि असाच असतो. पण पाळलेला नाग किंवा वाघ चिडला, कीं तो धन्याच्या अंगावरच उलटतो. मनुष्याचं शरीर भुकेलं राहिलं कीं—

विमलचं दुसरं बाळंतपण आलं. पहिल्या खेपेहूनहि या वेळीं मला अधिक त्रास झाला. तो विसरण्याकरितां मी माझ्या मित्रांच्या बैठकींत जाऊन बसूं लागलों. ती दारूबाजांची बैठक होती. तिथं—

माझे संस्कार मला दारूच्या आहारीं जाऊं देईनात. म्हणून मी एका वेश्येच्या घरीं गाणं ऐकायला जाऊं लागलों. ती बातमी विमलला समजली. तेव्हां तिनं किती आकाडतांडव केलं! माझ्या एका स्नेह्यासमक्ष ती म्हणाली, "असले चोरटे व्यवहार करण्यापेक्षा दुसरं लग्नच करा की! म्हणजे—"

तिच्या या टोमण्यानं दुसऱ्या लग्नाची कल्पना माझ्या डोक्यांत घोळूं लागली.

तुम्हां लेखकांना बायकांचा फुकटचा कैवार घ्यायची संवय आहे. म्हणून तुम्हांला सांगतों-माझ्या जाहिरातींतला बायकोच्या संमतीचा भाग खोटा आहे. माझी जाहिरात वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होतांच विमलनं डोक्यांत राख घालायला सुरवात केली.

तिला सवत नकोय्, नवऱ्याचा बाहेरख्यालीपणा नकोय् आणि स्वतःहि नवऱ्याला सुख द्यायला नकोय् !

लग्नापूर्वी ती कविता करीत असे म्हणे ! पण कवितांतलं प्रेम आणि व्यवहारातलं प्रेम यांच्यात फार अंतर आहे, हें तिला कधींच कळलं नाहीं ! असल्या बायकोला तुम्ही खुशाल पारिजातकाचं फूल म्हणा. मी तिला एकच उपमा देईन–गुलाबाचं झाड ! एकहि फूल नसलेलं––नुसत्या बारीक कांट्यानी भरलंलं गुलाबाचं झाड !"

पत्र इथेंच संपलें होतें. पत्राच्या खालीं सही वगैरे कांहीं नव्हतें. सुन्न मनानें उठून मीं खिडकींतून बाहेर पाहिलें. आठ कुंड्यांतल्या आठ गुलाबांच्या झाडांवर एकहि फूल नव्हतें.

माझ्या मनांत आलें, आपल्या हातांतलें हें पत्र लिहिणारा मनुष्य प्रामाणिक आहे; पण त्याचें लिहिणें हें शुद्ध अर्धसत्य असूं शकेल. विमलची हकीगत कळल्यावाचून—

मी त्या पत्राकडे पाहत पुटपुटलों—"गुलाबाचं झाड—एकहि फूल नसलेलं—नुसत्या बारीक कांट्यांनीं भरलेलं गुलाबाचं झाड !"

# सोनचांफ्याचा सुवास ३

"गुलाबाचं झाड—एकहि फूल नसलेलं, नुसत्या बारीक कांट्यांनीं भरलेलं गुलाबाचं झाड!"

किती तरी वेळ पोलिस खात्यांतल्या त्या अपरिचित मनुष्याचे हे शब्द माझ्या मनांत घुमत होते.

माणसाचें मन हा एक गोलघुमट आहे. विजापूरच्या घुमटापेक्षांहि त्याची रचना अधिक आश्चर्यकारक आहे. त्या गोलघुमटांत माणसाचा आवाज अनंत पटींनीं मोठा होऊन येतो; पण या गोलघुमटांत तो अनंत काळपर्यंत घुमत राहतो.

नाहीं तर पोलिस खात्यांतल्या एका साध्या इसमाच्या हातून सहज लिहिलें गेलेलें तें वाक्य—हां-हां म्हणतां त्याचा विसर पडायला हवा होता मला! पण आज माझ्या दृष्टीनें तो पोलिस-इन्स्पेक्टर महाकवि झाला होता. त्याच्या त्या वाक्यानं मला नवी दृष्टि दिली होती. त्याच्या त्या उपमेनं माझ्या डोळ्यांपुढं नवी सृष्टि उभी राहूं लागली होती.

माझ्या गोष्टींत पतीच्या कामुकतेनें कोमेजून गेलेल्या कुसुमचें चित्रण करतांना तिच्या अनुभवांना मीं दिलेली पारिजातकाच्या फुलांची उपमा अगदीं समर्पक वाटली होती मला. पण त्या पोलिस-इन्स्पेक्टरचें पत्र वाचतांच

मला वाटूं लागलें—स्त्रीजीवन हें पारिजातकाचें झाड नाहीं; तें गुलाबाचें झाड आहे.

कुसुमची गोष्ट मला ज्या प्रसंगावरून सुचली होती, तो मी आठवूं लागलों. तो प्रसंग कारुण्यानें अगदीं कांठोकांठ भरलेला होता. पण तो रंगवितांना मी एक गोष्ट अजीबात विसरून गेलों होतों. इंद्रधनुष्याचा एकच रंग खरा मानून चित्रकार त्याचें चित्र काढीत नाहीं. स्त्रीपुरुषांचें प्रेम हाहि असाच विषय आहे. त्यांत इतके रंग एकमेकांत मिसळलेले असतात कीं—

संध्याकाळपर्यंत मी याच गोष्टीचा राहून राहून विचार करीत होतों. ज्या प्रीतीचे जगांतल्या महाकवींनीं पोवाडे गायिले आहेत, तिचें मूळ शरीरसुखांत आहे या गोष्टीचें मला कधींच आश्चर्य वाटत नाहीं. पण दगडावांचून पुतळा निर्माण होत नाहीं हें खरें असलें तरी दगड म्हणजेच कांहीं पुतळा नव्हे! प्रेमाचा अनुभवहि तसाच असायला हवा. शारीरिक आकर्षणावांचून तरुण स्त्री-पुरुषांचीं मनें एकमेकांकडे ओढ घेत नाहींत, यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. संगमाकरितां दोन नद्यांनीं एकमेकींकडे धांव घ्यावी, तसेंच आहे हें. संगमानंतर नद्या एकमेकींपासून कधींहि दूर होत नाहींत; पण पतिपत्नी मात्र—

माझ्या गोष्टींतली कुसुम नवऱ्याच्या अत्याचाराला कंटाळली होती, मला भेटायला आलेला इन्स्पेक्टर बायकोच्या असहकारितेला कंटाळला होता. माझ्या मनांत आलें—दांपत्यसुखाचा प्रश्न आमच्या राजकारणाइतकाच बिकट आहे म्हणायचा! अत्याचार आणि असहकारिता यांचा सुवर्णमध्य जसा आम्हाला राजकारणांत साधतां येत नाहीं, त्याचप्रमाणें—

वावटळींत सांपडलेल्या मनुष्यासारखी माझ्या मनाची स्थिति झाली. कामाचा ढीग पडला होता पुढें. पण आजारी मनुष्याची जशी कांहीं केल्या अन्नावर वासना जात नाहीं त्याप्रमाणें कुठल्याहि कामांत माझें लक्ष लागेना! वेड्या मनुष्याचें मनहि एकाच गोष्टीला चिकटून राहतें. तेव्हां पायांबरोबर मनहि मोकळें होतें का पाहावें, म्हणून मी घराबाहेर पडलों.

माझे पाय रंकाळ्याकडे वळले. कां कुणाला ठाऊक, पण मानवी आयुष्यांतील एखादा समस्या सुटायची असली तर दोनच ठिकाणीं ती सुटूं शकेल असें मला वाटतें. पर्वताच्या सान्निध्यांत किंवा समुद्रासारख्या जलाशयाच्या

सहवासांत. पर्वताचीं गगनचुंबी शिखरें पाहून गोंधळलेल्या मनाची महत्त्वाकांक्षा प्रज्वलित होत असावी, आणि समुद्राचा अफाट विस्तार व तो लीलेनें ओलांडणारी आगबोट पाहून त्याचा आत्मविश्वास जागृत होत असावा.

तें कांहीं असलें तरी जलाशयाच्या कांठावर बसलें कीं चटकन् प्रसन्न होणारें माझें मन आज मात्र विषण्णच राहिलें.

डाव्या बाजूला दिसणारा रिकामा संध्यामठ! माझें मन म्हणत होतें-- हा संध्यामठ बांधणाराला तो पुढें असा ओस पडेल अशी कल्पना तरी आली असेल काय? लग्नाच्या वेळीं पतिपत्नी मनामध्यें जें दिव्य प्रेममंदिर उभारतात तेंहि असेंच असतें. नाहीं का?

कांहीं कांहीं विचार गुप्त पोलिसाप्रमाणें आपला पाठलाग करीत असतात हेंच खरें. नाहीं तर पश्चिमेकडल्या विविध रंगाच्या छटा आणि तान्ह्या बाळाच्या मुठीप्रमाणें नाचणाऱ्या रंकाळ्यांतल्या लहान लहान लाटा यांच्यांत गुंग होऊन जाण्याऐवजीं माझें मन त्या नको असलेल्या प्रश्नाकडेच कां वळलें असतें?

संध्यामठाकडे पाहायचें नाहीं, असा निश्चय करून मी समोरच्या पाण्याकडे पाहायला लागलों. नाजुक हिरवळीनें आच्छादिलेलें विस्तीर्ण मैदान— आकाशाला आपलें प्रतिबिंब नीट पाहतां यावें म्हणून निर्माण केलेला आरसा—

मीं उगीचच कल्पना करूं लागलों. माझ्या कल्पना काव्यदृष्ट्या कशाहि असल्या तरी त्यांच्या नादांत मनांत सलणारा तो प्रश्न विसरतां येईल असें मला वाटलें.

पण—

पाण्यांत बुडविलेलें बूच हाताची पकड सैल होतांच चटकन् वर येतें ना? अगदीं तसा तो प्रश्न माझ्या मनाला पुन्हां चाटून गेला.

मी पाण्याच्या पृष्ठभागाकडे पाहत होतों. एकदम मला एक आठवण झाली. कांहीं दिवसांपूर्वी एक मनुष्य रंकाळ्यांत बुडाला होता. चांगलें पोहायला येत होतें त्याला; पण पोहतां पोहतां त्याचे पाय आंतल्या वेलींच्या जाळ्यांत अडकले आणि हां-हां म्हणतां—

स्त्री आणि पुरुष यांच्या प्रीतीचें प्रतिबिंब मला समोरच्या तलावांत दिसं

लागलें. वर पाणी, पण आंत प्राण घेणाऱ्या वेलींचीं जाळीं! वर दिव्य प्रेमाचा मोहक मुलामा, पण आंत नुसती शरीरसुखाची आग!

आतां मला रंकाळ्याच्या पाण्याकडे पाहवेना!

मी उठून चालूं लागलों. महाद्वाराच्या रस्त्यानें गुजरींतून जाण्यापेक्षां अंबाबाईच्या देवळांतून गेलें तर कमी चालावें लागेल म्हणून मी देवळाकडे वळलों. महाद्वाराच्या बाहेरच्या एका फुलांच्या दुकानांतून सुगंध घेऊन वायुलहरी धांवत आल्या. तो कसला सुगंध आहे हें पाहण्याकरितां मी वळणार तोंच--

मावळत्या सूर्याचे शेवटचे किरण माझ्यापुढें चमकत असलेले दिसले. मावळत्या किरणांची चमक थेट अंबाबाईच्या मूर्तीवर पडावी अशीच या देवालयाची रचना आहे असें मीं दोनतीनदां निरनिराळ्या लोकांकडून ऐकलें होतें. ही दंतकथा आहे कीं सत्यकथा आहे, हें पाहण्याचा प्रयत्न मीं कधींच केला नव्हता. आज अगदीं योगायोगानें-

मी झपझप आंत गेलों. केव्हां एकदां वहाणा काढून आंत जातों आणि देवालय बांधणाऱ्या कारागिराच्या या कौशल्याची डोळ्यांनीं प्रचीत घेतों, असें मला झालें होतें. चक्रव्यूहाप्रमाणें भासणाऱ्या सभा-मंडपाच्या खांबांच्या त्या गर्दीतून मी पुढें जातों तोंच—

एका विलक्षण सुगंधानें माझें पाऊल मंदावलें. देवालयांत कापूर, उदबत्त्या, वगैरेंचा घमघमाट नेहमीं अनुभवाला येतो. पण हा सुवास त्यांपैकीं नव्हता. तो सौम्य पण उत्कट; जेवढा मंद तेवढाच मधुर होता!

माझ्या अंगावरून जाणाऱ्या मनुष्याच्या हातांत जीं फुलें होतीं—सोन-चांफीच असावींत तीं--त्यांचा सुगंध होता तो!

तो मनुष्य माझ्या अंगावरून गेला मात्र. तो सुगंध—सूर्यकिरण मूर्तीवर पडतात कीं नाहीं हें पाहण्याची ती जिज्ञासा—सारें सारें कुठल्या कुठें लोप पावलें!

धुक्याआडच्या सृष्टीप्रमाणें त्याच्याविषयींची एक अंधुक स्मृति माझ्यापुढें उभी राहिली.

दुसऱ्याच क्षणीं तें धुकें वितळून गेलें.

रामभाऊ केळकरच माझ्या अंगावरून गेला होता.

तब्बल दोन तपें होऊन गेलीं होतीं त्या गोष्टीला. तो नि मी दोघेहि फर्ग्युसनमध्यें स्कॉलर होतों. तो खानदेशकडला, मी सांगलीचा. त्याची दृष्टि तीक्ष्ण तर माझी अधु. घरची श्रीमंती असल्यामुळें तो पुढें मुंबईला मेडिकल कॉलेजमध्यें जाणार होता; उलट कॉलेजांत पाऊल टाकल्यापासून आपणाला बी. ए. व्हायला मिळतें की नाहीं या विवंचनेंत मी होतों. त्या वेळीं सुटाबुटांत वावरणारे विद्यार्थी फार थोडे असत. पण रामभाऊ या अल्प-संख्याक लोकांचा पुढारी होता; आणि मला तर धोतराचा चांगला काचा-सुद्धां मारतां येत नसे.

असें असूनहि या दोन ध्रुवांनीं कॉलेजांतलीं दोन वर्षे मोठ्या आनंदांत एकत्र घालविलीं होतीं. कॉलेजजवळच्या टेकडांवर चांदण्यांत फिरायला गेल्यावर मी 'राजहंस' गुणगुणूं लागलों की तो म्हणे, "खांडेकर, तूं रडूबाई आहेस नुसता! अरे अरसिका, टेकडीवरल्या चांदण्यांत कुठली कविता म्हणायची असते, ठाऊक आहे?"

नि मग तो बालकवींची 'फुलराणी' म्हणूं लागे. त्याचा आवाज गोड असल्यामुळें

प्रणय-चंचला त्या भ्रूलीला
अवगत नव्हत्या कुमारिकेला!
किंवा
लाजलाजली या वचनांनीं
साधीभोळी ती फुलराणी

या ओळी त्याच्या तोंडून फार गोड लागत. तो नेहमीं प्रेमगीतें वाचून म्हणे, "प्रेमासाठीं जगण्यांतच काय, पण मरण्यांतसुद्धां मोठी मौज आहे!" आम्ही सारे त्याची थट्टा करण्याकरितां म्हणत असूं, "आज प्रेमाच्या कवितेनेंच तुला इतकं वेड लावलं आहे; मग उद्यां लग्न झाल्यावर—"

देवळांतून घाईघाईनें बाहेर येतांना क्षणार्धांत या साऱ्या गोष्टी मला आठवल्या.

मीं बाहेर येऊन पाहिलें. रामभाऊ कुठेंच दिसत नव्हता. तो कुठल्या वाटेनें गेला असेल? कुठें उतरला असेल?

छे! आपलेंच चुकलें. देवळांत तो आपल्या अंगावरून गेला तेव्हांच आपण त्याला ओरडून हांक मारायला हवी होती.

मोठी हळहळ लागली माझ्या मनाला. पण लगेच माझ्या लक्षांत आलें, अनोळखी मनुष्याला देवळाच्या मागचा रस्ता ठाऊक असणें शक्य नाहीं. तो महाद्वारानेंच बाहेर पडलेला असणार.

मी धांवत महाद्वाराकडे आलों.

पेढ्यांच्या दुकानाजवळून मीं बाहेर पाहिलें. रामभाऊ फुलांच्या दुकानापाशीं उभा होता. मी धांवतच गेलों नि त्याच्या अंगावर थाप मारीत म्हटलें, "अरे गृहस्था—"

एकदम दचकून त्यानें मागें वळून पाहिलें. लगेच तो हंसत म्हणाला, 'केवढ्यानं थाप मारलीस रे! हीं हातांतलीं सोनचाफ्याचीं फुलं धुळींत पडलीं असतीं ना!' हें बोलतां बोलतां त्यानें अशा भावपूर्ण दृष्टीनें हातांतल्या फुलांकडे पाहिलें, कीं आतां हा डॉक्टर एखादी कविता म्हणायला सुरुवात करतो कीं काय अशी मला शंका आली.

तो फुलांचे पैसे देत असतांना मीं त्याच्या पोषाखाकडे पाहिलें. गेल्या चोवीस वर्षांत आमची एकदांसुद्धां गाठ पडली नव्हती. पण कांहीं कांहीं माणसें वारूळ वाढावें तशीं अंगानें वाढत जात असलीं तरी कांहींची अंगकाठी बरशीच्या तश्शी कायम राहते. आम्ही दोघेहि या दुसऱ्या वर्गांतले असल्यामुळेंच आमची एकमेकांना चटकन् ओळख पटली. मात्र राहून राहून एक गोष्ट माझ्या मनांत येत होती—कॉलेजांत असतांना झकपक पोषाक करणारा हा रामभाऊ, आज एक गांधी टोपी, एक नेहरू शर्ट आणि एक आखूड धोतर, एवढ्यावर खूष आहे ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे! हा अर्जाबात डॉक्टर झालाच नाहीं, डॉक्टर होऊन मध्येंच देशभक्त झाला, कीं दुर्दैवानें याची श्रीमंती...

माझ्याकडे वळून हंसतमुखानें रामभाऊ म्हणाला, "अंबाबाईला आला होतास वाटतं?"

"आपल्यावरनं माणूस जग ओळखतं हेंच खरं!"

तो हंसत उद्गारला, "अरे माझा देवावर विश्वास आहे कुठं? पण मध्यें बायको तीनचार वर्षें आजारी होती. बरी झाल्यापासून ती एकसारखी

पाठीला लागली होती, 'अंबाबाईला नवस केला होता मीं, तो फेडून यायला हवा तुम्हांला !' 'हो हो !' म्हणून दोनतीन वर्षं काढलीं; मग करतोस काय बाबा, राजाचा हुकूम मोडणं सोपं आहे; पण बायकोचा हुकूम—"

तो इतका मोठ्यानें हंसला, कीं रस्त्यानें जाणारे-येणारे लोक आमच्याकडे टकमक पाहूं लागले. डॉक्टर झालेला रामभाऊ असा खेडवळासारखा भर रस्त्यांत हंसतोय् हें पाहून मलासुद्धां—

रामभाऊनें प्रश्न केला, "तूं कोंकणांत कुठल्याशा खेड्यांत मास्तर होतास ना ?"

मीं उत्तर दिलें, "होतों; पण हल्लीं इथं आहें."

"काय करतोस ?"

रस्त्यानें जातां जातां कुणा तरी मनुष्याचा धक्का लागला कीं आपल्याला जसा क्षणभर राग येतो, तशी रामभाऊच्या या वाक्यानें माझ्या अहंकाराची स्थिति झाली. मी कोल्हापूरला येऊन चित्रपटकथा लिहीत असतों हें...

एकदम मला एक शंका आली. धंद्याच्या निमित्तानें रामभाऊ महाराष्ट्राबाहेर तर जाऊन राहिला नाहीं ना ? अलीकडलें कुठलेंहि मासिक किंवा वर्तमानपत्र न वाचल्यासारखा त्याने मला जो प्रश्न केला—

रामभाऊ उत्सुकतेनें माझ्याकडे पाहतोय् हें लक्षांत येतांच मीं म्हटलें, "सिनेमाच्या गोष्टी लिहिण्यासाठीं इथं येऊन राहिलोंय् मां हल्लीं."

"तरीच !"

त्याच्या या एकशब्दी उद्गाराचा मला अर्थच कळेना ! रामभाऊनें माझ्याविषयीं कांहीं भलतेंसलतें तर ऐकलें नाहीं ना ? हो ! दारूबाज हातांत दुधाचें भांडें घेऊन जात असला तरी त्यांत दारू आहे असाच दुरून पाहणारांचा ग्रह होतो. सिनेमा-जगाविषयींच्या अनेक खऱ्याखोट्या कंड्यामुळें माझ्याहि बाबतींत रामभाऊ साशंक झाला असला तर त्यांत नवल कसलें ?

मी त्याच्याकडे आश्चर्यानें पाहत आहें हें लक्षांत येतांच त्यानें हातांतल्या पिशवींतला एक अंक काढला नि तो म्हणाला,

"काल रात्रीं गाडींत झोंप येईना. कांहीं तरी वाचावं म्हणून हा

'किर्लोस्कर'चा ताजा अंक घेतला. तूं लेखक झाला आहेस हें मला ठाऊक होतं. म्हणून मुद्दाम तुझीच गोष्ट वाचली. पण—"

आंबा गोड असेल म्हणून तो चोखायला जावें नि तो आंबटढवक निघाल्यामुळें तोंड वाईट व्हावें-अगदीं तोच भाव रामभाऊच्या मुद्रेवर दिसत होता. त्या अंकांतली 'पारिजातकाचीं फुलें' ही माझी गोष्ट त्याला बिलकुल आवडली नव्हती हें उघड दिसत होतें.

"जगांतल्या साऱ्या गोष्टी भडक करून रंगविल्याशिवाय तुम्हां लेखकांना चैनच पडत नाहीं का रे?" त्यानें विचारलें.

या प्रश्नाचें माझें उत्तर ऐकण्याच्या आधीच तो म्हणाला, "मेलनं परत जायचंय् मला."

"मी नाहीं तुला जाऊं देणार! किती वर्षांनीं आज तुझी-माझी भेट होतेय्—"

"पण तिकडे माझे रोगी तडफडत असतील ना?"

"गांवांत तुझ्याशिवाय दुसरा डॉक्टरच नाहीं वाटतं?"

त्यानें नकारार्थी मान हालविली. लगेच असल्या मूक उत्तरानें माझें समाधान होणार नाहीं असें वाटूनच कीं काय तो म्हणाला, "जिथून आगगाडीचा रस्ता साठ मैल आहे नि मोटारीचा रस्ता सात मैल आहे अशा जागीं मीं गेलीं दोन वर्षं—"

"तूं उत्तरध्रुवावर राहत असलास तरी मी तुला मेलनं जाऊं देणार नाहीं. माझ्या घरीं दोन घांस खा, दोन घटका गप्पा मार नि मग दहाच्या गाडीनं खुशाल जा तूं!"

"अरे पण—"

"पण नाहीं नि बीण नाहीं. कॉलेज सुटल्यापासून तुझं दर्शन व्हायला पंचवीस वर्षं लागलीं. याच हिशोबानं पाहायचं म्हणजे तुझी पुढची भेट १९६६ सालीं होणार! तोंपर्यंत मी जिवंत असेन कीं—"

रामभाऊच्या डोळ्यांपुढें कॉलेजातलें आमचें सहजीवन उभें राहिलें असावें.

तो हंसत हंसत माझ्याबरोबर चालूं लागला.

× × ×

रामभाऊला माडीवर पाठवून मीं घरांत फक्कड चहाचा हुकूम सोडला. तसें पाहिलें तर आतां सात वाजायला आले होते. तास दीड तासांत जेवायला बसायला हवें होतें. पण थट्टा आणि चहा यांच्या बाबतीत काळवेळ कुणीच पाहत नाहीं हें एक; आणि दुसरें–

कॉलेजांत रामभाऊ केवढा चहाबाज होता हें मीं अजून विसरलों नव्हतों. त्या वेळीं 'गोल्डन टी' नांवाचें एक दुकान गांवांत निघालें होतें. त्या दुकानांतला चहा पिण्याकरितां त्यानें नि मी सकाळसंध्याकाळ कित्येक महिने दोन दोन मैलांचे हेलपाटे घातले होते!

मी चहा घेऊन वर गेलों तेव्हां रामभाऊ माझ्या खोलींतले फोटो पाहात होता. माझें पाऊल वाजतांच त्यानें वळून पाहिलें आणि लगेच तो हंसत उद्गारला, "मी चहा घेत नाहीं!"

कॉलेजात सुटाबुटांत वावरणाऱ्या रामभाऊचा आजचा साधा वेष–त्या वेळीं दिवसांतून सहासात वेळां चहा पिणाऱ्या रामभाऊचे 'मी चहा घेत नाहीं' हे शब्द—

रामभाऊच्या आयुष्यांत काहीं तरी विलक्षण क्रांति झाली आहे अशी माझी खात्री झाली. चहाचे पेले खिडकींत ठेवून लोडाला ओठंगून बसत मीं म्हटलें, "फार बदल झालाय् तुझ्यांत रामभाऊ!"

"तूं तरी काय थोडा बदललास? तुझी ती 'किर्लोस्कर' मधली गोष्ट वाचल्यावर मला असं हंसूं लोटलं म्हणतोस! लग्न करायचं नाहीं म्हणून त्या वेळीं कवितासुद्धां 'कुमार' या नांवानं लिहीत होतास; नि आतां असल्या भयंकर गोष्टी लिहून—"

"भयंकर?" मीं आश्चर्यानें प्रश्न केला.

"भयंकर नाहीं तर काय? तूं लिहिली आहेस ती काय माणसाची गोष्ट आहे? कुठला तरी पशु पाहिलास आणि बायकोवरल्या त्याच्या जुलुमाचं वर्णन अगदीं रंगांत येऊन—"

रामभाऊनें गांधींच्या आश्रमांत बरींच वर्षे काढलीं असलीं पाहिजेत अशी माझी खात्री झाली. मी मध्येंच म्हणालों, "बायकोचा नवस फेडायला तूं आला आहेस म्हणून बरं! नाहीं तर मला वाटलं असतं, कीं गांधींचा एक ब्रह्मचारी शिष्यच माझ्याशीं बोलतोय्!"

"हें पाहा, तूं मला हवं तर मूर्ख म्हण; पण गांधींचा शिष्य म्हणूं नकोस!"

मी अधिकच बुचकळ्यांत पडलों. पुरुषाच्या अतिरिक्त वासनेचें चित्रण ही असंभाव्य किंवा अपवादात्मक गोष्ट आहे असें मानणारा मनुष्य माझ्या दृष्टीनें अंधपावित्र्याचा पुरस्कार करणाऱ्या पंथांतलाच असला पाहिजे. पण राम-भाऊला तर गांधींच्याविषयीं—

मीं त्याला विचारलें, "तुला गांधींच्याविषयीं मुळींच आदर नाहीं असं दिसतं!"

तो हंसून म्हणाला, "अगदीं चुकलास. गांधींविषयीं मला फार आदर वाटतो. पण त्यांच्याविषयीं प्रेम म्हणशील तर...अंहं!"

माझ्या मुद्रेवर उमटलेलें आश्चर्य त्याच्या लक्षांत आलें असावें. तो लगेच बोलूं लागला, "हें पाहा, कुठल्याहि डॉक्टरला गांधीच्याविषयीं प्रेम वाटणं शक्य नाहीं. मनुष्यप्राणी सर्व दृष्टींनीं किती दुबळा आहे याचा अनुभव डॉक्टरइतका दुसऱ्या कुणालाच येत नाहीं. पण गांधींच्या हिशेबांत सामान्य दुबळा मनुष्य येतच नाहीं! 'घे सुदामा नि कर गामा' असलं त्यांचं तत्त्वज्ञान..."

त्याची ही नवी म्हण ऐकून मला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. माझ्या-बरोबर तोहि हंसूं लागला.

हंसतां हंसतां माझ्या मनांत आलें—रामभाऊला मनुष्याचा दुबळेपणा मान्य आहे; मग माझ्या गोष्टींतल्या कुसुमच्या नवऱ्याचें तें चित्र त्याला खोटें कां वाटावें?

मी चट्कन् म्हणालों, "रामभाऊ, सामान्य मनुष्य दुबळा असतो हें तुला कबूल आहे ना? मग माझ्या त्या गोष्टींत तरी दुसरं काय आहे? एक नवरा शरीरसुखाचा गुलाम होतो—त्याच्या या गुलामगिरीला त्याची दुर्दैवी पत्नी बळी पडते—"

"इथंच तुझी चूक आहे. आगगाडींत ही गोष्ट वाचली तेव्हां मला वाटलं—तूं लग्न न करतां तसाच राहिला आहेस. त्या विकृतीचे परिणाम तुझ्या मनावर झाले आहेत, नि म्हणून तूं असल्या गोष्टी—तुझ्या खोलींत

पाऊल टाकल्याबरोबर तुझ्या बायकोचे नि मुलांचे हे फोटो पाहून फार आनंद झाला मला!"

गाडी पुन्हां भलत्याच रुळावर जाईल असें भय वाटूं लागलें मला! म्हणून मी मध्येंच म्हणालों, "माझ्या गोष्टींत काय चुकलंय् तें सांग ना?"

तो उद्गारला, "तसं बोट दाखवून मला नाहीं कांहीं सांगतां येणार. पण माझीच हकीगत सांगतों तुला. म्हणजे—"

तो एकदम स्तब्ध झाला. लगेच त्यानें आपल्या खिशांत हात घालून सोनचांफ्याचीं चारपांच फुलें बाहेर काढलीं. त्यांतलीं दोनतीन मला दिलीं आणि आपल्या हातांतल्या फुलांचा वास घेत तो म्हणाला, "तूं दत्तक होऊन कोंकणांत गेलास ना? त्यानंतर लवकरच मी मुंबईला मेडिकल कॉलेज-मधें गेलों. माझे ग्रह चांगले होते म्हण, किंवा मीं मन लावून अभ्यास केला म्हण, पण एकहि वर्ष न गमवतां मी डॉक्टर झालों. भुसावळला वडील होतेच. मींहि तिथंच धंदा सुरू केला. त्या वेळचा माझा फोटो पाहिलास तर चकित होऊन जाशील तूं! विलायतेच्या बोटींतून उतरणाऱ्या एखाद्या एफ्. आर. सी. एस्. प्रमाणं..."

स्वतःच्या पोषाकाकडे पाहत तो मोठ्यानें हंसला. मीं मात्र नुसतें स्मित केलें. त्याच्यांत झालेला बदल मलाहि दिसत होता. पण त्याचें कारण कळावें म्हणून तर मी अधीर झालों होतों. भुकेलेला मनुष्य पाटावर जाऊन बसला कीं तिखटमीठ सावकाश वाढणाऱ्या माणसाचा जसा त्याला राग येतो त्याप्रमाणें मलाहि त्याच्या या शांत आरंभाचा—

तो पुढें बोलूं लागला होता, "डॉक्टर होईपर्यंत प्रेमाच्या कविता नि गोष्टी एवढ्यावर माझ्या तरुण मनाची भूक भागत होती. पण धंदा सुरू केल्यावर मला एक प्रकारची हुरहुर वाटूं लागली. दवाखान्यांतला वेळ झरकन् निघून जाई; पण इतर वेळीं मात्र मन स्त्रीप्रेमाचाच अधिक विचार करी. एखादी सुंदर तरुणी दृष्टीला पडली कीं तिची मूर्ति विसरणं मला कठीण जाऊं लागलं. ज्या प्रेमाच्या कविता नि गोष्टी पूर्वी मला अतिशय रसाळ वाटत, त्या वाचायला लागलं कीं डोळे आपोआप मिटूं लागले. त्या मिटलेल्या डोळ्यांपुढचीं स्वप्नं— प्रत्येक स्वप्नांत एक नवीनच तरुणी मला दिसे. परदेशी चित्रपटांतल्या सुंदर नटींचे फोटो गोळा करण्याचा छंदहि मला जडला; नि तुला आश्चर्य वाटेल

त्या वेळीं त्यांतल्या त्यांत एकदोन नटींच्या फोटोंचीं मीं एकांतांत चुंबनंसुद्धां घेतलीं."

तो मोठ्यानें हंसला. "जो कशानं कधींच वेडा होत नाहीं, तो मनुष्यच नव्हे!" असेंच जणूं कांहीं तें हास्य म्हणत होतें.

मी पुढें ऐकूं लागलों.

"माझे वडील मला अनुरूप अशी मुलगी शोधीत होते. ती लवकरच मिळाली म्हणून बरं, नाहींतर त्या वेड्या मनःस्थितींत एखाद्या व्यसनी मित्राच्या नादाला लागून मी वेश्येच्या घराची पायरीसुद्धां चढलों असतों! तारुण्यांतला उन्माद हा दारूचा पहिला प्याला आहे—"

"नि जो पहिला एकच प्याला पितो, त्याला शेवटचा एकच प्यालाहि घ्यावा लागतो!" अगदा राहवेना म्हणून मी बोलून गेलों.

"तुझी गडकऱ्यांच्यावरली भक्ति ठाऊक आहे मला. त्यांचा सिद्धान्त दारूच्या बाबतींत थोडाफार खरा असेल; पण स्त्रीप्रेमाच्या बाबतींत—"

"या बाबतींतसुद्धां तो खराच आहे. मदिरा आणि मदिराक्षी यांची तुलना प्राचीन काळापासून सर्व कवि करीत आले आहेत!" रामभाऊवर मात करण्याकरितां मी म्हटले.

तो एकदम उद्गारला, "ते सारे कवि मूर्ख आहेत! पहिल्या भेटींत बायको ही मदिराक्षी वाटते खरी; पण दोन मनं एक झालीं—तिच्या निरपेक्ष प्रीतीच्या ज्योतीनं आयुष्यांतला अंधार उजळूं लागला—"

मला हंसूं आवरेना! झाडून साऱ्या कवींना मूर्ख म्हणणारा रामभाऊ स्वतःच काव्य करूं लागला होता!

पण माझ्या हंसण्याकडे त्याचे लक्षच नव्हतें. एखादी अद्भुतरम्य गोष्ट पाहणाऱ्या मनुष्यासारखी त्याची दृष्टि दिसत होती. तो म्हणाला, "सहवासानं मदिराक्षीची हरिणाक्षी होते!"

मी अधिकच कोड्यांत पडलों नि हंसत हंसत म्हणालों, "आम्ही गोष्टी लिहिणारे लोकसुद्धां वाचकांना जेवढं खेळवीत नाहीं, तेवढं तूं—"

"आतां सारं झटकन् सांगतों हं! लग्न झाल्यावर किती तरी दिवस आम्ही दोघं एका स्वप्नसृष्टींत फिरत होतों. तिथं फुलं होतीं, चांदणं होतं. जणूं

काही जगांतील सारी रम्यता त्या स्वप्नसृष्टींत अवतरली होती. त्या पहिल्या तीनचार वर्षांत पत्नीचा चार दिवसाचा विरह मला चार वर्षांसारखा वाटे! एकदां ती माहेरीं अधिक दिवस राहिली. मी एका अपरात्रीच्या गाडीनं तिकडे गेलों. स्टेशनपासून तिचं गांव चार मैलांवर होतं. फिरे रानांतून, काळ्याकुट्ट काळोखांतून मध्यरात्रीं मी ते चार मैल चालत गेलों!"

"तुळशीदासाचा संचार झाला होता वाटतं तुझ्यांत?" मीं थट्टेनें प्रश्न केला.

रामभाऊ गंभीरपणानें म्हणाला, "प्रत्येक मनुष्य तुळशीदासच असतो. तो आरंभीं शरीरसुखाचा गुलाम असतो; पण वेळ आली कीं तो उच्च गोष्टीचा भक्तहि होतो!"

त्याचीं वाक्यें मला अगदीं निरर्थक वाटलीं नाहींत. पण—

मीं म्हटलें, "तुझी आसक्ति कळली. आतां भक्ति ऐकूं या!"

तो बोलूं लागला, "सुटाबुटाचा पोषाक, चहा, नि कुंदाच्या सहवासांत मिळणारं शरीरसुख—या तिन्ही गोष्टींवांचून मी कधींच सुखी होणार नाहीं असं मला नेहमीं वाटे. पण—क्षयानं आजारी असलेल्या बहिणीच्या शुश्रुषेला गेलेली कुंदा तो प्रसाद घेऊन आली! आधींच तिची प्रकृति नाजुक होती; त्यांत या भयंकर रोगाची भर पडली. नेहमींच्या औषधांनीं गुण येण्याचीं चिन्हं दिसेनात; तेव्हां एक निराळाच उपाय करून पाहण्याचं मीं ठरविलं. टेकडीवर धनगराच्या वस्तींत कुंदेला नेऊन ठेवली. शेळी हा आरोग्य-शास्त्राच्या दृष्टीनं किती उपयुक्त प्राणी आहे हें अजून आपणाला—"

"तें जाऊं दे रे—" उत्सुकता उतू जाऊं लागल्यामुळें मीं मध्येंच त्याला अडविलें.

रामभाऊ सांगूं लागला, "कुंदेला पूर्ण गुण यायला दोनतीन वर्षं लागलीं. पण या अवधींत तिचाच नव्हे, तर माझाहि पुनर्जन्म झाला!"

"म्हणजे? तूंहि आजारी—" मी चाचरत दोनतीन शब्द बोललों.

"माझा आजार मनाचा होता." तो हंसत हंसत म्हणाला, "तेव्हांपर्यंत माझी आयुष्याकडे पाहण्याची दृष्टि नुसती उपभोगाची होती. पण कुंदेच्या शुश्रुषेकरितां म्हणून मीं त्या रानवट खेड्यांत राहून जें जग पाहिलं—त्या जगांत एकहि बंगला नव्हता, नुसत्या झोपड्या. पुरुष नुसत्या लंगोटीनं आपल्या लज्जेचं

रक्षण करीत होते. भुकेला भाकरी मिळायची जिथं मारामार तिथं चारचार पांचपांच वेळां चहा कोण पिणार? माणसासारख्या माणसाचा हा आयुष्यक्रम उघड्या डोळ्यांनीं पाहतां पाहतां माझी दृष्टीच बदलली. कुंदा बरी होईपर्यंत मला त्या खेडवळ भागांत राहायचंच होतं. त्या लोकांची दया आली म्हणून आणि कंटाळवाणा वेळ जावा म्हणून मी आसपासच्या खेड्यांतले रोगी पाहून त्यांना फुकट औषध द्यायला लागलों. आणि हां-हां म्हणतां माझ्या दयेचं कर्तव्यांत रूपांतर केव्हां झालं तें माझं मलासुद्धां कळलं नाहीं. एखादी नदी समुद्राला मिळावी तसं माझं जीवन त्या अडाणी, दरिद्री लोकांशीं एकरस होऊन गेलं. त्याच्या सेवेला मी स्वतःला वाहून घेतलं. लवकरच माझा पोषाक बदलला, माझा चहा सुटला नि...ज्या शरीरसुखावांचून चार दिवस-सुद्धां काढणं मला पूर्वी कठीण वाटे, तें मिळावं म्हणून मी तीन वर्षांत आजारी कुंदेला एकदांसुद्धा त्रास दिला नाहीं!"

"खरं?" मीं आश्चर्यानें प्रश्न केला.

रामभाऊ हंसून म्हणाला, "या गोष्टीवर पुष्कळांचा विश्वास बसायचा नाहीं हें मला कळतं. पण अनुभवावरून तुला सांगतों—माणसाच्या मनाला आवाहन देणारं, त्याच्या साऱ्या शक्तींना पुरून उरणारं भव्य, उदात्त असं एखादं काम जर त्याच्यापुढं उभं राहिलं तर त्याला शरीरसुखाचासुद्धां विसर पडतो. आई आधीं पोरांबाळांना जेवूं घालते नि मग उरला-सुरला तुकडा खाऊन तेवढ्यांत आनंद मानते. माणसाचं मनसुद्धा हा चमत्कार करून दाखवूं शकतं. पण त्याला भक्तीचं अधिष्ठान हवं!"

मीं त्याच्याकडे रोखून पाहिलें. त्याच्या दृष्टींत मूर्तिमंत सत्य दिसत होतें.

मी म्हटलें, "जरा स्पष्ट विचारतां, रागावूं नकोस हं! तूं कुंदेपासनं तीन वर्षं दूर राहिलास. या तीन वर्षांत तुला शरीरसुखाची आठवण..."

"अनेकदां झाली." माझें वाक्य त्यानेंच पुरें केलें. लगेच तो मनमोकळे-पणानें हंसून म्हणाला, "सुखाची आठवण होणं हा शरीराचा धर्म आहे. पण जरूर तेव्हां त्याचा त्याग करायला शिकणं हा मनाचा धर्म आहे. हा धर्म मला कुणी शिकवला सांगूं? त्या जंगली प्रदेशांतल्या हजारों जीवांनीं आणि—"

रामभाऊ आणखी एखादी विलक्षण गोष्ट पुन्हां सांगतो कीं काय अशा मुद्रेनें मी त्याच्याकडे पाहूं लागलों.

खिशांतून दहा-वीस सोनचाफ्याचीं फुलें काढून तीं मला दाखवीत तो म्हणाला, “या फुलांचीं ! यांचा सुगंध आपण दुरूनसुद्धां घेऊं शकतों. पत्नीचें प्रेमहि तसेंच—”

वाऱ्याच्या झुळकेबरोबर त्याच्या हातांतल्या फुलांचा जो सुगंध आला त्यानें माझें मन क्षणार्धांत प्रसन्न केलें.

# हिरवा चांफा ४

दहाच्या गाडीनें जाणाऱ्या रामभाऊला निरोप देईपर्यंत—किंबहुना त्याची आकृति स्टेशनवरल्या मंद प्रकाशांत अगदीं अंधुक होईपर्यंत —माझें मन आनंदलहरींवर तरंगत होतें. प्रवाहाबरोबर पोहत जाणाराला पाण्याच्या लहान लहान लाटांच्या मृदु स्पर्शानें जशा गुदगुल्या होतात, तसा रामभाऊच्या आयुष्यांतल्या विविध अनुभवांनीं मला अपूर्व हर्ष झाला होता. एक जुना मित्र फार दिवसांनीं भेटला यामुळें माझें मन प्रफुल्लित झालें होतें हें तर खरेंच; पण तें अगदीं बहरून येण्याचें कारण दुसरेंच होतें.

प्रत्येक मनुष्याच्या कांहीं आवडत्या कल्पना असतात. कृपण मनुष्य आपले पैसे पुनः-पुन्हां मोजून पाहतो ना? आपल्या आवडत्या कल्पनांचा खरेपणा पडताळून पाहण्यांत माणसालाहि तसाच आनंद होतो. रामभाऊचें आयुष्य हें याच दृष्टीनें मला अतिशय आकर्षक वाटलें. बाहेरून खडकाळ दिसणाऱ्या भूमिभागांतहि अगदीं खोल का होईना, जसा पाण्याचा झरा वाहत असतो, तशी व्यवहारी किंवा विलासी मनुष्याच्या अंतःकरणांतहि मानवतेची जाणीव कुठें तरी दडून बसलेली असते, ही माझी लहानपणापासूनची आवडती कल्पना. शहरांत चांगला चालणारा डॉक्टरीचा धंदा सोडून खेड्यापाड्यांची आनंदानें सेवा करणारा रामभाऊ, माझी कल्पना ही केवळ कविकल्पना नाहीं

हें सिद्ध करणारा साक्षीदारच होता. माझी दुसरी आवडती कल्पना तर अनेकांना न पटणारी होती. पतिपत्नींच्या प्रेमाचा आरंभ शारीरिक आकर्षणांत असला तरी, पुढें त्याचें रूपांतर मानसिक आकर्षणांत होतें—या मानसिक आकर्षणामुळें त्यांच्या अनुरक्तीचें रूपांतर भक्तींत होतें—प्रसंगीं शरीरसुख मिळालें नाहीं तरी या एकनिष्ठ भक्तींत अंतर पडत नाहीं— मी असें कांहीं बोलूं लागलों कीं माझे किती तरी मित्र मनांतल्या मनांत मला हंसतात. त्यांना वाटतें—कित्येकांना पोस्टाचीं तिकिटें गोळा करण्याचा जसा नाद असतो ना, तसें उदात्त कल्पनांचा संग्रह करण्याचें वेड मला लागलें आहे! असल्या टीकाकारांचीं तोंडें बंद करण्याइतका पुरावा रामभाऊनें आज मला दिला होता. शरीरसुखाच्या मोहाला बळी पडून आपल्या आजारी पत्नीला त्यानें तीन वर्षांत एकदासुद्धा त्रास दिला नव्हता.

स्टेशनावरून परत येतांना रामभाऊचें तें अपुरें पण अर्थपूर्ण वाक्य एकसारखें माझ्या कानात घुमत होतें–"सोनचांफ्याचा सुगंध आपण दुरूनहि घेऊं शकतों. पत्नीचं प्रेमहि तसंच—"

घरीं आल्यावर कोट काढीत असतांना रामभाऊनें संध्याकाळीं दिलेल्या सोनचांफ्याच्या फुलांकडे माझें लक्ष गेलें. "फुलें हीं डोक्यावर धारण करायचीं असतात; पायदळीं तुडवायचीं नसतात." या भवभूतीच्या वाक्यात मला निराळाच अर्थ दिसूं लागला. तीं फुलें उशाशीं ठेवून मी अंथरुणावर पडलों.

साडेदहा वाजून गेले. त्यामुळें अंथरुणावर पडतांच हां-हां म्हणतां आपल्याला झोंप लागेल अशी माझी कल्पना होती. पण—

मीं डोळे मिटून घेतले, या कुशीवरून त्या कुशीवर आणि त्या कुशीवरून या कुशीवर वळलों, आपण एका बागेंत बसून संध्याकाळचें रम्य दृश्य पाहत आहों अशी कल्पना केली; पण—आज झोंपेनें माझ्याशीं असहकारिता पुकारली होती!

मीं डोळे उघडून पाहिलें. कोपऱ्यांतल्या घड्याळाची टिक्‌टिक् किती स्पष्टपणें ऐकूं येत होती. काळाच्या गिरणींत अगदीं मुख्य यंत्रापाशीं जाऊन उभे राहिलों आहों असा मला भास झाला.

माझ्या मनांतली टिक्‌टिक् मला ऐकूं येऊं लागली. तेथे एक विचारचक्र

सारखें सुरू होतें—दोन कांटे अखंड पुढें सरकत होते. त्यांतला तर्काचा कांटा मंद चालत होता. पण भावनेचा मात्र जोरानें धांवत होता. मला आश्चर्य वाटलें–माझें मन अजूनहि रामभाऊच्या हकीकतीभोंवतींच भ्रमण करीत होतें. पूर ओसरून गेल्यानंतर नदींतले खडक उघडे पडतात ना? तशा रामभाऊनें सांगितलेल्या आत्मवृत्ताविषयींच्या शंका आतां मला स्पष्ट दिसूं लागल्या.

एक मन म्हणे—रामभाऊनें सांगितलेलें सगळें खरें असेल का? छेः! तें शक्य वाटत नाहीं. काळी बाई चारचौघांपुढें जातांना पावडर लावून आपला चेहरा गोरा असल्याचा भास उत्पन्न करते. मनुष्य आपलें अंतरंग उघडें करतांना हीच दक्षता घेतो. या बाबतींत रामभाऊच्या बायकोचीच साक्ष अधिक महत्त्वाची आहे. पण तिची आपली भेट कशी होणार? आणि योगायोगानें तिची नि आपली गांठ कधींकाळीं पडली तरी असल्या नाजुक बाबतींत तिच्याकडून आपल्याला काय कळणार? असलें रहस्य म्हणजे प्रयागची सरस्वतीच! दुसरें मन म्हणे–या बाबतींत कुंदेची साक्ष हवी कशाला? रामभाऊच्या दृष्टींत मूर्तिमंत सत्य तळपत होतें—त्याचा प्रत्येक शब्द निर्मळ सोन्याचा होता. त्यांत कुठेंहि हीण नव्हतें. आपलें अंतरंग लपवून ठेवण्याकडे माणसांचा कल असतो हें खोटें नाहीं; पण रामभाऊ हा या नियमाला अपवाद आहे. अगदीं लहान मुलासारखा आहे तो. आणि माझ्याशीं खोटें बोलून त्याचा असा काय फायदा होणार होता?

दोन मनाच्या या वादविवादांत मूळ प्रश्नाचा निकाल तर लागलाच नाहीं; उलट मी अधिकच गोंधळून गेलों. कुठून ती 'पारिजातकाचीं फुलें' ही पहिली गोष्ट लिहिण्याची बुद्धि झाली असें मला क्षणभर वाटलें.

पण मीं लिहिलेली ती गोष्ट कपोलकल्पित थोडीच होती? शरीर-सुखाच्या बाबतींत नवऱ्याच्या अत्याचाराला कंटाळलेली एक दुर्दैवी तरुणी पाहूनच तर—

तिचा तो पशुप्रमाणें वागणारा नवरा, 'माझी शरीरसुखाची मागणी विमलला इतकी विलक्षण कां वाटावी?' असा प्रश्न करणारा तो पोलिस इन्स्पेक्टर, आणि 'ज्या शरीरसुखावांचून चार दिवससुद्धां काढणं मला पूर्वी कठीण वाटे, तें मिळावं म्हणून मीं तीन वर्षांत आजारी कुंदेला एकदांसुद्धां

त्रास दिला नाहीं.' असें सांगणारा रामभाऊ, यांत खरा कोण? कीं तिघेहि खरेच आहेत?

सहज बोलतां बोलतां दुसऱ्याची अंगठी घेऊन आपल्या बोटांत घालावी आणि ती बाहेर काढतांना पेरावर अडकून बसावी—स्त्रीपुरुषांच्या प्रेम-संबंधाचा हा विचित्र प्रश्न सोडवितांना माझी अगदीं हुबेहूब तशीच स्थिति झाली. एकदां त्या पोलिस इन्स्पेक्टरची बाजू बरोबर वाटे. दुसऱ्यांदा मनांत येई—त्याच्या बायकोचें आत्मचरित्र वाचायला मिळाल्याखेरीज त्याचे म्हणणें बरोबर आहे असें म्हणणें चूक होईल. लगेच कल्पना सुचे—रामभाऊ-प्रमाणें त्यानेंहि थोडा संयम केला असता तर बरें झालें नसते का? दुसऱ्याच क्षणीं कानात कुणी तरी कुजबुजे—संयम हा मनाचा धर्म आहे. शरिराचा धर्म सर्व माणसांत सारखा असेल; पण मनाचा धर्म? मनाचा धर्म हें अक्रोडाचे झाड आहे—फुलवेल नव्हे. अक्रोडाला कधीं लवकर फळें येत नाहींत.

एखादे अवखळ मूल हुदडून हुदडून झोंपीं जातें तसें माझे मनहि शेवटीं निद्रावश झालें.

मला झोंप लागली खरी; पण ती स्वस्थ नव्हती. एकामागून एक भयंकर स्वप्नें पडत होतीं मला.

पहिल्या स्वप्नात दोन नद्यांचा संगम दिसला मला. त्यांतल्या एका नदीच्या लाटांतून एकच आक्रोश ऐकूं येत होता—'कुणी तरी मला सोडवा! मला वांचवा! ही दुसरी नदी माझा गळा दाबतेय्!'

दुसऱ्या स्वप्नांत वृक्षाला विळखा घालून उभी असलेली एक वेल दिसली. वेल मोठी नाजूक होती. एकदम एक वादळ उठलें. वादळ सुटतांच ती वेल थरथर कांपूं लागली. क्षणार्धांत ती उन्मळून पडणार असेंच मला वाटलें. पण काय चमत्कार झाला कुणाला ठाऊक! त्या वृक्षाची एक खांदी कडाडून मोडून पडली; पण ती वेल मात्र जशीच्या तशी सुरक्षित राहिली.

× × ×

स्वप्नाची तुलना याचकांशीं करावी कीं गुप्त पोलिसांशीं करावी हा मतभेदाचा मुद्दा असेल; पण तीं एखाद्याचा पाठपुरावा करूं लागलीं, कीं

त्याला अगदीं सळो कीं पळो करून सोडतात याबद्दल कुणाचेंच दुमत होणार नाहीं.

अनेक चित्रविचित्र स्वप्नांनीं अगदीं पहांटेपर्यंत माझा पिच्छा पुरविला.

माझी झोंप पुरी झाली नव्हती. डोळ्यांवरहि सुस्ती होती. पण उजाडल्यावर झोंपण्यापेक्षां कुठेंतरी फेरफटका करून यावें म्हणजे जरा बरें वाटेल असें माझ्या मनांत आलें.

चहा घेऊन मी घराबाहेर पडलों आणि झपझप चालूं लागलों. रंकाळ्याकडे जावें असें एकदां मनांत आलें. पण रंकाळ्याबरोबर रामभाऊचीहि आठवण झाली. तें न सुटणारें कोडें—

माझीं पावलें विरुद्ध दिशेनें वळलीं. राजारामपुरींतल्या रस्त्यानें जातांना मला बरीच हुशारी वाटूं लागली. मात्र रस्त्याच्या दोन्ही बाजूंचीं वडाचीं झाडें पाहतां पाहतां माझ्या मनांत एक विचित्र कल्पना आली. माणसाचें मनहि असेंच असतें. वडाच्या अनंत पारंब्या आणि माणसाच्या मनांतील अगणित विचार-विकार...

मीं समोर पाहिलें. सूर्याच्या स्वागतार्थ पूर्वदिशा आपल्या अंगणांत रांगोळी घालीत होती.

क्षणोक्षणीं बदलणाऱ्या समोरच्या विविध रंगांच्या छटा पाहतां पाहतां मी पाण्याच्या खजिन्याच्या टेकडीवर केव्हां येऊन पोंचलों तें मला कळलेंसुद्धां नाहीं. पूर्वेकडे तोंड करून एका बाकावर मी बसलों. पूर्वेकडल्या रंगछटांत माझें मन रंगून गेलें व मंदमंद वायुलहरींवर तें तरंगूं लागलें. प्रातःकालीं मनुष्याचें बाल्य परत येतें असा विचार माझ्या मनांत येऊन गेला. इतक्यात 'नमस्कार खाडेकरसाहेब !' या कुणाच्या तरी शब्दांनीं माझ्या क्षणिक बाल्याचा भंग झाला.

मीं मागें वळून पाहिलें. गोपाळराव मराठे नि त्यांच्या पाठीमागें तीस-बत्तीस वर्षांची एक बाई ! मीं गोपाळरावांना नमस्कार करीत म्हटलें, "मोठं आश्चर्य आहे बुवा !"

"कसलं ?"

"तुम्हा सकाळी फिरायला येतां हें ! रात्रौ थेटरवर बारावारा वाजपर्यंत जागायच नि—"

"तुमचा गैरसमज झालाय् थोडा! मी आजच पहिल्यांदां फिरायला आलोंय्!"

या बाजूला फिरायला येण्याची साथ आजच गांवांत सुरू झाली आहे कीं काय हें मला कळेना!

गोपाळराव मागें वळून पाहत म्हणाले, "ही माझी बहीण. काल रात्रींच आलीय्. हिला आहे सकाळीं फिरायची संवय. तेव्हां हिच्याबरोबर—"

गोपाळरावांच्या बहिणीनें मला नमस्कार केला. मींहि तिला प्रति-नमस्कार केला.

"तुम्हांला भेटायची फार इच्छा आहे हिला." गोपाळराव म्हणाले.

"नुकतंच एक पत्र पाठविलं होतं मीं तुम्हांला."

"कशाबद्दल?"

"तुमची ती 'पारिजातकाचीं फुलं' ही गोष्ट मला फार आवडली म्हणून. 'एक भगिनी' अशी सही केली होती मीं पत्राखालीं."

NA...एवढाच पोस्टाचा शिक्का असलेलें एक पत्र मला काल आलें होतें. त्या पत्रांत 'एक भगिनी' अशीच सही होती. 'तुम्हांला वाचायला वेळ असेल तर माझ्या डायऱ्या मी तुम्हांला पाठवून देईन' असेंहि त्या भगिनीनें पत्रांत लिहिलें होतें.

गरिबाला गुप्त धन सांपडावें तसें मला झालें. पत्रावरलीं तीं NA... हीं अक्षरें नाशिकच्याच छापाचीं असलीं पाहिजेत अशी माझी खात्री झाली. गोपाळरावांची ही बहीण म्हणजे त्या पोलिस इन्स्पेक्टरची बायको विमल—याविषयीं मला मुळींच शंका उरली नाहीं. नवरा दुसरी बायको मिळविण्या-करितां या बाजूला आलेला पाहून पहिल्या बायकोनें त्याचा पाठलाग आरंभला असावा अशी कल्पना मनांत येऊन मी थोडासा हंसलोंसुद्धा. माझें हंसणें गोपाळरावांच्या लक्षांत आलें असावें. ते गोंधळलेल्या दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागले. मी त्यांच्या बहिणीकडे पाहत म्हणालों, "काल यांचे यजमान माझ्याकडे येऊन गेले."

पायाखालची जमीन हालूं लागावी तसें कांहीं तरी त्या बाईला वाटलें असावें. विचित्र नजरेनें ती माझ्याकडे पाहूं लागली. गोपाळरावांच्या मुद्रेवर तर आश्चर्याचा समुद्रच पसरला होता. ते उद्गारले, "म्हणजे?"

" म्हणजे काय ? ते नाशिकचे पोलिस इन्स्पेक्टर काल माझ्याकडे येऊन आपली सारी हकीगत सांगून गेले."

गोपाळराव संथपणानें म्हणाले, " माझे मेव्हणे नट आहेत; पोलिस इन्स्पेक्टर नाहींत !"

थंडींत खोबरेल थिजून त्याचे तुकडे पडतात ना, तशी माझ्या मनाची स्थिति झाली. मीं गोपाळरावांच्या बहिणीकडे पाहत म्हटलें, " कालच्या तुमच्या पत्रावर NA... असा छाप होता नि ते इन्स्पेक्टर नाशिकचेच होते. तेव्हां मला वाटलं—"

ती मध्येंच म्हणाली, " नागपूरहून तें पत्र पाठविलं होतं मीं !"

पाय घसरल्यावर कसाबसा तोल सावरण्याचा प्रयत्न करावा आणि त्या धडपडींत कुणाचा तरी धक्का लागून सपशेल लोटांगण घालावें—अगदीं तस्सें झालें हें.

मी मनांत शरमून गेलों. पण त्याचबरोबर गोपाळरावांच्या बहिणीच्या डायऱ्या वाचायला मिळतील तर फार बरें होईल अशी उत्कट इच्छाहि माझ्या मनांत उत्पन्न झाली. त्यामुळें ' आतां आमच्याकडे चहा घेऊनच चला की ' असें गोपाळरावांनीं म्हणतांच मीं त्यांच्या निमंत्रणाचा अगदीं तहानेलेल्या मनुष्याप्रमाणें स्वीकार केला.

× × ×

रस्त्यानें जातां जातां गोपाळरावांनीं आपल्या बहिणीची जी हकीगत सांगितली, तिच्यामुळें तर तिनें लिहून ठेवलेलें आत्मवृत्त केव्हां वाचीन असें मला झालें.

नवऱ्याशीं भांडण होऊन ती नागपूरहून एकदम निघून आली होती. आल्याबरोबर मला भेटण्याची इच्छाहि तिनें गोपाळरावांच्यापाशीं व्यक्त केली होती. तिनें निरनिराळ्या वह्यांत लिहिलेली स्वतःची सारी हकीगत वाचायला मला कदाचित् कंटाळा वाटेल, म्हणून त्यांतल्या महत्त्वाच्या भागावर तिनें तांबड्या पेन्सिलीनें खुणासुद्धां करून ठेवल्या होत्या म्हणे ! हें ऐकून तर मी चकितच झालों.

गोपाळरावांच्या घरीं पोंचतांच त्यांनीं पांच वह्या माझ्यापुढें टाकल्या. वर तारीख आणि खालीं हकीगत, असा मजकूर प्रत्येक वहींत लिहिला होता.

मीं भरभर त्यांचीं पानें चाळून पाहिलीं. कित्येकदां क्रमानें एकदोन दिवसांची हकीकत लिहिली होती. तर कांहीं ठिकाणीं दोन तारखांत सहा महिन्यांचें अंतर होतें!

मी पहिली वही घेऊन तिच्यांतला तांबड्या पेन्सिलीनें खूण केलेला मधलाच भाग वाचूं लागलों—

"आज त्यांची वाट पाहून मी अगदीं रडकुंडीला आलें. एक वाजून गेला तरी—

लग्नाला अजून सहा महिनेसुद्धां झाले नाहींत. पण—

मोठ्या आशेनें एखादें सुंदर लुगडें विकत घ्यावें नि पहिल्याच धुण्यांत तें विटून जावें...अगदीं तस्सा झाला आहे माझा संसार! लग्नापूर्वी मी मनांत केवढे मांडे भाजीत होतें. आणि आज? साध्या पोळीलासुद्धां मी महाग झालें आहें!

बायकोवर प्रेम करायचें नव्हतें तर यांनीं लग्न केलें तरी कशाला?

यांचा स्वभाव कसा गोगलगायीसारखा गरीब आहे! पानांत पडेल तें मुकाट्यानें खातात आणि आपल्या खोलींत मोठींमोठीं धार्मिक पुस्तकें घेऊन वाचीत बसतात. स्वारी कधीं कुणाच्या अध्यामध्यांत पडायची नाहीं कीं कुणाला रागानें बोलायची नाहीं.

पहिल्यापहिल्यांदा मला या गरीबपणाचें कौतुक वाटलें; पण आतां—

रात्रीं खोलींत पाऊल टाकलें कीं त्यांच्याभोंवतीं गराडा घालून बसलेल्या लठ्ठलठ्ठ पुस्तकांचा असा राग येतो मला! वाटतें—चांगलीं चार पोतीं घ्यावींत नि त्यांत सारीं पुस्तकें भरून तीं रद्दी म्हणून कुणाला तरी देऊन टाकावींत! छे! या युक्तीचा कांहीं उपयोग होणार नाहीं. रद्दीच्या दुकानांतून सारीं पुस्तकें ते परत आणतील! त्यांच्या नि माझ्याआड येणारी ही अडगळ न्हाणीच्या चुलींतच घालायला हवी!

हा आकरताळा विचार मनांत आला नाहीं अशी एकहि रात्र आतांशीं जात नाहीं. लहानपणीं मला पुस्तकांचें फार प्रेम होतें. पण आतां माझी जागा बळकावणारीं त्यांच्या खोलींतलीं हीं पुस्तकें पाहिलीं कीं माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाते. खोलींत आल्यावर 'पाय चेपूं का?' म्हणून

विचारलें तर हे हंसून उत्तर देतात, 'तुझा नवरा कांहीं पहिलवान नाहीं! तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणारा विद्यार्थी आहे तो!'

मी खुर्चीत पेंगत बसलें कीं ते मला हळूच म्हणतात, 'माझ्या हातांतलं पुस्तक संपायला एक वाजेल. तिथपर्यंत तूं काय अशी जागतच बसणार आहेस?'

त्याचें हें वाचनाचें वेड– ही धार्मिक गोष्टींची हौस–मला काय वाटतें तें त्यांच्या कधीं लक्षांतच येत नाहीं!

आणि अलीकडे तर बाराएक वाजल्याशिवाय ते घरीं परतच येत नाहींत! कुठल्याशा बुवाचीं प्रवचनें सुरू आहेत गांवांत. महिना झाला; पण यांचें त्या बुवाचें वेड काहीं कमी होत नाहीं अजून!"

× × ×

एवढा मजकूर वाचतांच मी गोंधळून गेलों. मघाशीं गोपाळरावांनीं आपला मेंव्हणा नट आहे म्हणून मला सांगितलें होतें. मी जी हकीगत वाचीत होतों तिचा नि या गोष्टीचा कांहीं केल्या मेळ बसेना.

मीं साशंकतेनें गोपाळरावांच्याकडे पाहिलें.

ते हंसून म्हणाले, "अरेच्या! तुम्ही पहिलीच वही वाचताय्; होय ना? एक गोष्ट मी तुम्हांला सांगायला विसरलों होतों. आमच्या ताईचा हा पुनर्विवाह आहे."

आतां कुठें मीं वाचलेल्या मजकुराची संगति मला लागली. मीं हातांतल्या वहीकडे बोट दाखवीत गोपाळरावांना विचारलें, "या धार्मिक गृहस्थांचं पुढं काय झालं?"

"त्याचं हें धर्माचं वेड वाढतच गेलं. पुढं स्वारी घर सोडून गेली. पण—"

गोपाळरावांनीं दुसरी वही उघडून तिच्यांतला तांबडी खूण केलेला एक भाग माझ्यापुढें केला.

मी वाचूं लागलों—

"सासूबाई अगदीं अंथरुणाला खिळल्या आहेत. त्यांचा सारा जीव या मुलावर. हे परदेशी झाल्यापासून त्यांच्या डोळ्यांचें पाणी एक दिवसहि खळलें नाहीं. शेवटीं त्यांचा पत्ता लागला. हरिद्वारला गेले होते ते. मीं त्यांना पत्र पाठविलें– 'काहीं करून घरीं या.'

त्यांनीं उत्तर पाठविलें, 'मी घरीं आलों तर माझ्या व्रताचा भंग होईल. लौकिकदृष्ट्या तूं नि मी पतिपत्नी असलों तरी यापुढं तूं माझी बहीण आहेस नि मी तुझा भाऊ आहें हें कबूल असेल तर–'

मायलेकरांची ताटातूट होऊं नये म्हणून मीं त्याचें म्हणणें कबूल केलें. ते घरीं राहायला आले. ते इतके जवळ आले असतांना त्यांच्यापासून दूरदूर राहायचें! पहिले कांहीं दिवस मीं तळमळून काढले. एकसारखें वाटे– त्यांनीं मला मारलें असतें, झोडलें असतें, तरी हरकत नव्हती; पण त्यांनीं मला असें दूर लोटायला नको होते.

पुढें पुढें हें सारें माझ्या अंगवळणीं पडलें. जन्मठेप झालेला कैदी संवयीनें जसा हंसत खेळत सारे व्यवहार करूं लागतो, त्याप्रमाणें मींहि सासूबाईच्या सेवेंत नि घरांतल्या उद्योगधंद्यात गढून जाऊं लागलें. त्यांनीं घालून दिलेली मर्यादा मोडण्याचा मीं प्रयत्न करूं नये म्हणून ते मला कांहीं धार्मिक पुस्तकें वाचायला देऊं लागले. त्या साऱ्या पुस्तकात स्त्रीपुरुषाचें प्रेम हें पाप आहे, स्त्री ही पुरुषाला नरकांत नेणारी मोहिनी आहे, अशा अर्थाचा पुष्कळसा मजकूर असे.''

× × ×

वहीचें पान इथेंच सपलें होतें. मी तें उलटून पुढें वाचायला लागणार तितक्यांत गोपाळराव म्हणाले, " पुढं दोन वर्षांनीं ताईची सासू वारली. नवराहि वारला. मीं तिला मुंबईला ठेवून ट्रेनिंगचं शिक्षण मिळविण्याची व्यवस्था केली. ती मास्तरीण झाल्यावर..."

तिसरी वही तशीच टाकून त्यांनीं चौथी वही उघडली. आणि तिच्यांतलें एक पान काढून तें मला वाचायला दिलें—

"मास्तरीण होईपर्यंत मला प्रेमाची, लग्नाची, संसाराची किंवा असल्या गोष्टींची फारशी आठवणच होत नसे. पुढें पहिली एकदोन वर्षें शिकविण्यांत माझें मन इतकें रमून गेलें कीं सांगून सोय नाहीं. पण पहिला उत्साहाचा भर ओसरला नि मग माझें आयुष्य मला ओकें ओकें वाटूं लागलें. शाळेंतल्या एखाद्या लहान मुलीला जवळ घेतलें कीं तिनें मला 'आई' म्हणून हाक मारावी, अशी गोड गोड इच्छा माझ्या मनांत उत्पन्न होई. पण ती 'बाई' म्हणूनच मला हांक मारी. आणि मग मला वाटे—पाणी पाहून कांहीं

माणसाची तहान भागत नाहीं; तें प्यायला मिळावें लागतें. मायाहि तशीच आहे.

मी शाळेंत मुलींना एक 'बेबी'चें गाणें शिकवीत असें. ती 'गोड गोड' बेबी रोज रात्रीं माझ्या स्वप्नांत येई. तिचे छोटेछोटे पाय लागून माझ्या अंगावर गोड कांटा उभा राही. पण तें स्वप्न हां-हां म्हणतां नाहींसें होई. जागी होऊन मी अंथरुणावर तळमळत पडें. माझ्या मनांत येई-मीं पूर्वजन्मीं असें काय पाप केलें होतें म्हणून देवानें मला पतीचें तर नाहींच, पण मुलाचें-सुद्धां सुख दिलें नाहीं ?

याच वेळीं माझ्या ओळखीच्या दोन मास्तरणींचा पुनर्विवाह झाला. त्या दोघींहि रूपानें माझ्यापेक्षां वाईटच होत्या. माझ्या मनांत एकच विचार घोळूं लागला—आपणहि पुन्हां लग्न केलें तर ? विधवाविवाह-मंडळाकडे अर्ज करावासें वाटे. पण कांहीं केल्या धीर होईना. दोन्ही भाऊ बरोबरीचे. पण थोरला सदाशिव बायकोशीं भांडून कुठें परागंदा झालेला ! गोपाळपाशीं गोष्ट काढावी तर—त्यानें मला शिक्षण देऊन मार्गाला लावलें होतें. त्याला हें आवडेल कीं नाहीं अशी शंका—

मी मनांत तशीच झुरत राहिलें असतें. पण मुंबईला गोपाळाच्या घरीं त्याच्या एका नवीन स्नेह्याची ओळख झाली. ते मॅट्रिक झालेले होते. एका चांगल्या नाटक मंडळींत त्यांना दीडदोनशें रुपये पगार मिळत होता. त्यांचें वर्तन अगदीं धुतल्या तांदळाप्रमाणें आहे म्हणून गोपाळ सांगत होता. त्यांची बायको नुकतीच वारली होती. एक लहान मुलगी तेवढी होती त्यांना. नेहमीं आजोळींच असे ती.

लवकरच आम्हीं दोघें बरोबर फिरायला जाऊं लागलों. त्यांना आमच्या घरीं यायला थोडा उशीर झाला तरी मला करमेनासें होई. ते आल्यावर आमच्या गप्पागोष्टींत तिसरें कुणी भाग घेऊं लागलें कीं त्याचाहि मला राग येई. ते दुसरें लग्न करणार होते. पुनर्विवाह करतां आला तर अधिक बरें असें त्यांनाहि वाटत होतें.

आजपर्यंत माझा छळ करणाऱ्या देवाला आतां माझी दया आली असें मला वाटलें.

लग्न झाल्यावर आमचे पहिले दिवस मोठ्या आनंदांत गेले. त्यांच्या

आग्रहावरून मीं नोकरी सोडली. कंपनीबरोबर महिना दोन महिन्यांनीं नवें गांव पाहायला मिळे. त्यामुळें दिवस हां-हां म्हणतां मागे पडत.

आज ना उद्यां आपल्याला मूल होणार या कल्पनेनें तर मी अगदीं वेडावून गेलें होतें. मात्र मधून केव्हां तरी त्यांचें नाटक पाहायला गेले कीं माझें मन थोडे अस्वस्थ होई. नाटक मंडळींत नायिकेचें काम करणारी मुलगी फार सुंदर होती. यांच्याकडे बहुधा नायकाचें काम असे. हे तिला जवळ घेतांना इतक्या प्रेमानें तिच्याकडे पाहत–त्या वेळीं टाळ्यांनीं थेटर कोसळून पडतें कीं काय असें वाटे. त्या टाळ्या ऐकतां ऐकतां माझ्या मनांत येई–या बाईमुळें माझ्या प्रेमाचें मंदिर कोसळून पडणार नाहीं ना?

नाटक संपवून घरीं आल्यावर माझ्या मनांतली ही शंका त्यांना सांगितली कीं ते म्हणत, 'वेडी कुठली! अग, तें प्रेमाचं नाटक होतं. माझं खरं प्रेम तुझ्यावरच—'

नवसानें झालेल्या मुलाला आई जशी पापे घेऊन हैराण करते अगदीं तशी ते माझी स्थिति करून टाकीत. त्यांच्या प्रेमाच्या आवेगानें मला अगदीं गुदमरल्यासारखें होई. पण त्याच वेळीं मनाला केवढा उल्हास वाटे! वळवाच्या पावसांतून गारा पडायला लागल्या कीं त्या अंगावर चप्चप् बसतात. पण गारांबरोबर पडणाऱ्या पावसामुळें उकाडाहि नाहींसा होतो. त्यांच्या प्रेमाच्या वृष्टींत मलाहि हे दोन्ही अनुभव येत.

मात्र त्यांनीं आपलें मन थोडें ताब्यांत ठेवावें असें मला राहून राहून वाटे. सकाळीं चहा द्यायला गेलें कीं ते माझी चेष्टा करीत–नि तीसुद्धां दार उघडें आहे, मोलकरीण दारावरून केव्हां जाईल याचा नेम नाहीं, हें कळत असूनसुद्धां!

पुढें त्यांच्या नव्या नाटकाच्या तालमी सुरू झाल्या. एके दिवशीं संध्याकाळीं सहा वाजतां ते घरीं परत आले. शेजारच्या बायकांच्या बरोबर सिनेमाला जायला निघालें होतें मी; पण त्यांनीं मला जाऊं दिलें नाहीं 'डोकं दुखतंय्' असे तरी सांगायचे? तेंहि नाहीं! 'तुझ्याशिवाय मला करमत नाहीं' असें सरळ बोलून गेले ते!

दुसरे दिवशी त्या बायकांनीं माझी अशी थट्टा केली—

पुढें लवकरच मला दिवस गेले—स्वर्ग अगदीं दोन बोटें उरला मला."

× × ×

मीं वहीमध्यें बोट ठेवून ती मिटली नि गोपाळरावांना विचारलें,

" इतक्या प्रेमळ जोडप्याचं पुढं पटेनासं झालं ?"

" एकमेकांचं तोंड पाहणार नाहींत हीं दोघं आतां !"

माझ्या मनांत आलें—प्रीतीला देवानें एक विचित्र शाप देऊन ठेवला आहे हेंच खरें. एखाद्या सुंदर तळ्यांतलें पाणी आटून पुढें तिथें नुसता गाळ उरावा तसें प्रारंभींचे प्रेम नाहींसें होऊन माणसांच्या मनांत अतिपरिचयानें उत्पन्न झालेला तिरस्कारच तेवढा शिल्लक राहतो कीं काय कुणाला ठाऊक !

गोपाळरावांनीं पांचवी वही उघडून माझ्यापुढें केली होती. मी वाचूं लागलों—

" बागेंत फुलें नि घरांत मुलें असें कुणीं तरी म्हटलें आहे ना ? किती खरें आहे तें !

दिनू आणि मनू या दोघांना खेळायला घर पुरत नाहीं नि मला त्यांचें सारें यथासांग करायला दिवस पुरत नाहीं. सूर्य उगवला केव्हां अन् मावळला केव्हां हेंसुद्धां मला कळत नाहीं हल्लीं.

मनूच्या वेळेला डॉक्टर त्यांना म्हणाले, ' हें बाळंतपण यांना कांहीं मानवलं नाहीं. तेव्हां...'

पुढें डॉक्टर नुसते हंसले होते. पण त्या हंसण्याचा अर्थ त्यांच्याइतकाच मलाहि कळला होता. मीं मनांत म्हटलें, ' आतां मला मूल झालं नाहीं तरी चालेल '

मी त्यांच्यापासून दूरदूर राहूं लागलें. मला त्यांत कठीण असें कांहींच वाटलें नाहीं.

त्यांना माझें हें दूरदूर राहणें आवडत नसावें. ते म्हणूं लागले, ' मुलं झालीं कीं बायकोचं नवऱ्यावरलं प्रेम कमी होतं हेंच खरं.'

मी उत्तर देऊं लागलें, ' नवऱ्यानेंहि मुलांवर प्रेम करावं कीं. कोण नको म्हणतंय् ?'

हें उत्तर ऐकून ते हंसत. पण तें हंसणें मला कसेंसेंच वाटे. अगदीं कोमेजून गेलेल्या फुलासारखें.

पुढें लवकरच त्यांची नाटकमंडळी बंद झाली. पुष्कळ दिवस त्यांना कांहींच

काम मिळेना. मी पुन्हां मास्तरीण झालें. शाळेचें काम, दोन मुलांचें खाणें-पिणें, आजार...

रात्रीं अंथरुणावर पडलें कीं मीं अगदीं गाढ झोंपी जाई.

पण ते मात्र मला सुखानें झोंपूं देईनात. मध्येंच मला हालवून जागे करीत. 'काय!' म्हणून विचारलें म्हणजे 'कांहीं नाहीं!' म्हणत. मी पुन्हां झोंपतेंय् असें वाटलें कीं, नोकरीच्या गोष्टी काढीत आणि 'अमक्या सिनेमा कंपनीकडे खटपट करूं या काय?' म्हणून मला विचारीत. मी म्हणें, 'मला काय कळतंय् त्यांत'?"

न कळत माझ्या हातांनीं वही मिटली.

माझ्या मनांत आलें—लहानशी जखम धूळ बसून जशी दोषी होते नि चरत जाते, तशी नवराबायकोंच्या लहानसहान मतभेदांची स्थिति होत असावी!

मी शून्य दृष्टीनें समोर बघत आहें हें लक्षांत येऊनच कीं काय, गोपाळराव मला म्हणाले, 'कंटाळा आला असेल तुम्हांला हें वाचून. हा एवढा शेवटचा भाग वाचलात कीं ताई संतापानं कां निघून आली हें कळेल तुम्हांला."

त्यांनीं उघडून दिलेलें पान मी वाचूं लागलों—

"खांडेकरांची 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट वाचून मला किती बरें वाटलें! किती तरी दिवस हें जें विचित्र कोडें मला उलगडत नव्हतें तें आज सुटलें. पुरुषांचें प्रेम शरिरावरच असते हेंच खरें. गेल्या तीन वर्षांत या कटु-सत्याचा मीं कितीदा तरी अनुभव घेतला आहे.

हिरव्या चांफ्याचा वास दुरून किती तरी मोहक वाटतो; पण तो जवळून एकसारखा घेऊं लागलें कीं थोड्याच वेळांत डोकें कसे सुन्न होतें! पुरुषांचें प्रेम हें फूल असलें तरी तें हिरव्या चांफ्याचें फूल आहे हेंच खरें!

दुपारीं खांडेकरांना पत्र पाठविलें.

संध्याकाळीं एक मैत्रीण माझ्याकडे राहायला आली. 'तुझे पतिराज कुठं गेले आहेत?' असें तिनें मला विचारलें. मीं उत्तर दिलें, 'त्यांना सिनेमांत काम मिळालंय्. औट-डोअरला गेले आहेत ते. पांचसहा दिवस झाले त्यांना जाऊन.' हें ऐकून तिला फार आनंद झाला. माझ्यावरोबर गप्पागोष्टी करण्याची तिला फार हौस होती.

रात्रीं बारा वाजेपर्यंत आम्हीं बोलत होतों. बारा वाजतां दार वाजलें म्हणून मी उठून गेलें नि तें उघडलें. ते परत आले होते. 'जेवायचंय् का ?' मीं विचारलें. मानेनें 'नाहीं' म्हणत ते आपल्या खोलींत गेले.

मी माझ्या मैत्रिणीपाशीं येऊन झोंपलें. पलीकडेच दिनू नि मनू दोघेंहि निजलीं होतीं.

माझा डोळा लागून घटकासुद्धां झाली नसेल...कुणी तरी माझ्या पायाला गुदगुल्या करीत आहे असें मला वाटलें. उंदीरबिंदीर पाय कुरतुडत असेल म्हणून मी दचकून उठलें. पाहतें तों—

दिव्याच्या अंधुक प्रकाशांत त्यांची आकृति मला अगदीं भेसूर वाटली. माझ्या मैत्रिणीकडे बोट दाखवून मीं त्यांना बाहेर जायला सुचविलें.

पण कांहीं केल्या त्यांचें पाऊल जागचें हालेना !

मनूला झोंपेंत दचकून ओरडत उठण्याची संवय होती. तो आतांच उठला तर मोठी पंचाईत होईल म्हणून मीं त्यांचा हात धरून त्यांना खोली-बाहेर नेलें.

त्यांची समजूत घालून मी चट्कन् परत येईन असें मला वाटलें होतें. पण—दारूबाजाप्रमाणें त्यांचीहि शुद्धि गेली होती.

त्यांच्या चेहऱ्यावर लाचारी आणि क्रूरपणा यांचें इतकें विलक्षण मिश्रण झालें होतें कीं माझ्या तोंडांतून शब्दच बाहेर फुटेना !

मीं त्यांच्या हातांतून सुटण्याची धडपड केली. पण...

त्यांची खोली कसली ? तुरुंगच वाटला तो मला. माझ्या मनांत आलें कीं स्त्री ही जन्मठेप झालेली कैदी आहे !

मनूची किंकाळी मला एकदम ऐकूं आली. पण—

त्या किंकाळीनें माझी मैत्रीण जागी झाली होती. ती मोठमोठ्यानें मला हांका मारीत होती. मनूला घेऊन ती आमच्याच खोलीकडे आली. लाजेनें मला मेल्याहूनहि मेल्यासारखें झालें !

मीं मनांत निश्चय केला—हा जुलूम आतां याच्यापुढें सोसायचा नाहीं. मला पुरुषाचें प्रेम हवें होतें. तें प्रेम सोनचांफ्यासारखें असेल असें मला वाटलें होतें. पण प्रत्यक्ष अनुभव अगदीं निराळा आला. प्रेम म्हणजे कांहीं जुलूम करायचा परवाना नव्हे !"

× × ×

आंतून चहा आल्यामुळें मला वही मिटावी लागली.

चहा घेतां घेतां गोपाळराव म्हणाले, " मला तरी कांहीं सुचेनासं झालंय्! ताई नवऱ्याच्या छळाला कंटाळून परत आली. माझा थोरला भाऊ सदाशिव बायकोच्या छळानं वैतागून—"

" म्हणजे?" तोंडापाशीं नेलेला चहाचा पेला तोंडाला न लावतां मीं प्रश्न केला.

गोपाळराव उद्गारले, " पळसाला पानं तीन हेंच खरं. सदूभाऊचा संसार असाच झाला. शेवटीं बायकोच्या त्रासाला कंटाळून बिचारा घर सोडून गेला. त्याचं तें शेवटचं विलक्षण पत्र—"

" इथं तुमच्यापाशीं आहे?" मीं मध्येंच प्रश्न केला.

गोपाळराव म्हणाले, " मुंबईच्या साने डॉक्टरांनीं तें नेलंय्. या विषयावर एक पुस्तक लिहिताहेत ते."

माझी थोडी निराशा झाली.

चहा संपवून मी पुन्हां समोरच्या वह्या चाळायला लागलों. एका वहीच्या शेवटच्या पानावर 'सौ. सिंधु आपटे' हे नांव दिसलें. मीं गोपाळरावांना विचारलें, " हे तुमच्या बहिणीचंच नांव का?"

त्यांनीं मानेनें 'हो' म्हटलें.

एक आठवण होऊन मी विचार करूं लागलो. आपटे आणि नट! शाळेंत माझ्यामागें तीनचार वर्षें बंडू आपटे म्हणून एक विद्यार्थी होता. तो पुढें प्रसिद्ध नट झाला हेंहि मला ठाऊक होतें. सालस व सद्वर्तनी नट म्हणून त्याचा लौकिक मीं अनेकांच्या तोंडून ऐकला होता. त्या लौकिकावरून तो असा विचित्र मनुष्य असेल असें कांहीं वाटत नव्हतें. म्हणून मीं गोपाळ-रावांना विचारले,

" तुमच्या मेव्हण्याचं नांव काय?"

" बंडोपंत आपटे!"

नुकतींच वाचलेलीं तीं विचित्र वाक्यें माझ्या डोळ्यांपुढून नाचत गेलीं—

" हिरव्या चाफ्याचा वास दुरून किती मोहक वाटतो! पण तो जवळून एकसारखा घेऊं लागलं, कीं थोड्याच वेळात डोकं कसं सुन्न होऊन जातं!"

# केवड्याचे कांटे ५

“हिरव्या चाफ्याचा वास दुरून किती मोहक वाटतो! पण तो जवळून एकसारखा घेऊं लागलं कीं डोकं कसं सुन्न होऊन जातं! पुरुषाचं प्रेम हें फूल असलं तरी तें हिरव्या चाफ्याचं फूल आहे!”

घरीं जाईपर्यंत हीं विचित्र वाक्यें एकसारखीं माझ्या मनांत घोळत होतीं. सत्यापेक्षा सौंदर्यामध्येंच मनुष्याला मोह पाडण्याचें सामर्थ्य अधिक असावें. नाहींतर या वाक्यांतला अनुभव एकांगी आहे—किंबहुना एका व्यक्तीचा आहे—असें मधूनमधून वाटत असतानासुद्धा माझे विचार या वाक्यांभोंवतीं कां घुटमळत राहिले असते?

घरीं येतांच मी थेट माडीकडे वळलों. लिहिण्यांत नाहीं तर वाचण्यांत मन गुंतवून टाकलें कीं त्या विचित्र वाक्याचा विसर पडेल अशी माझी कल्पना होती.

बैठ्या टेबलापाशीं नेहमींप्रमाणें मी माडी दुमडून बसलों. संकल्पित लेखनाचीं सारीं टांचणे चाळलीं. पण कांहीं केल्या समोरली पेन्सिल उचलावी नि लिहायला सुरवात करावी असें मला वाटेना. राहून राहून सिंधु आपटेच्या त्या हस्तलिखिताची आठवण होऊं लागली. वाटलें—तिचे सारें आत्मवृत्त आपण वाचलें असतें तर तिच्या परिस्थितीवर अधिक प्रकाश पडला असता.

माझ्या अस्वस्थ मनांत प्रश्नचक्र सुरू झालें–प्रत्येक व्यक्तीचें आयुष्य हें एक निराळेंच स्वतंत्र जग असतें, कीं बाह्यतः भिन्न दिसणाऱ्या या अनंत जगाचा आत्मा एकच असतो ? प्रेम हें विष आहे कीं अमृत आहे ? मनुष्यानें सुखी होऊं नये अशीच निसर्गाची इच्छा आहे काय ?

असल्या प्रश्नांच्या चक्रव्यूहांत शिरणें सोपें असतें; पण त्यांतून बाहेर पडणें ?

छेः !

मी अधिकच अस्वस्थ झालों. टेबलाजवळून उठून मी खोलीच्या दारांत जाऊन उभा राहिलों. पत्र्यावर ठेवलेल्या कुंडयांकडे माझें लक्ष गेलें. एकाहि गुलाबाच्या झाडावर फूल नव्हतें.

कालच्या त्या पोलिस इन्स्पेक्टरचे उद्‌गार मला आठवले. त्याचा अनुभव कर्कश स्वरानें आक्रोश करून सांगत होता—"स्त्रीपुरुषांचं प्रेम हें एक गुलाबाचं झाड आहे. पण तें एकहि फूल नसलेलं, नुसत्या बारीक काट्यांनीं भरलेलं गुलाबाचं झाड आहे."

पण या उद्‌गारांच्या मागोमाग रामभाऊ भावपूर्ण स्वरानें म्हणत होता, "स्त्रीपुरुषांचं प्रेम हें सोनचांफ्याचं फूल आहे. सोनचांफ्याचा सुगंध आपण दुरूनसुद्धां घेऊं शकतों. पत्नीचं प्रेमहि तसंच–"

माझ्या गोष्टींतल्या नायिकेला प्रेम हें पारिजातकाच्या फुलांसारखें वाटलें होतें. पण आज अकस्मात् भेटलेल्या सिंधु आपटेचें दुःखानें भारावलेलें अंतःकरण म्हणत होतें, "पुरुषाचं प्रेम हें हिरव्या चांफ्याच्या फुलासारखं आहे !"

माझें मन म्हणूं लागलें—जगांतल्या साऱ्या फुलांच्या उपमा सार्थ ठराव्यात इतके स्त्री-पुरुषांच्या प्रेमाला पैलू असतात हें खरें. आपण जी गोष्ट लिहिली तिच्यांत या विचित्र प्रीतीची एकच बाजू रंगविली गेली. त्यामुळेंच—

जिन्यावर कुणाचींशीं पावलें वाजलीं. माझी पत्नी चहा घेऊन येत असावी असें मला वाटलें.

ती वर आली; पण तिच्या हातांत चहाचा पेला नव्हता. नुसतीं दोन पत्रें दिसत होतीं.

आज इतक्या लवकर टपाल कसें आलें याचें मला आश्चर्य वाटलें. मीं चटकन् दोन्ही पत्रें हातांत घेऊन पाहिलीं. वरचें तर माझ्या बायकोच्याच नांवचें होते. पत्त्याच्या अक्षरांवरून तें मुंबईला मास्तरीण असलेल्या तिच्या एका मैत्रिणीचें आहे हें मीं ओळखले. त्या दोघींचा बराच पत्रव्यवहार होता. पण आतांपर्यंत माझ्या पत्नीनें सुमतीचें एकहि पत्र मला दाखविलें नव्हतें, म्हणून मीं हंसत हंसत म्हटलें, "एक जुनी म्हण ठाऊक आहे ना !"

पाऊस पडूं लागला कीं लहान मूल पावळयांखालीं जसें हात पसरून उभें राहतें, त्याप्रमाणें मी बोलूं लागलों कीं, आतां आपली गोड थट्टा होणार या खात्रीनें माझी पत्नी माझ्याकडे उत्सुकतेनें पाहूं लागते.

पण आज मात्र ती उत्सुकता तिच्या मुद्रेवर दिसली नाहीं.

तिला हंसविण्याकरितां मी म्हणालों, "दोन मैत्रिणींचं हितगुज तिसऱ्यानें कधीं ऐकूं नये. त्यांतून मी पडलों पुरुष. बायकात पुरुष लांबोडा..."

हंसण्याऐवजीं थोडी रुष्ट मुद्रा करून ती म्हणाली, "तिनं तुमच्याविषयीं काय काय लिहिलंय् तें वाचून तरी पाहा एकदां !"

अधिक कांहीं न बोलतां ती खालीं निघून गेली.

पत्नीच्या या शेवटच्या उद्गारांनीं मी बुचकळयांत पडलों. तिच्या मैत्रिणीनें पत्रांत माझ्याविषयीं काहीं तरी विचित्र लिहिलें असलें पाहिजे हें उघड होतें. परवां मी मुंबईला गेलों होतों तेव्हां एका अपरिचित तरुणी-बरोबर सिनेमा पाहण्याचा प्रसंग माझ्यावर आला होता. माझ्या बायकोची ही मैत्रीणहि त्याच खेळाला आली असावी ! आम्हा दोघांना थेटरांत एकत्र पाहून तिच्या मनांत कांहीं तरी...

संशय हा स्त्रीचा जन्मजात सोबती आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. तसें पाहिलें तर माझ्या बायकोची ही मैत्रीण चांगली एम्. ए. झालेली, अध्यापिका म्हणून प्रसिद्ध असलेली अशी विदुषी होती. पण....

मीं मनांत म्हटलें—त्या दिवशी माझ्याबरोबर आलेली तरुणी ही माझ्या एका मित्राची मेव्हणी होती हे सहज सिद्ध करतां येईल. तो तिला घेऊन सिनेमाला आला. पण थेटराच्या दारांतूनच त्याला एका आकस्मिक कामा-करिता परतावें लागलें त्याला मी काय करणार ?

माझ्या हातांतलें पत्नीच्या नांवचें तें पत्र फोडण्याचासुद्धां त्रास घेण्याची

मला जरूरी नव्हती. पण आंतला कागद काढून तो वाचण्याऐवजीं त्यांत काय असावें याचा विचार करण्यांतच मी गुंग होऊन गेलों. मनुष्याच्या मनाला कटु अनुभवाचें विलक्षण भय वाटत असतें हेंच खरें. दिव्याच्या प्रखर प्रकाशाचा त्रास होऊं नये म्हणून त्याच्याभोंवतीं कागद गुंडाळतात ना? तसें अनुभवाला कल्पनेचें आच्छादन घातल्याशिवाय त्याच्याकडे त्याला बघतांच येत नाहीं.

पांच मिनिटें मी तसाच स्वस्थ—खरें सांगायचें म्हणजे मनांतल्या मनांत अगदीं अस्वस्थ बसलों. मग मात्र माझ्या मनाची स्थिति विचित्र झाली. त्या बाईनें आपल्याविषयीं कांहीं तरी अतिशय वाईट लिहिलें असलें पाहिजे अशी माझ्या मनाची खात्री झाली. गुदमरून सोडणाऱ्या धुरापेक्षां चटका देणारी आग बरी असें वाटून मीं चटकन् त्या पाकिटांतलें पत्र बाहेर काढलें.

पत्रांतल्या मधल्याच मजकुराखालीं जाड रेघा काढल्या होत्या. त्या पाहून मला हंसूं आलें. मला वाटलें—पत्र लिहितांनासुद्धां आपण प्रश्नपत्रिका काढीत आहों असेंच या मास्तरणीला वाटत असावें!

मी तोच मजकूर वाचूं लागलों—

"भाऊरावांची 'दोन ध्रुव' मीं किती वेळां वाचली आहे तें तुला ठाऊक आहेच. तसली कादंबरी लिहिणाऱ्या सभ्य लेखकानें असली पांचट गोष्ट लिहावी याचें मला फार वाईट वाटतें. 'पारिजातकाचीं फुलें' हें नांव वाचून माझ्या मनांत किती कोमल कल्पना उत्पन्न झाल्या होत्या! पण भाऊरावांनीं त्या गोष्टींत कसलें घाणेरडें वर्णन केलें आहे! काय म्हणे, एक कापड-दुकानदार शरीरसुखाच्या बाबतींत आपल्या बायकोवर अत्याचार करतो! हा काय गोष्टीचा विषय झाला? यांत ध्येय कसलें आलें आहे नि कला तरी कुठें आहे? लोकप्रियता मिळविण्याकरितां चावटपणा करणाऱ्या लेखकांत आमचे भाऊराव सामील होतील हें मला स्वप्नांतसुद्धां खरें वाटलें नसतें. पण—

"आज मधल्या सुटींत शाळेंतल्या मास्तरांनीं नि मास्तरणींनीं मला असें छळलें म्हणतेस! एखाद्या पोपटाच्या पिलाला कावळ्यांनीं टोचा माराव्या तशी माझ्या मनाची स्थिति झाली. म्हातारे ड्रॉईंगमास्तर म्हणाले, 'सारे लेखक इथून तिथून सारखे लांडगे! कुणी शेळीचं कातडं पांघरतात

नि कुणी तें पांघरत नाहींत एवढाच काय तो फरक!' संस्कृत शिकविणाऱ्या बाई म्हणाल्या, 'बायका नि पुरुष यांचे संबंध हा काय तो या लेखकाचा आवडता विषय! एवढी मोठी लढाई चालली आहे, तिच्यावर लिहा म्हणावं तुमच्या गोष्टी!' गतवर्षीच बी. टी. होऊन शाळेत आलेले देशपांडे म्हणाले, 'हें पाहा सुमतीबाई, तुमचे हे खांडेकर लवकरच एक साप्ताहिक काढणार!' देशपांड्यांचें हें वाक्य ऐकून सारी मंडळी 'खो-खो' करून हंसली. तापलल्या उलथन्यानें अंगाला डाग द्यावा तसें तें हंसणें माझ्या मनाला झोंबलें.''

पत्रांत आणखी कांहीं मजकूर होता. पण माझ्या मनात विचारांची अशी वावटळ उठली, कीं पत्र तसेंच टाकून मी खोलींत येरझाऱ्या घालूं लागलों.

स्त्रीपुरुषसंबंधाच्या गोष्टी उन्मादक असतात आणि तरुणतरुणींची मनें असल्या गोष्टींकडे सहजासहजीं ओढलीं जातात, म्हणून अशा प्रकारचें लिखाण करणारे अनेक लेखक असतात हें मला मान्य करावेंच लागलें; पण मीं जी गोष्ट लिहिली तिचा हेतु काहीं वाचकांच्या विकारांना चाळवणें हा नव्हता.

पण हे सांगण्याचा मला काय अधिकार होता? आरोपीच्या पिंजऱ्यांत उभ्या असलल्या मनुष्याला न्यायाधीश होतां येत नाहीं. माझ्या गोष्टीचा हेतु काय आहे याचा निकाल वाचकांनींच दिला पाहिजे. त्या वाचकांपैकीं एक—माझ्या पत्नीची मैत्रीण, चागली एम्. ए. झालेली बाई—

सुमतीच्या त्या पत्राकडे लक्ष जातांच एखादें जिवाणूं दिसावें तसें वाटून माझें अंग शिरशिरलें. क्षणभर मनांत आलें-स्त्रीपुरुषांच्या शरीरसुखाचा हा नाजुक विषय आपण उगीच गोष्टांसाठीं निवडला. या विषयावर लिहिणें म्हणजे कांटेरी तारेवरली कसरत आहे! 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट आपल्याला सुचली ती एका विलक्षण करुण दृश्यानें! एका पांढऱ्या फिकट चेहऱ्याच्या नि निस्तेज डोळ्यांच्या अबलेची ती करुण कहाणी...स्त्रीची गुलामगिरी किती भीषण असते याची आपल्या मनाला झालेली जाणीव...हा जुलूम नाहीसा झालाच पाहिजे या भावनेनें आपण त्या विषयाचा केलेला विचार...

खिडकींतून येणाऱ्या वाऱ्याच्या झोतानें तें पत्र फडफडूं लागलें. जणू कांहीं तारस्वरानें तें माझा उपहासच करीत होतें.

त्या पत्रापलीकडेच दुसरें एक पत्र पडलें होतें. तें अजून आपण वाचलेंच नाहीं हें आतां माझ्या लक्षांत आलें.

मीं झटकन् तें उघडलें नि आंतल्या मजकुरावरून नजर फिरविली. डॉ. कर्व्यांचें संध्याकाळीं जेवायला येण्याबद्दलचे आमंत्रण होतें तें. त्यांनीं लिहिलें होतें, " आज विशेष असें कांहींच नाहीं. पण मेडिकल कॉलेजांतले माझे एक स्नेही डॉ. साने संध्याकाळीं कोंकणांतून परत येणार आहेत, त्यांना तुमच्या गोष्टी फार आवडतात. तेव्हां तुमची दोघांची ओळख व्हावी म्हणून तुम्हांला बोलावलें आहे. डॉ. साने दहाच्या गाडीनें जाणार आहेत."

पुढचा मजकूर वाचण्याऐवजीं माझे डोळे वाचलेल्या भागांतल्या एकाच शब्दावर खिळून राहिले—डॉ. साने.

मघाशीं गोपाळरावांच्या बोलण्यांत हें नांव निघालें होतें. त्यांच्या भावाचें शेवटचें पत्र डॉ. सान्यांपाशीं आहे असें ते म्हणाले होते. साने या विषयावर पुस्तक लिहिताहेत असेंहि ते—

लगेच माझ्या मनांत आलें—हे डॉ. साने मुंबईचेच असतील कशावरून? आणि ते मुंबईचे असले तरी आपल्याला हवेत तेच डॉ. साने—

केव्हां एकदा संध्याकाळ होते असें मला झालें!

× × ×

संध्याकाळीं फिरायला न जातां मी थेट डॉ. कर्व्यांच्या दवाखान्यांत गेलों. त्यांच्यासमोर बसलेली सौम्य मुद्रेची पण तीक्ष्ण नजरेची व्यक्ति म्हणजे डॉ. साने, हा माझा तर्क कांहीं चुकीचा ठरला नाहीं. आम्हीं हंसतमुखानें एकमेकांना नमस्कार केले. लगेच साने हंसत म्हणाले, " तुमची ती परवांची गोष्ट आपल्याला फार आवडली बुवा!"

ते किर्लोस्करांतल्या 'पारिजातकाच्या फुला'विषयीं बोलत आहेत, कीं 'सह्याद्री'त प्रसिद्ध झालेल्या माझ्या दुसऱ्या गोष्टीविषयीं बोलत आहेत, हें मला कळेना. मी कांहीं तरी बोलणार होतों इतक्यांत डॉ. कर्वे म्हणाले, " भाऊराव, एकदोन पेशंटस् पाहून येतों मी; तोंपर्यंत तुम्ही नि साने जरा फेरफटका करून या!"

मला सान्यांच्याशीं एकान्तांत खूप बोलायला हवें होतें. तेव्हां कर्व्यांची ही

सूचना मीं तात्काळ मान्य केली. टेंबलाईवर जायचें ठरवून मी दवाखान्याबाहेर पडलों.

पण गाडींत बसल्याबरोबर माझी मनांतली इच्छा मनांतच राहते कीं काय असें मला वाटूं लागलें.

गाडी सुरू होतांच डॉ. साने मला म्हणाले, " इथं अनाथ मुलांचा एक आश्रम आहे ना ? तिथं जाऊं या जरा."

मी ड्रायव्हरला तसें सांगितलें. मात्र अनाथ मुलाच्या आश्रमात डॉ. साने यांचें काय काम आहे याविषयीं मला काहाच तर्क करता येईना. संध्याकाळीं कर्वे मोकळे असतांना त्याना घेऊन साने आश्रमांत का गेले नाहींत, हाहि प्रश्न माझ्या मनाला थोडासा चाटून गेला. सान्यांना रात्रीच्या दहाच्या गाडीनें मुंबईला जायचें होतें. मग इतका वेळ आश्रमाकडे न जातां—

आश्रमासमोर गाडी खर्रर्र करीत उभी राहिली. आम्ही दोघेहि आत गेलों. दारातच नमुताई तीन वर्षांच्या एका मुलाबराबर 'चांदोबा, चांदोबा, भागलास का ?' हे गाणें म्हणत होत्या. त्यांचे तें पांढरें शुभ्र पातळ आणि प्रसन्न मुद्रा पाहून माझ्या मनांत आलें, आश्रमाशीं परिचय असणारे सर्व लोक नमुताई म्हणज एक देवता आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

डॉ. सान्यांना पाहतांच नमुताईना आश्चर्य वाटलें ! पण ते क्षणभरच. लगेच त्यांनीं आमचें हंसत स्वागत केलें.

नमुताई आम्हांला पाहुण्यांच्या खोलीत घेऊन जात असतांना तीनचार लहान मुलें ' माई, माई,' करीत धांवत आलीं आणि तिला बिलगलीं. तें दृश्य खरोखरच मोहक होतें. देवांच्या मूर्तीच्या पायांशीं हंसणाऱ्या पुष्पांच्या राशीप्रमाणे त्या बालकांच्या मुद्रा दिसत होत्या.

आमच्याकडे पाहत नमुताई म्हणाल्या, " माझी ही सर्कस पाहून तुम्हाला हंसूं येत असेल, नाहीं ?"

आम्ही दोघेहि हंसलों. पण त्या हंसण्यांत उपहास नव्हता; आदर होता.

मुलांशीं खेळत खेळतच नमूताई सान्यांशीं बोलूं लागल्या. सान्यांनीं प्रश्न केला, " फार दिवसांत तुमचं पत्र आलं नाहीं. तेव्हां म्हटलं—"

अंगाशीं झोंबत असणाऱ्या मुलांकडे पाहून नमूताई म्हणाल्या, " पत्र

लिहायला बसलं कीं हीं माकडं येतात नि टांक हातांत घेऊन आपणच पत्र लिहूं लागतात."

आम्ही दोघे नुसते हंसलों. नमूताई पुढें बोलूं लागल्या, "आणि खरं सागूं डॉक्टर, या चिमण्या जगांत मी इतकी रंगून गेलें आहें, कीं मला बाहेरच्या जगाची आठवणच होत नाहीं!" किंचित् थांबून अगदीं सहज त्या बोलून गेल्या, "—तुमचीसुद्धा!"

नमूताईच्या या उद्गारानें माझ्या मनांत एका क्षणार्धांत अनेक विचार येऊन गेले. नमूताईचें नि डॉ. सान्याचें नातेंबितें आहे कीं काय? त्यांचें नातें असतें तर सान्याचे स्नेही म्हणून कवें त्यांची विचारपूस केल्याशिवाय राहिले नसते. पण तसें कधींच घडलें नव्हतें. इतकेंच नव्हे, तर गप्पागोष्टींत नमूताईचा एकदोनदां उल्लेख आला होता तेव्हां ते त्याच्याविषयीं किंचित् तिरस्कारानेंच बोलले होते.

ही काहीं चहा घेण्याची वेळ नव्हती; पण डॉक्टरांना नमूताईचा आग्रह मोडवेना.

चहा घेऊन आम्ही आश्रमांतून बाहेर पडलों तेव्हां साने म्हणाले, "पांचदहा मिनिटं तरी टेंबलाईवर जाऊन येऊं या. म्हणजे यजमानाशीं खोटं बोलण्याचा प्रसंग येणार नाहीं."

टेंबलाईवर जाऊन आलों असें कर्णांना सांगतां यावें एवढ्यासाठींच सान्यांची ही धडपड चालली आहे हें माझ्या लक्षांत आलें. आम्ही नमूताई-कडे गेलो होतों ही गोष्ट त्याना कर्णांच्यापासून लपवून ठेवायची होती हें उघड दिसत होतें.

मलाहि सान्यांच्याशीं मोकळेपणानें बोलायला मिळालें तर हवेंच होतें.

टेंबलाईच्या टेंकडीवर जाऊन पोंचतांच मीं त्याना म्हटलें, "माझी 'पारिजातकाचीं फुलं' ही गोष्ट तुम्हीं वाचली आहे ना?"

डॉक्टरांनीं मान हलविली.

"किती तरी लोकांना ती आवडली नाहीं."

"सारेच लोक कांहीं शहाणे नसतात."

"आज माझ्या बायकोच्या मैत्रिणीचं एक पत्र आलंय्. ती तर अगदी घाबरून गेलीय् ती गोष्ट वाचून!"

हातरुमालानें जागा झाडून तिच्यावर बसत डॉक्टर म्हणाले, "डॉक्टराकडून तपासणी करून घेण्यापेक्षां मेलेलं पुरवलं, असं जुन्या काळीं बायकांना वाटे. आपल्या समाजाचं मनहि अजून त्याच स्थितींत आहे. स्त्रीपुरुषांनीं एकमेकांवर प्रेम करायचं तें चोरून–त्यांतले सुखदुःखाचे अनुभव घ्यायचे तेहि लपून–ते अनुभव सांगायचीसुद्धां चोरी आहे आपल्या समाजांत. मी हल्लीं जें पुस्तक लिहितोंय् त्यात तुमच्या गोष्टीसारख्या किती तरी सत्यकथा आहेत!"

"त्या पुस्तकाचं हस्तलिखित तुमच्याबरोबर आहे का?"

डॉक्टरांनीं नकारार्थी मान हलविली. पण माझी उत्सुकता लक्षांत घेऊन ते म्हणाले, "तुम्ही मुंबईला आलात कीं मी तें तुम्हांला वाचायला देईन. त्यांतल्या एक एक कथा वाचल्यावर केवळ लाजेनं आणि भिडेनं आपण संसारसुखाचा कसा खेळखंडोबा करीत आहों याची तुम्हांला कल्पना येईल. प्रेम हा प्रत्येकाच्या आयुष्यांतला महत्त्वाचा भाग आहे. पण त्यांच्याकडे केवळ स्वप्नाळूपणानं पाहून चालणार नाहीं. खोटी लाज, खोटा ध्येयवाद, खोटं पावित्र्य, यांचीं पांघरुणं घालून प्रेमांतलीं दुःखं जगापासून लपवितां येतात; पण तीं मनाला जाळून टाकतात. मागच्याच आठवड्यांतली एक गोष्ट आहे पाहा. एक एम्. ए. झालेली मास्तरीण माझ्याकडे पेशंट म्हणून आली. काय बरं तिचं नांव..."

डॉक्टर आठवण करूं लागले. मला एकदम सुमतीच्या सकाळच्या पत्राची आठवण झाली.

डॉक्टर स्तब्ध बसलेले पाहून मीं हंसत म्हणालों, "नांव राहूं द्या. त्या मास्तरणीची गोष्ट सांगितलींत तर मला गोष्टीसाठीं एक विषय तरी मिळेल."

"एवढंच ना? मग तुम्हांला या नमूताईचीच हकीगत सांगतों की!"

आतां काय ऐकावें लागणार या कल्पनेनें मी गोंधळलों. डॉक्टरांनीं मला विचारलें,

"नमूताईच्याविषयीं तुमचं काय मत आहे?"

"देवता आहे बिचारी!"

डॉक्टर स्वतःशींच हंसले. मीं क्षणभर थांबून म्हटलें, "माझं एकट्याचंच मत नाहीं. इथले सारे लोक त्यांना देवता मानतात!"

"नि एके काळीं तिला ओळखणारे सारे लोक तिला राक्षसीण म्हणत होते."

मी स्तब्ध झालो!

वाराहि पडला होता. जणूं कांहीं नमूताईची मागची कहाणी ऐकण्याकरितां त्यानेंहि आपला श्वासोच्छ्वास आवरून धरला होता.

डॉक्टर सांगूं लागले, "नमूताईच्या नवऱ्याच्या मित्रानंच ही गोष्ट मला सांगितलीय्. त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल माझी खात्री नसती तर—"

मीं मध्येंच म्हटलें, "तुम्हांला दहाच्या गाडीनं जायचंय्. तेव्हां–"

माझी गोष्ट ऐकण्याची उत्सुकता लक्षांत घेऊन ते हंसले. पण लगेच गंभीर होऊन ते म्हणाले, "नमूताईचा नवरा नि तो माझा स्नेही हे दोघेहि बालमित्र होते. तो स्नेही पुढं डॉक्टर झाला. नमूताईचा नवरा मोठ्या कष्टानं बी. ए. झाला. श्रीमंती नि हुशारी या दोन्हींपैकीं त्याच्यापाशीं कांहींच नव्हतं. त्याला नोकरी लागली तेव्हां त्याची प्रकृति फारशी चांगली नव्हतीच. पण लग्न होऊन एकदोन वर्षं झाल्यावर तर ती विशेषच ढांसळली. त्याचा तो डॉक्टर झालेला स्नेही त्याला मुद्दाम भेटायला गेला. एकंदर लक्षण कांहीं ठीक दिसलं नाहीं त्याला. पण डॉक्टर हा नेहमींच आशावादी असतो. त्यानं औषधं लिहून दिलीं. पथ्यपाणीहि सांगितलं. आणखी एक गोष्ट सांगायचं त्याच्या मनांत होतं, पण ती कशी सांगावी हें त्याला कळेना. तो तसाच निघून गेला!"

डॉक्टर मध्येंच थांबले. बहुधा त्यांच्या मृत मित्राची मूर्ति त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहिली असावी.

क्षणभर थांबून ते पुढें म्हणाले, "सहा महिन्यांनीं तो डॉक्टर पुन्हां आपल्या मित्राला भेटायला गेला. औषधं, शुश्रूषा सर्व कांहीं बरोबर होतं. पण रोगी मात्र खंगत चालला होता! नवऱ्यासाठीं दररोज जागरण करणाऱ्या नमूताईला दोन दिवस विसांवा मिळावा म्हणून डॉक्टर रात्रीं रोग्याजवळ बसायला आनंदानं तयार झाला. पण नमूताईनं त्याला तिथं झोपूं दिलं नाहीं. तिच्या पतिनिष्ठेचं कौतुक करीत तो पलीकडच्या खोलींत झोंपी गेला.

"कसलं तरी भयंकर स्वप्न पडल्यामुळं तो रात्रीं जागा झाला. पलीकडे

नवराबायकोचं कांहीं तरी बोलणं चाललं होतं. तें त्याला स्पष्ट ऐकूं आलं नाहीं; पण नवऱ्याचे ' आतां तरी छळूं नकोस मला ' हे कर्कश उद्गार कानांवर पडताच तो गोंधळून गेला.

" सारी रात्र तो अंथरुणावर तळमळत होता. पण अपरात्रीं ऐकलेल्या त्या उद्गारांचं कोडं कांहीं केल्या त्याला सुटलं नाहीं !"

" दुसरे दिवशीं आपल्या मित्राच्या अंतरंगांत शिरण्याचा त्यानं प्रयत्न केला. पहिल्यांदा त्यानं त्याला दाद लागूं दिली नाहीं. पण त्याच्या तोंडून जेव्हां तें रहस्य बाहेर पडलं—"

" नमूताईचं नवऱ्यावर प्रेम होतं—भक्ति होती; पण ही भक्ति निर्लेप नव्हती. तिच्यांत शरीरसुखाची विलक्षण आसक्ति होती. तो अंथरुणाला खिळला होता, त्याची शुश्रूषा ती मनःपूर्वक करीत होती. पण या एका बाबतींत मात्र ती त्याचं मुळींच ऐकत नसे. त्याला नको असलेलं तें सुख—

" त्या डॉक्टरानं बायकोला नवऱ्यापासून दूर ठेवलं. त्याचा सूड घेण्याकरितां तिनं त्या डॉक्टरावर भलताच आळ घेतला ! तो त्याच्या मित्रमंडळींत पसरला. त्याच्या घरांतहि थोडा गोंधळ निर्माण झाला. पण त्यानं ते सर्व मुकाट्यानं सोसलं. वाघिणीच्या तोंडून तिचं भक्ष्य काढून घ्यावं तसं नमूताईच्या बाबतींत त्यानं केलं होतं. त्यामुळं तिच्या विचित्र द्वेषाची त्याला कींव आली. राग आला नाहीं.

"पुढं कांहीं दिवसांनीं तिचा नवरा त्या डॉक्टराच्या घरीं वारला. नमूताईचं पुढं काय करायचं हा प्रश्न आला. नर्सिंगचं शिक्षण घ्यायचं असल्यास तिची सर्व व्यवस्था करायची डॉक्टरची तयारी होती. पण तिनं तें नाकारलं. तिनं एकच मागणी केली—' जिथं खूपखूप लहान मुलं असतील तिथं मला कांहीं तरी काम द्या !"

" डॉक्टरच्या ओळखीनं तिला एका अनाथ बालकाश्रमांत काम मिळालं. तिथलं काम तिनं इतक्या आपुलकीनं केलं, कीं आश्रमाच्या प्रमुख कार्यकर्त्यांत तिची गणना होऊं लागली. खुद्द डॉक्टरलासुद्धां तिच्या या स्थित्यंतराचं आश्चर्य वाटलं. तो अनेकदां मनांत म्हणाला असेल, ' निसर्गाला कळीचं

फूल करता येतं; पण कांट्याचं फुलांत रूपांतर करण्याची शक्ति माणसांतच आढळते'.''

एका स्त्रीच्या शरीरसुखाच्या आसक्तीचें वात्सल्यांत परिवर्तन झाल्याची ही कथा मला मोठी उद्‌बोधक वाटली. मी पुढें कांहीं तरी बोलणार तोंच डॉ. साने मनगटावरल्या घड्याळाकडे पाहत म्हणाले,

"आठ वाजायला आले की!"

ते लगेच उठलेहि.

त्यांच्याबरोबर गाडींत बसतां बसतां मीं म्हटलें, "डॉक्टर, नमूताईंच्या हकीगतींतलं एक रहस्य सांगायचं राहिलंच आहे अजून!"

"कुठलं?"

"त्या डॉक्टरांचं नाव! तुम्हीं ते सांगितलं नाहीं तरी मला ते ठाऊक आहे म्हणा. सांगूं का तें?"

"हं!"

"डॉ. साने."

## सदूभाऊ

६

प्रवासाचा दिवस उगवला कीं, माझें मन थोडेंसें नाराजच होतें. तसें पाहिलें तर नवीं नवीं स्थळें पाहावींत नि नव्या नव्या माणसांच्या ओळखी व्हाव्यात अशी मला उत्कट इच्छा आहे. पण ती तृप्त करण्याकरतां धाड धाड करीत जाणाऱ्या खटारेवजा मोटारींत किंवा खाड खाड करीत नि धूर ओकीत धांवणाऱ्या आगगाडींत एखाद्या कोंपऱ्यांत आठदहा तास काढणें माझ्या अगदीं जिवावर येतें. मात्र अल्लादिनाचा जादूचा दिवा मिळाला तर या घटकेला मी रशियांत जायलासुद्धां तयार आहें.

या स्वभावामुळें प्रवासाचा दिवस उगवला कीं अंथरुणावरून उठतां उठतां माझ्या तोंडांतून न कळत शब्द निघतात, 'उठा बुवा! आज प्रवासाला जायचंय्!' हें म्हणतांना माझा स्वर इतका नाखुषीचा असतो कीं, माझ्या कोशांत प्रवासाला जाणें या शब्दाचा अर्थ फांशीं जाणें हाच आहे असा ऐकणाराचा ग्रह व्हावा!

थंडीच्या दिवसांत रगावर रग घेऊन निजलेल्या माणसाला ती ऊब सोडवत नाहीं ना? मलाहि घर सोडणें तितकेंच कठीण वाटतें. प्रवास जवळचा असो, नाहीं तर लांबचा असो; निघण्याच्या दिवशीं मीं कुरकुर केली नाहीं असा दिवसच माझ्या आयुष्यांत उजाडला नव्हता.

आज मात्र मी अगदीं मुकाट्यानें उठलों. उषेला त्याचें आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तिनें विचारलें, " मुंबईचं व्याख्यान लांबणीवर पडलं वाटतं ?" मीं उत्तरलों, " छे ! आज जायचय् ना !"

ती कांहींच बोलली नाहीं. पण बायकांच्या तोंडापेक्षां त्यांचे डोळेच अधिक बोलके असतात ! तिची दृष्टि मला म्हणत होती-' आजच्या प्रवासांत कांहीं तरी विशेष दिसतंय् ! एरवीं कुठं बाहेरगांवीं जायचं म्हटलं, कीं एखाद्या आजोबाप्रमाणं कंटाळा येतो तुम्हांल', पण आज मात्र—आज अगदीं लहान मुलाची हौस संचारलेली दिसतेय् तुमच्यांत !'

पतिपत्नींची एकमेकांवरली टीका प्रतिटीका हा टिपऱ्यांच्या खेळाप्रमाणें गमतीचा खेळ असतो. अशा वेळीं वाक्याने वाक्य वाढविण्यांतच दोघांना गंमत वाटते. एखाद्या ब्रह्मचाऱ्याने असला संवाद ऐकला कीं त्याला भास होतो— लहानशा गोष्टीसाठीं नवराबायको उगाच हुजत घालताहेत ! पण असल्या लहान लहान खटक्यांतच संसाराची खरी लज्जत असते हें त्या बिचाऱ्याला कुठून कळणार ?

आपल्या मूक टीकेला कांहीं तरी उत्तर मिळेल अशी उषेची कल्पना असावी. चेंडूची वाट पाहणाऱ्या क्षेत्ररक्षकाप्रमाणें ती मोठ्या उत्सुकतेनें स्तब्ध राहिली. पण मी गप्पच आहें हे पाहून तिला विलक्षण आश्चर्य वाटलें. एखाद्या गुहेच्या तोंडाशीं जाऊन लहान मुलानें मोठ्यानें ओरडावें आणि प्रतिध्वनीच्या अपेक्षेनें गुहेकडे पाहावें; पण उत्तरादाखल कसलाच आवाज ऐकूं येऊं नये म्हणजे त्याची जशी निराशा होईल, तशी तिची स्थिति झाली.

पण शितावरून भाताची परीक्षा करायला बायकांना कुणी शिकवावें लागत नाहीं. आजचा रंग कांहीं निराळा आहे हें ओळखून उषा लगेच म्हणाली, " मीं केव्हांच ओळखलंय् !"

" काय ?"

" मुंबईला केव्हां जाईन असं झालंय् तुम्हांला !"

मी हंसलों. माझें हास्य म्हणत होतें—गुप्त पोलिसांत सरकार बायकांनाच अधिक जागा कां देत नाहीं ?

ती विजयी मुद्रेनें म्हणाली, " आज जाण्याची इतकी घाई कां आहे, सांगूं का ?"

" हूं !"

" एखादा नवा चित्रपट लागला असेल !"

मीं नकारार्थी मान हलविली. क्षणभर थांबून ती म्हणाली, " नाहीं तर कुणा तरी मित्राचं लग्न ठरवायचं असेल !"

आतां मात्र मला गप्प बसवेना. मीं म्हटलें, " तुझा नवरा एखाद्या वधूवरमंडळाचा संचालक आहे अशी तुझी समजूत झालेली दिसतेय् !"

हंसत हंसत ती म्हणाली, " हें मुंबईचं काम आज नका सांगू तुम्हीं ! परत आल्यावर तरी मला कळेलच कीं नाहीं ?"

" कुणाकडनं ?"

" सांगूं ?"

' सांगूं ?' हा एक शब्द उच्चारतांना तिनें इतकी गंभीर मुद्रा केली होती, कीं मुंबईला मी कुठें कुठें जातों...नि काय काय करतों, याची वित्तंबातमी तिला एखाद्या मैत्रिणीकडून कळत असावी असेंच क्षणभर वाटलें.

ती विलक्षण गंभीरपणानें माझ्याकडे पाहत होती. लिलांवांत एखाद्या वस्तूची किंमत वाढविण्याकरतां जशी लिलांव पुकारणाराची धडपड चालते, तशी माझी उत्सुकता वाढविण्याची तिची ही युक्ति होती.

मीं म्हटलें, " मीं मुंबईला कशाकरतां गेलों होतों हें कोण सांगणार तुला ?"

" इकडं या, सांगतें."

मीं किंचित् पुढें गेलों.

समोरच्या आरशांतल्या माझ्या प्रतिबिंबाकडे बोट दाखवून ती हंसूं लागली.

मलाहि हंसूं आवरेना.

लगेच ती म्हणाली, " बायकांच्या पोटांत कुठलीहि गोष्ट राहत नाहीं, अशी म्हण आहे ना ? अगदीं खोटी आहे ती ! हल्लीं पुरुषांच्याच पोटांत कांहीं राहत नाहीं !"

बायकांची कुचेष्टा करणारी एक प्रतिकोटी मला तत्काळ सुचली. पण जिभेवरूनच मीं ती परतविली. हंसत हंसत मीं उपेला म्हणालों, " तुझा हा नवा सिद्धान्त खरा ठरावा म्हणून का होईना, आज मुंबईला जाण्यांत मला

हुरूप कां वाटतोय् तें तुला सांगतों. डॉ. साने भेटणार आहेत मला या खेपेला. 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट प्रसिद्ध झाल्यापासून मला काय काय अनुभव आले तें तूं पाहिलंस ना? आतां सान्यांच्या मदतीनं त्या अनुभवांची कादंबरी करावी म्हणतों!"

× × ×

मी मुंबईला बापुरावांच्या बिऱ्हाडांत पाऊल टाकलें मात्र; काल रात्रीं माझ्या नांवानें एक फोन आला होता असें कळलें मला!

"कुणाचा?" कपडे काढीत असतांना मीं विचारलें.

"डॉ. सान्यांचा!"

बापुरावानीं कागदावर टिपून घेतलेला त्यांचा निरोप मीं मोठ्या उत्सुकतेनें वाचूं लागलों, 'माझ्या पत्नीच्या एका मैत्रिणीने जीव देण्याचा प्रयत्न केल्याची बातमी आतांच कळली. म्हणून आम्हीं दोघेंहि नाशकाला जात आहों. बहुधा उद्यां परत येऊंच. आल्याबरोबर मी तुम्हांला फोन करीन. तुम्हांला राहायला सवड असली तर दोन-तीन दिवस अवश्य राहा. पण एखादे वेळीं सवड नसेल म्हणून माझ्याकडे असलेले सदूभाऊ मराठ्यांचें पत्र पोस्टानें तुमच्याकडे पाठवून देत आहें. माझें त्या पत्राचें काम झालें आहे. तुम्हीं तें वाचून कोल्हापूरला श्री. गोविंदराव मराठे (मोहन टॉकीजचे मॅनेजर) यांना द्यावे.'

डॉक्टर सान्यांना याच वेळीं नाशकाला जावे लागलें याचें मला फार वाईट वाटलें. 'पारिजातकाचीं फुलें' या गोष्टींतून उत्पन्न झालेल्या अनेक शंका-कुशंकासंबंधाने मला त्यांच्याशीं बोलावयाचे होते. पण आपण एखादें पदार्थसंग्रहालय पाहायला मोठ्या उत्सुकतेने जावें नि त्याच दिवशीं तें बंद असावे! अगदीं तशी स्थिति झाली माझी. मात्र सान्यांनीं सदूभाऊंचें पत्र पाठविण्याची दक्षता घेतल्यामुळें, आपली मुंबईची खेप अगदींच फुकट जाणार नाहीं असें त्यांतल्या त्यांत मीं माझें समाधान करून घेतलें.

सान्यांचा निरोप कळल्यापासून पोस्टमनच्या पावलाकडे माझे डोळे एकसारखे लागले होते. इतक्या उत्सुकतेनें आयुष्यांत टपालाची वाट मनुष्य दोनच प्रसंगीं पाहतो—परीक्षेचा निकाल किंवा पत्नीचा माहेरवास!

शेवटीं एकदांची टपालाच्या शिपायानें घंटा वाजविली नि मी डॉक्टरांचा तो जाड लखोटा घेऊन आरामखुर्चीत कलंडलों.

गोविंदरावांचा नि माझा चांगला परिचय असला तरी, त्यांच्या थोरल्या भावाला मीं कधींच पाहिलें नव्हतें. पाहणार तरी कुठून? कोल्हापूरला येऊन मला इनमिन तीन वर्षं झालीं होतीं. पण अक्षरावरून माणसाची पारख करण्यांत काहीं चूक होत नसेल, तर एक गोष्ट कुणालाहि कबूल करावी लागली असती. त्याचा परागंदा झालेला थोरला भाऊ सदूभाऊ हा साधा, सरळ, एकमार्गी माणूस होता.

मात्र त्याच्या पत्रांतलें पहिलें वाक्य वाचून मी चकितच झालों. गोविंद-रावांच्या तोंडून बायकोच्या छळाला कंटाळून तो बेपत्ता झाल्याची कहाणी जेव्हां कळली, तेव्हां मीं त्याच्याविषयीं थोडी अधिक चौकशी केली होती. पण या चौकशीनं त्याला लहानपणीं तालमीचा खूप नाद होता या माहितीपलीकडे फारसें काहीं निष्पन्न झालें नव्हतें.

त्याच्या पत्रांतहि पहिलवानी पेशाचेंच प्रतिबिंब पडलेलें असणार अशा कल्पनेनें मीं ते वाचायला सुरवात केली होती; पण—

त्याचें पहिले वाक्य पहिलवानाचे नव्हतें; तें कवीचें होतें.

'माझं एक मन अजून घरांतच घुटमळतंय्! पण माझं दुसरं मन—केव्हां एकदां या घराबाहेर जाईन असं त्याला झालंय्! गोविंदा, डुकराला कसं मारतात हें तूं पाहिलं आहेस का? मागं मी गोमंतकांत गेलों होतों. कॅसल् रॉक स्टेशनवर गाडी आली त्या वेळीं अंगावर शहारे उभे करणाऱ्या किंकाळ्या ऐकूं येऊं लागल्या. गाडी थांबल्यावर मीं मुद्दाम खालीं उतरून आजूबाजूला पाहिलं. स्टेशनापलीकडेच एका डुकराला मारण्याचं पवित्र काम चाललं होतं! पुष्कळ लोक त्या दुर्दैवी प्राण्याला काठ्यांनीं बडवीत होते. 'याचा एकदम कां जीव घेत नाहींत हे लोक?' मीं एका तिकडल्या उतारूला विचारलं. त्यानं उत्तर दिलं, 'असं मारल्याशिवाय डुकराच्या मांसाला गोडी येत नाहीं!' मला वाटतं—नशीबहि माणसाला असेंच छळीत असतं! तें एक घाव दोन

तुकडे करून त्याला एकदम मारून टाकीत नाहीं. डुकराचं मांस गोड लागावं म्हणून हालहाल करून त्याला मारणाऱ्या लोकांप्रमाणं तेंहि—

जाऊं दे! नशिबाला शिव्या देऊन कांहीं त्याचा पराभव करतां येत नाहीं! त्याच्याशीं झुंजण्याची ताक़द माझ्या अंगांत असती तर—

लहानपणीं तासतासभर जमीन धरून मी मोठमोठ्या गड्यांना घायकुतीला आणीत असें. सामना बरोबरीनं सुटला तरी तो माझा विजय आहे असंच मला वाटे. चिकट गडी म्हणून प्रसिद्ध होतों मी! पण दुर्दैवाशीं त्या चिकाटीनं लढण्यांत आतां मला अर्थ वाटत नाहीं. कुस्ती सुरू असतांना एका गड्यानं भिऊन आखाड्यांतून पळून जावं, तसा मी संसारांतून घाबरून निघून जात आहें. पुढं मी काय करणार आहें तें माझं मलाच ठाऊक नाहीं! भविष्यकाळ भाग्यवंताकरितां असतो असं म्हणतात. माझ्यासारख्या दुर्दैवी माणसांना त्याच्या डोळ्याला डोळा देण्याचा धीरच होत नाहीं! ही रडकथा कुणालाहि सांगू नये असं आजपर्यंत वाटत होतं. पण—

संसाराचा सारा भार तुझ्यावर टाकून मी भ्याडासारखा पळून गेलों असं तुला वाटेल म्हणून—

गोविंदा, तुझा भाऊ भित्रा नव्हता! त्याला त्याच्या दुर्दैवानं भित्रा बनविलं. त्या दुर्दैवाचं नांव—

बायको!

संसार हा कल्पवृक्ष आहे असं मीं काव्याच्या पुस्तकांत लहानपणीं वाचलं होतं. मला अनुभव मात्र अगदीं निराळा आला. तो विषवृक्ष आहे!

माझं लग्न एका श्रीमंत मुलीबरोबर कसं झालं याची तुला कल्पना आहे का? तिला मंगळ होता. तिच्या इनामदार बापाला खूप खटपट करूनहि मंगळ्या नवरा मिळेना. माझ्या दुर्दैवानं माझ्या पत्रिकेंतहि मंगळ उमटला! इनामदारांची मुलगी सून म्हणून घरांत येण्याची आशा उत्पन्न होतांच आईला अंबाबाई पावली. बाबांना स्वर्ग दोन बोटं उरला!

पण मला कुठलाहि देव पावला नाहीं. माझ्या वांट्याला एक राक्षसीण मात्र आली! स्वर्ग कुठं आहे याचा मला लग्नानंतर पत्ताच लागला नाहीं. मी नरकापासून फार दूर नाहीं हें मात्र मला लवकरच कळून चुकलं.

लग्न झालं त्या वेळीं माझी एक अटीतटीची कुस्ती ठरली होती. ती कुस्ती मीं जिंकणार अशी खात्री होती मला. पण माझे सोबती—कुणी थट्टेनं, कुणी मत्सरानं—एकसारखे मला हिणवूं लागले. लग्न झालं कीं मी लगेच बायकोच्या नादाला लागणार नि ही कुस्ती हरणार अशी त्यांची बालंबाल खात्री झाली होती. ते सारे म्हणत होते त्या गोष्टीवर माझाहि विश्वास होता. आमच्या आखाड्यांत कॅलेंडरवरलं बाईचं चित्रसुद्धां ठेवलं जात नव्हतं. स्त्रीच्या दर्शनानं पहिलवानाच्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येऊं लागतात नि मग—

या साऱ्या कल्पना कदाचित् खोट्याहि असतील. पण त्या वेळीं माझी त्यांच्यावर इतकी श्रद्धा होती, कीं लग्न झाल्यावर लगेच बायकोविषयींचे विचार मनांत आणायचे नाहींत असा मीं निश्चय केला.

इतरांचा काय अनुभव असेल तो असो, हा निश्चय पाळणं मला मुळींच कठीण गेलं नाहीं. तुला हंसूं येईल. खरंहि वाटणार नाहीं. पण मी अगदीं शपथपूर्वक सांगतों—लग्नानंतर जें मला पहिलं स्वप्न पडलं त्यांत स्त्री नव्हती, चुंबन नव्हतं, काहीं नव्हतं. एक कुस्तीचं मैदान होतं नि मी टाळ्यांच्या कडकडाटांत त्या मैदानांत उतरत होतों.

माझा निश्चय पार पडणार अशी माझी खात्री होती. पण—

मध्येंच माझ्या बायकोला माहेरीं पाठवून देण्याबद्दल तिच्या वडिलांचं पत्र आलं. सोबतीला दुसरं कोण जाणार? तूं फार लहान होतास त्या वेळीं.

मीच तिला घेऊन गेलों. सासऱ्यानं चार दिवस राहण्याचा मला आग्रह केला. तो मोडवला नाहीं म्हणून मी राहिलों. मला सासूबाई नव्हत्याच. घरांतल्या साऱ्या किल्ल्या स्वयंपाकीणबाईच्याच स्वाधीन होत्या.

तिथं गेल्यानंतर पहिल्याच रात्रीं—

पायाला गारगार काय लागलं तें पाहावं म्हणून मीं डोळे उघडले. सापाच्या भीतीनं मी जागा झालों होतों. पण माझ्या पायावर साप वळवळत नव्हता. ते हात—माझी बायको होती ती!

तिच्या स्पर्शानं मला आनंद झाला हें मी नाकबूल करीत नाहीं. तिच्याशीं खूप खूप बोलावं असंहि माझ्या मनांत आलं. पण—

शरीरसुखाच्या पलीकडे नवऱ्यापासून तिला कसलीच अपेक्षा नव्हती. मी

तिची समजूत घालूं लागतांच तिनं मला धमकावणी दिली, 'माझ्या मनासारखं झालं नाहीं तर मी ओरडून बाबांना हाका मारीन!'

परक्याच्या घरांत तमाशा नको म्हणून मी गप्प बसलो. पण तिच्या या विचित्र धाडसामुळं माझ्या मनांत एक प्रकारची अढी उत्पन्न झाली. स्त्रीसुलभ लज्जा तिच्यांत नसावी याचं मला आश्चर्यहि वाटलं.

उगीच पाल्हाळ लावीत नाहीं. पहिल्याच भेटींत तिनं माझ्या मनाला हा विचित्र धक्का दिला होता! पुढं लवकरच वडिलांच्या सुतकांतहि एके दिवशीं या प्रसंगाची पुनरावृत्ति झाली.

मी दुःखानं चूर झालों होतों. नि ती—

'ती पूर्वजन्मीं एखादी राक्षसीण असावी असंच मला वाटूं लागलं!'

मी मधेंच थांबून समोर पाहूं लागलों. मला सान्यानीं सांगितलेली नमूताईची हकीगत आठवली. पुरुष आणि अत्याचार यांची जगानं घातलेली सांगड हा एक संकेत आहे अशी कल्पना माझ्या मनांत येऊन गेली. बायकाहि अत्याचारी असूं शकतात हें सदूभाऊच्या पत्रावरून—

राक्षसी महत्त्वाकांक्षेंतली मदालसा—वाङ्मयांतलीं उदाहरणं कशाला हवींत? राजघराण्यापासून चित्रपटसृष्टीपर्यंत या वृत्तीच्या बायकांनीं घातलेल्या सावळ्या गोंधळाच्या अनेक सत्यकथा माझ्या डोळ्यापुढे उभ्या राहिल्या.

सदूभाऊच्या त्या पत्राकडे पाहून माझ्या मनात आलें—देशभक्तीच्या नांवाखालीं लाखों लोकांचीं प्राण घेणारीं युद्ध जशीं जगांत सुरू आहेत, त्याप्रमाणं पावित्र्याच्या पडद्याआड एकमेकाना विटून गेलेल्या जोडप्यांना एका पिंजऱ्यांत ठेवणाऱ्या लग्नांची परंपराहि अखंड चालली आहे. संसाराला जुने लोक समुद्राची उपमा देत असत! ती अतिशय समर्पक आहे. पण समुद्रांत पोहण्याकरतां मनुष्याला लाइफ बेल्टची जरूरी असते. त्याच्याऐवजीं एखादा दगड गळ्यांत बांधून त्याला पोहण्याचा हुकूम सोडला तर—

वाऱ्याच्या झुळुकीनें माझ्या हातांतल्या पत्राचीं पानें फडफडलीं. जणूं कांहीं सदूभाऊच मला म्हणत होता, 'एवढ्यानं काय झालंय्? पुढं ऐका!''

मी पुढें वाचूं लागलों.

'मी विरक्त झालों होतों किंवा शरीरसुखाची इच्छा मला होत नव्हती असं नाहीं. पण आजारी मनुष्याला कुणी पंचपक्वान्नांचं जेवण आग्रह करून वाढूं लागला, तर त्याला सुख होईल का? माणसाचं मनहि अनेकदा आजारी असतं हें तिला कधींच कळलं नाहीं!

हळूहळू माझं मन बायकोची आईशीं तुलना करूं लागलं. आईच्या कृश मूर्तीविषयीं लहानपणापासून मला आदर वाटत आला आहे. शिबी राजानं एका कबुतराचं रक्षण करण्याकरतां आपलं स्वतःचं मांस कापून दिलं होतं ना? आपली आईहि कुटुंबाकरता जन्मभर तेच करीत आली आहे असं मला लहानपणापासून वाटे. तिच्या कृशतेचं कारण हेंच असलं पाहिजे असं नेहमीं माझ्या मनांत येई.

आईच्या मानानं तुझी वहिनी किती गुबगुबीत आहे हें तूं पाहत आलाच आहेस. तिची आईशीं तुलना करूं लागलों कीं एक विचित्र कल्पना राहून राहून माझ्या मनात येई–इतरांच्या रक्तमांसावर जगणारीं माणसंच अशीं लठ्ठ होतात! दुसऱ्याकरता झिजणारीं माणसं असं अंग कुठून धरतील? माझं मन म्हणूं लागलं—आपली आई ही हळूहळू जळत जाणारी उदबत्ती आहे. आणि आपली बायको ही तेलाच्या जिवावर उड्या मारणारी नि हंसत राहणारी दिव्याची ज्योत आहे.

उन्हाळयांत विंचू कुठून येतात कुणाला ठाऊक; पण ते दररोज घरांत सांपडूं लागतात माणसाच्या मनाची तगमग होऊं लागली कीं विचित्र विचारहि असेच त्याच्या मनात वारंवार डोकावूं लागतात. त्या विचारांच्या नादानं अगदीं वेडा होऊन जातो तो. वडील वारल्यानंतरच्या वर्ष सहा महिन्यात शरीरसुखापलीकडे न पाहणाऱ्या बायकोमुळं माझ्या मनांत इतक्या विचित्र नि विलक्षण विचारांची गर्दी उसळूं लागली—एखादं मोहोळ कुणीतरी डिवचावं नि मग मधमाश्याचा थवाच्या थवा घोंगावत झाडाखालीं स्वस्थपणें झोपलेल्या मनुष्यावर तुटून पडावा; अगदीं तशी स्थिति झाली होती माझी.

राहून राहून माझं मन बायकोची आईशीं तुलना करी. अंगकाठी, डोळे, स्वभाव, वागणूक, कशांतच तिचं आईशीं साम्य नव्हतं. बाबांनीं कितीहि डोळे वटारले, तरी आई डोळा वर करून त्यांच्याकडे पाहत नसे. त्यांच्या तोंडांतून

कठोर शब्द बाहेर पडले तरी ती कधीं पुटपुटूनसुद्धां उत्तर देत नसे. अशा आईच्या सावलींत मी वाढलों होतों, त्यामुळं—

सारं लिहूं लागलों तर एक कादंबरी होईल. पण ही कादंबरी इतर कादंबऱ्यांप्रमाणं मनोरंजक होणार नाहीं. लेखक ज्या कादंबऱ्या लिहितात, त्यांत एक पुरुष आणि एक स्त्री एकमेकांवर प्रेम करतात; पण जग त्यांच्या प्रेमाच्या मार्गांत कांटे पसरतं असं दाखविलेलं असतं. हे सारे लेखक अडाणी तरी असले पाहिजेत किंवा ढोंगी तरी असले पाहिजेत. बिचाऱ्यांना एक साधी गोष्ट कळत नाहीं—लग्नापूर्वी प्रेमाच्या मार्गावर फुलं पसरलेलीं दिसतात. पण लग्न झाल्यावर तीं फुलं सुकून जातात, त्यांच्या पाकळ्या वाऱ्यावर उडूं लागतात, नि मग त्यांच्या खालीं लपलेले कांटे—बाभळीचे, निवडुंगाचे, कणकीचे, नाना तऱ्हांचे कांटे पावलोंपावलीं पायांना टोचूं लागतात. प्रेमकथा लिहिणारे लेखक जिथं आपल्या गोष्टी संपवितात तिथंच आयुष्यांतल्या खऱ्याखुऱ्या कथा सुरू होतात. त्या लिहायचं या लोकांना भय वाटत असावं! बाजारांत चॉकोलेट खपतं, कोयनेल खपत नाहीं; हें कळण्याइतके ते हुशार असतातच!

लिहितां लिहितां फार बाहवलों मी! पण—मरण जवळ आलं कीं काय बोलूं न् काय बोलूं नको असें माणसाला होतं ना? माझंहि तसंच झालं आहे. घरदार, भाऊबहीण, या सर्वांना सोडून जाणं हें मरणाइतकंच कठीण वाटतंय् मला. ही एक प्रकारची आत्महत्या आहे हें मला समजतंय्; पण—

गोविंदा, क्षमा कर मला. आत्महत्या कुणी सुखासुखी करीत नाहीं. छळाला कंटाळून किंवा दुःखानं वैतागूनच माणसं मरणाला मिठी मारायला धांवतात. मीहि असाच एका असह्य विचित्र दुःखानं—

उगीच लांबण लावीत नाहीं आतां! पहिल्या भेटींतच बायकोविषयीं माझ्या मनांत जो तिटकारा उत्पन्न झाला तो एकसारखा वाढत गेला. तिला खरीखुरी मीं पाहिली ती तिच्या माहेरीं—त्या रात्रीं! बोहल्यावर अंतरपाट दूर झाला तेव्हां तिच्याकडे मीं निरखून पाहिलं होतं. पण त्या पाहण्यांत नुसता नवीनपणाचा आनंद होता. लहान मुलाला एखादं खेळणं मिळालं म्हणजे तें कौतुकानं त्याच्याकडे पाहूं लागतं ना? तसंच होतं माझं तें पाहणं.

आमच्या घरांतल्या जुन्या वळणामुळं लग्न झाल्यावर पहिल्या आठपंधरा

दिवसांत तिचं माझं बोलणंच झालं नाहीं मुळीं. स्नेह्यासोबत्यांच्या चिडविण्या-मुळं मींहि तिच्याकडे फारसं लक्ष दिलं नाहीं.

तिच्या माहेरीं—त्या रात्रीं एका घटकेंत माझीं सारीं सुखस्वप्नं भंग पावलीं. बेदरकारपणानं खेळणाऱ्या लहान मुलानं टेबलावरल्या सुंदर फ्लॉवर-पॉटचे तुकडे तुकडे करावेत तशी तिच्या निर्लज्ज वागणुकीनं माझ्या मनाची स्थिति झाली. तिची आठवण झाली, कीं त्या रात्रीचं तें विचित्र दृश्य माझ्या डोळ्यांपुढं उभं राहतं.

नि आईची आठवण झाली कीं—

त्या आठवणींतहि अशीच रात्र आहे; पण—किती सात्त्विक आठवण आहे ती! मी तापानं अंथरुणावर निपचित पडलों आहें. समोर रामाची तसबीर आहे. आई त्या तसबिरीच्या पायां पडून तिला म्हणत आहे 'मला ने, पण—पण माझ्या सदूला जीवदान दे.' तिच्या डोळ्यांतून घळघळ धारा वाहत आहेत. त्याच धारा माझ्या अंगावर पडतात नि माझा ताप उतरतो. तो आईचा शब्द मोडण्याचो देवाचीसुद्धां छाती होत नाहीं.

एक वेळ वाटतं—इतक्या सालस आईची माया मला मिळाली नसती तर निर्लज्ज आणि उर्मट बायकोशींसुद्धां जुळवून घेण्याची इच्छा मला झाली असती. पण सावलींतून उन्हांत येणाऱ्या मनुष्यालाच उन्हाचा त्रास अधिक होतो. माझंहि तसंच झालं.

लिहीन तितकं थोडंच आहे. प्रत्येक मनुष्याला स्वतःच्या आयुष्यावरनं एक कादंबरी लिहितां येईल असं म्हणतात तें अगदीं पुरेपूर पटतं मला. पण मनाला डसणाऱ्या विंचवांच्या वेदना विसरण्याकरतां मी अलीअलीकडे खूप कादंबऱ्या वाचल्या असल्या, तरी तसलं कांहीं लिहायचं मला जमणार नाहीं. नि ज्याला जग सोडून दूर दूर कुठं तरी जायचं आहे त्यानं या खटाटोपांत पडावं तरी कशाला?

या कादंबरींतल्या पुढल्या प्रसंगांचं अगदीं त्रोटक वर्णन केलं तरी माझ्या दुःखाची तुला कल्पना येईल.

बाबा देवघरीं गेले. आईला त्या दुःखाचा विसर पडावा म्हणून मी रोज रात्रीं तिला ज्ञानेश्वरी, दासबोध, नाहीं तर तुकोबाचा गाथा वाचून दाखवूं लागलों. तिनं पुरें म्हटल्याशिवाय मीं वाचन थांबवीत नसें. वयामुळं व

दुःखामुळं ती बारा-बारा वाजेपर्यंत जागत राही. मीहि तिला बरं वाटावं म्हणून वाचीत राही. मला वेदान्त आवडत होता अथवा परमार्थाची तहान लागली होती असं थोडंच आहे? पण एक गोष्ट मी कधींहि विसरलों नाहीं—वृद्धपण हें दुसरं बाळपण असतं. या बाळपणांत माझ्या माणसांना लहान माणसानीं जपायचं असतं. माझ्या बाळपणीं आईनं माझे हट्ट पुरवले, माझी शुश्रूषा केली, माझ्यावरून आपला जीव ओंवाळून टाकला. त्या ऋणाची फेड वार्धक्यांत तिची सेवा केल्यानंच होणार आहे.

पण माझ्या या भावनेची बायको काडीमात्र कदर करीत नसे. रात्रीं बारा-साडेबारा वाजता मी खोलींत पाऊल टाकलं कीं ती खुनशीपणानं हंसे आणि म्हणे, 'यावं पुराणिकबोवा!' अशा वेळचे तिचे ते टोमणे—तिची घालून पाडून बोलण्याची ती पद्धत—आईच्या दुःखाविषयींची ती बेपर्वाई नि शरीरसुखाचा तो हव्यास—माझं मन अगदीं विटून गेलं त्या अनुभवानीं!! फळ अधिक पिकलं कीं तें कुजतं-त्याची घाण सुटते. तिची शरीरसुखाची आसक्ति तशी वाटूं लागली मला. जणू कांहीं तिच्या श्रीमंत बापानं तेवढ्यासाठींच मला विकत घेतलं होत!

हें दुःख सांगायचं तरी कुणाला? आई फार मोठी, तूं फार लहान, नवरा हरिद्वारला गेल्यामुळं ताई गांजलेली. मी मनात म्हणे-मनुष्याला क्षय किंवा कॅन्सर झाला तर त्याचीं लक्षणं तरी बाहेर दिसतात. लोक त्या रोग्याची कींव करूं लागतात. पण या रोगांहूनहि भयंकर अशीं मानसिक दुःखं मात्र माणसांना जगात मुकाट्यानं सोसावीं लागतात. कुणी एका शब्दानंहि त्यांच्या दुःखांचा विचारपूस करीत नाहीं.

मी हा मुका मार सोशीत असतांनाच भाऊबंदांनीं आपल्यावर दावे लावले. सुखानं मिळणाऱ्या आपल्या भाठभाकरींत माती मिसळण्याचा उद्योग त्यांनीं सुरू केला. घरीं वकिलांचे खिसे भरल्याशिवाय कोर्टात त्यांचीं तोंड उघडत नाहींत. शेवटीं हे खिसे भरण्याकरितां मी मुंबईची नोकरी पत्करली.

बायकोला मुंबईला नेण्याची माझी इच्छा नव्हती. पण पुढं पुढं आईनं फार आग्रह केला म्हणून मी नाइलाजानं बिऱ्हाड मांडलं. त्या बिऱ्हाडाचा मुहूर्त माझ्या टायफॉइडनं झाला. अठ्ठावीस दिवसांनीं मी तापांतून उठलों. अधिक रजा मिळण्यासारखी नव्हती म्हणून लगेच मी नोकरीवर रुजू झालों.

नोकरीवरून संध्याकाळी मी परत येई तेव्हां इतका गळून जाई कीं—

उंसाच्या चरकांतून बाहेर पडलेलं चिपाड असतं ना? माझ्या शरीरानं त्याचासुद्धां हेवा केला असता त्या वेळीं!

लवकरच माझी बायको मुंबईला कंटाळली. तिनं माहेरीं जाण्याची भाषा सुरू केली. तिच्या उदास वागणुकीमुळं माझ्याहि मनाचा संताप होई; म्हणून तिच्या जाण्याला मीं आनंदानं संमति दिली.

जायच्या दिवशीं फार गडबड झाल्यामुळं तिची ट्रंक मी भरूं लागलों. त्या ट्रंकेतलं सामान नीट लावता लावतां माझ्या हाताला एक वही मिळाली. उखाणे नि ओंव्या टिपून घेण्याचा नाद पुष्कळ बायकांना असतो. या वहींतहि तसलाच काहीं तरी मजकूर असेल म्हणून मी तशीच परत ठेवणार होतो. पण—

संशय हा मनुष्याचा मागच्या जन्मींचा वैरी आहे. हिला कुठल्या ओंव्या आवडतात तें तरी पाहावं म्हणून मीं ती वही उघडली.

फुलाच्या परडींतून तक्षक निघावा तशी माझी स्थिति झाली.

मीं जें पान उघडलं होतं त्याच्यावर एक लावणी उतरलेली होती. नुसती शृंगारिक नव्हती ती! जवळ जवळ बीभत्स! तिच्या पहिल्याच दोन ओळी इतक्या किळसवाण्या होत्या कीं—

तें अक्षर माझ्या बायकोचं आहे असं वाटेना. म्हणून मीं वहीचं पहिलं पान उघडलं. त्यावर एका पुरुषाचं नांव होतं.

वही चाळतां चाळतां तिच्यांत एक पत्र आढळलं. पत्र मोठ्या सलगीचं होतं. त्याच्या खालीं सही नव्हती. फक्त 'तुझा बालमित्र' एवढंच लिहिलं होतं.

त्या वहीविषयीं तिला काहीं तरी विचारावं असं माझ्या मनात आलं, पण मीं जिभेला लगाम घातला.

पुढं ती माहेरींच अधिक राहूं लागली. आईच्या आग्रहामुळं मी तिला महिना दोन महिने मुंबईला घेऊन येई. पण तिच्या सहवासांत मला काडी-भरहि सुख होत नसे.

आई गेल्यावर ती वर्षभर माहेरींच होती.

एके दिवशीं एकदम माझ्या सासऱ्याची तार आली. ती फार आजारी आहे, असं तारेंत लिहिलं होतं.

कर्तव्य आणि दया हीं सख्खीं भावंडं आहेत. मीं धांवत तिच्या समाचाराला गेलों, पण—

मीं गेलों तेव्हां ती चांगली हंसत-खेळत होती. आजारांतून उठलेल्या माणसासारखा तिचा चेहराहि दिसत नव्हता. तिनं हें आजाराचं नाटक कां केलं तें मला कळेना.

त्या दिवशीं गड्याला मीं माझं अंथरुण बाहेर घालायला सांगितलं. त्यानं तें तसं घातलं. त्या बिचाऱ्याचा काहींच अपराध नव्हता यांत. पण तेवढ्या-साठीं ती त्याला ताडताड बोलली. अट्टाहासानं तिनं त्याला तें अंथरुण आपल्या खोलींत न्यायला लावलं.

या साऱ्या प्रकाराची मला किळस आली. लाजेनं मेल्याहून मेल्यासारखा झालों मी! बायको फार आजारी आहे म्हणून तिच्या समाचाराकरितां आलों होतों मी! चार दिवस मौज करण्याकरितां नव्हे.

घरांतली मंडळी मला काय म्हणतील—

पण माझ्या मनाला लागलेली ही टोंचणी तिच्या गांवींहि नव्हती. नाइलाजानं मीं तिच्या खोलींत झोंपलों. मात्र पूर्वीप्रमाणं तिच्या धमका-वणीला मीं भीक घातली नाहीं नि तिच्या लाचारीला मी बळींहि पडलों नाहीं. आजारी बायकोच्या बाबतींतलं कर्तव्य पार पाडल्याच्या आनंदांत तीन-चार दिवसांनीं मी परत आलों. या चार दिवसांत माझ्या मनाला रुखरुख लागणारी एक गोष्ट मात्र घडली. गांवांतला एक छाकटा मनुष्य माझ्या बायकोच्या समाचाराला दोन-तीनदां आला. एकदां तर तो अगदीं तिच्या बिछान्यावरच जाऊन बसला. कुठल्या तरी नाटकमंडळींत तो पूर्वी होता म्हणे. मधून मधून तो स्वतःशींच एखादं गाणं गुणगुणे. बहुधा लावणी असे ती.

त्याच्या या सलगीविषयीं मीं नापसंती दर्शविली. पण माझ्या बायकोनं तें सारं हंसण्यावारी नेलं.

मीं परत मुंबईला आल्यावर महिना दीड महिन्यांतच माझ्या सासऱ्यांचं पत्र आलं—तिला डोहाळे लागले होते.

माझ्या अंगाची आग आग झाली. मला मध्यें तार करून तिनं कां बोलावून नेलं याची पूर्ण कल्पना आली मला. तें निर्लज्जपणाचं नाटक—

अशा बायकोबरोबर यापुढं संसार करणं मला अशक्य आहे! त्या छाकटयापासून तिला झालेलं पोर आपलं मूल मानून मांडीवर खेळवणं-

आणि तेवढा मनाचा मोठेपणा मीं दाखवला तरी त्याचं फळ काय मिळणार आहे मला? माझ्या मूर्खपणाला ती हंसतच राहील! एक पाप पचलं, शंभर पापांची माणसाला भीति वाटेनाशी होते. तें सारं सोसायचं सामर्थ्य माझ्या अंगांत नाहीं. मनुष्य काढा हंसत पिईल, पण विष?

तिचं पाप तिच्या पदरांत घालणं आधींच कठीण! त्यांत दोन्ही कुळाच्या अब्रूचा प्रश्न! उद्यां तुला नि ताईला जगांत तोंड दाखवायची चोरी होईल. तुम्हां सर्वांच्या सुखाला अशी आग लावण्यापेक्षां—

मीच कुठं तरी जातों. माझा शोध करूं नकोस. ज्या दिवशीं माझं लग्न झालं, त्याच दिवशीं आयुष्यांतला सुखाचा डाव मी हरलों. तेव्हां—

देवानं तुला नि ताईला सुखी ठेवावं एवढीच माझी शेवटची इच्छा आहे.

तुझा दुर्दैवी भाऊ,

**सदाशिव.**

× × ×

पत्र संपतांच मला क्षणभर बरें वाटलें. एखाद्या तळघरांतल्या काळोखांत चालतांना माणसाला जसा अस्वस्थपणा वाटतो तसें हें पत्र वाचतांना मला झालें होतें.

त्या पत्रांतले सदूभाऊचे ते शेवटचे शब्द—'देवानं ताईला सुखी ठेवावं एवढीच माझी इच्छा आहे!'

ते आठवतांच दैवाच्या निर्दय खेळाची जाणीव होऊन माझ्या अंगावर शहारे उभे राहिले. सदूभाऊच्या ताईला पहिल्या नवऱ्यापासून तर सुख मिळालंच नव्हतं; पण सुखाच्या आशेनं केलेला पुनर्विवाहसुद्धां तिला तापदायकच झाला होता. नट असलेल्या त्या दुसऱ्या नवऱ्याचा तिच्यावरला तो जुलूम—

माझ्या मनांत आलें—माणसं हीं निष्ठुर निसर्गाच्या हातांतलीं खेळणीं आहेत हेंच खरं. हजारों वर्षे वाढत आलेलं सुंदर शहर धरणीकंपाच्या

धक्क्यानं धुळीला मिळवण्यांत निसर्गाला कधीं वाईट वाटलं आहे काय? माणसांच्या मनोविकारांचाहि तो असाच दुरुपयोग करतो. शांत धरणी एकदम हालूं लागावी, त्याप्रमाणं माणसंहि एखाद्या विकारानं प्रक्षुब्ध होतात नि या क्षोभाला संसार, सोबती, सुखं, किंबहुना जीवनांतलं सारं सौंदर्य हां हां म्हणतां बळी पडतं.

टेलिफोनची घंटा खणखणूं लागली नसती तर विचारांच्या या धारेबरोबर मी कुठें वाहत गेलों असतो कुणाला ठाऊक!

फोनवर मी बोलूं लागलो–"हॅलो!"

"हॅलो. खांडेकर आहेत का?"

"मी खांडेकरच बोलतोंय्. आपण कोण?"

"मी डॉ. साने. आताच नाशकाहून आलों. अर्ध्या एक तासांत मीं येतोंच तुमच्याकडे. कुठं बाहेर जाऊं नका हं."

× × ×

डॉ. साने इतक्या अगत्यानें माझ्याकडे कां येताहेत तें मला कळेना. मला वाटलें—कदाचित् नाशकाची सारी हकीगत त्याना सांगायची असेल. कदाचित्—

तर्क करणं हें लपंडाव खेळण्यासारखंच आहे. लपंडावात आपल्या जवळच लपून बसलेला गडी आपणांला कुठें दिसतो? तर्क करतांनाहि माणसाची अशीच स्थिति होते. स्वाभाविक गोष्टच त्याला अचूक सुचत नाहीं.

डॉ. साने एवढ्या गडबडीनें आले ते रात्रीं मला जेवायला बोलवायला. मीं हें आमंत्रण स्वीकारलेंच पाहिजे असा त्यांच्या पत्नीचा आग्रह होता. ती लहानपणापासून मला ओळखीत आहे असं त्यांनीं सांगितलं, तेव्हां तर मीं गोंधळूनच गेलो.

पण माझ्या मनाचा गोंधळ डॉक्टरांच्या लक्षांत आला नसावा. माझ्या-समोर पडलेल्या सदूभाऊच्या पत्राकडे पाहून ते हंसत म्हणाले, "कसं काय वाटलं हें पत्र तुम्हांला?"

एखाद्या गमतीच्या कादंबरीविषयीं विचारावें तसा हा डॉक्टरांचा प्रश्न वाटला मला.

मीं उत्तर दिलें, "फार भयंकर पत्र आहे हें!"

" भयंकर ?" डॉक्टरांनीं मघापेक्षांहि मोठें हास्य केलें. लगेच ते म्हणाले, " शस्त्रक्रिया म्हटलं कीं तुमच्या अंगावर कांटा उभा राहतो; पण दररोज पंचवीस शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टराला विचारा. तो म्हणेल—पंचवीस झाडांचीं फुलं तोडणं नि पंचवीस शस्त्रक्रिया करणं याच्यांत कांहीं फारसं अंतर नाहीं. "

मीं कळवळयानें उद्गारलों, " गरीब बिचारा सदूभाऊ !"

डॉक्टर मृदु स्वराने म्हणाले, " नि त्याची ती दुर्दैवी बायको !"

" दुर्दैवी कीं दुष्ट ?" हा प्रश्न माझ्या अगदीं जिभेवर आला होता. तो मी विचारणार इतक्यात डॉक्टर म्हणाले, " या गोष्टींत सारा दोष कांहीं त्या बाईचाच नाहीं !"

" म्हणजे ?"

" तें आता सागत बसलों तर तुम्ही जेवायला यायची टाळाटाळ कराल. तेव्हां तुम्हांला एक प्रॉमिसरी नोट लिहून देतों. रात्रीं जेवण झाल्यावर त्या बाईची सारी हकीकत—" माझ्याशीं हस्तादोलन करीत ते उद्गारले. " बराय् ! बरोबर आठला येतों मी !"

मीं घड्याळाकडे पाहिले. नुकते पांच वाजले होते. अजून तीन तास—

घोड्याला चाबूक मारून पिटाळतां येतं, पोलिसला चुकवून मोटारीचा वेग ताशीं ऐशींपर्यंत नेता येतो; पण घड्याळाच्या कांट्याची गति मात्र कुणालाहि केव्हांच वाढवितां येत नाहीं.

केव्हां एकदां आठ वाजतात असें होऊन गेलें मला !

## विमल ७

डॉ. साने यांच्या घरीं जाईपर्यंत माझें मन अगदीं अस्वस्थ होऊन गेलें होतें.

माझ्यांतला कथालेखक सदूभाऊच्या पत्राची दुसरी बाजू ऐकायला नुसता उतावीळ झाला होता! दुसरे दिवशीं दुपारीं जत्रेला जायचें असलें तरी आदल्या रात्रीं जाग येतांच लहान मूल 'उजाडलं का?' म्हणून आईला विचारतें ना? कथालेखक श्री. खांडेकर यांचीहि स्थिति तशीच झाली होती. बिचाऱ्यानें तीन तासांत दहा वेळ घड्याळाकडे पाहिलें असेल; पण त्या पाहण्याचा काय उपयोग होता? घड्याळ हा खराखुरा तत्त्वनिष्ठ शिपाई आहे. राजाच्या क्रोधकटाक्षानें त्याची गति मंद होत नाहीं किंवा रमणीच्या प्रेमकटाक्षानें ती वाढतहि नाहीं.

मात्र कथालेखकाइतकाच माझ्यांतला माणूसहि अधीर झाला होता. राहून राहून माझ्या मनांत येत होतें—डॉ. सान्यांची पत्नी आपल्याला ओळखते नि आपण मात्र तिला—

घराण्यांचे इतिहास लिहिण्याच्या पद्धतीची उपयुक्तता आजच मला पटली म्हणानात! पण तिचा या वेळीं मला उपयोग होण्यासारखा नव्हता. साने घराण्याचा इतिहास मुंबईत वाटेल त्या बिऱ्हाडांत कसा सांपडणार?

डॉ. साने यांच्या पत्नीचा नि माझा कुठें परिचय झाला असावा याविषयीं नाहीं नाहीं त्या कल्पना करीत मी त्यांच्या घरीं गेलों. मला वाटलें—आतां क्षणार्धात आपलें कोडें सुटेल.

पण दिवाणखान्याच्या दारांत येऊन हंसत मुखानें मला नमस्कार करणाऱ्या एका स्त्रीकडे दृष्टि जातांच मी अधिकच गोंधळलों. डॉक्टर म्हणाले, "या लीलाबाई नि हे—"

"ते ठाऊक आहेत मला. पंचवीस वर्षे झालीं पण यांच्यात कांहीं म्हटल्या कांहीं फरक पडला नाहीं! अगदीं आहेत तस्से आहेत हे!" लीलाबाई म्हणाल्या. तुरकाटीशीं त्यांनीं माझी तुलना केली नाहीं हेंच भाग्य म्हणायचें!

"झाडं वाढतात, दगड कधींच वाढत नाहींत." मी थट्टेनें बोलून गेलों.

लीलाबाईंनीं लगेच उत्तर दिलें, "दगडांतूनच देवांच्या मूर्ति निर्माण होतात."

मी एवढा हजरजबाबी; पण अनपेक्षित कोटीनें मी थोडासा गडबडलोंच!

डॉक्टर हंसत हंसत म्हणाले, "पुराणांत भक्तानं देवाचा पराभव केल्याच्या कथा आहेत ना? तसलाच प्रसंग दिसतोय् हा."

डॉक्टरांच्या बोलण्यावरून लीलाबाई माझ्या लिखाणाच्या निःसीम भक्त आहेत हें उघड दिसत होतें. त्याचें मला मोठेंसें आश्चर्य वाटलें नाहीं.

सध्यां मध्यम-वर्गातल्या बायकांनाच काय तें कथा-कादंबऱ्यांचीं पारायणें करण्याइतकें स्वास्थ्य मिळतें, नि त्यामुळें हल्लींच्या लेखकांचे अनेक भक्त या वर्गातच सांपडतात.

हातपाय धूत असतांना गतवर्षींची असलीच एक गोष्ट मला आठवली. एक तरुणी मला मुद्दाम भेटायला आली होती. तिनें मला विचारलें, "तुमची कोणती कादंबरी आवडते तुम्हांला?"

मीं उत्तर दिलें, "पांढरे ढग."

ती म्हणाली, "मला 'दोन ध्रुव' अधिक आवडते."

मी कांहींच बोललों नाहीं. प्रत्येकाची आवड निराळी असते म्हणूनच जग चाललें आहे. नाहीं तर केव्हांच त्याला धर्मशाळेचें स्वरूप आलें असतें! ती पुढें म्हणाली, "सतरा वेळां मीं ती वाचलीय्!"

मी तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागलों. तिनें मला प्रश्न केला, "तुम्हीं किती वेळां वाचली आहे ती ?"

मी उत्तरलों, "एकदांच."

ती क्षणभर स्तंभितच झाली. मग तिनें आश्चर्यपूर्ण स्वराने मला विचारलें, "एकदांच ?"

मी उत्तरलों, "हो. नि तीसुद्धां हस्तलिखित तपासून प्रकाशकाकडे पाठवितांना !"

जागृत देवस्थानांत एखाद्या नास्तिकानें देवाची निंदा करावी तसें माझे हें बोलणें तिला वाटलें होतें. आज लीलाबाईंच्याशीं बोलतांना असलाच कांहीं प्रसंग येतो कीं काय या विचारांतच मी न्हाणीघराबाहेर पडलो.

जेवणाची व्यवस्था टेबलावरच केली होती. डॉक्टरांचीं दोन्हीं मुलें नुकतींच जेवलीं असल्यामुळें आम्ही तिघेंच जेवायला बसलों. लालाबाईंना त्यांच्या नाशिकच्या मैत्रिणीची हकीकत विचारावी असे माझ्या मनात राहून राहून येत होतें. पण कांहीं केल्या तो धीर मात्र मला होईना.

जेवणाला सुरुवात झाल्यावर लीलाबाईंनी विचारले, "मला ओळखलंत का ?"

रस्त्यांत कुणी हा प्रश्न विचारला तर अनेकदां 'हो, हो.' म्हणून उत्तर देऊन मी निसटतों. अशा वेळीं झटक्न् नांवाची आठवण झाली तर ठीकच असतें. नाहीं तर कामाची सबब सांगून पलायन करायला तरी बारा वाटा मोकळ्या असतात.

पण आतां मी हा प्रश्न विचारणाऱ्या लीलाबाईंच्या घरांत जेवायला बसलों होतों. अगदीं त्यांच्यासमोर. चक्रव्यूहांत सांपडलेल्या अभिमन्यूसारखी स्थिति झाली होती माझी. खुद्द लीलाबाईच माझ्या मदतीला धांवल्या म्हणून बर ! नाहीं तर—

त्या हंसत म्हणाल्या, "फार लहान होतें मी तेव्हां. सांगलीला तुमच्या घराजवळ राहत होतों आम्ही. तुमच्या आजोबांची अजून आठवण आहे मला—" नवऱ्याकडे वळून त्या म्हणाल्या, "यांचे बाबाकाका अशा रसाळ गोष्टी सांगत कीं—"

जादूचे शब्द अद्भुतरम्य गोष्टींतच असतात असें नाहीं. त्यांचा प्रभाव

तुमच्या आमच्या साध्या जीवनांतसुद्धां अनुभवाला येतो. 'बाबाकाका' ह
माझ्या जीवन-कोशांतला असाच जादूचा शब्द आहे. लीलाबाईंनीं त्यांच
आठवण काढतांच एका क्षणांत त्यांच्या नि माझ्यामध्यें असलेली परकेपणाच
भिंत नाहींशी झाली.

लीलाबाई बाबाकाकांच्या गमतीच्या आठवणी सांगत होत्या नि त्या ऐक
मी जेवत होतों. शेवटीं ताक घेतांना मीं म्हटलें, "आज लहानापेक्षांहि लहा
झालों मी!"

"म्हणजे?" लीलाबाईंनीं हंसत विचारलें.

"हा काऊचा घांस, हा चिऊचा घास, म्हणून आई हट्टी मुलाच
भरवते ना? तुमच्या गोष्टींनीं अगदीं तेंच काम केलं आज! बेसुम
जेवलोंय् मी!"

"इतकं घाबरण्याचं काहीं कारण नाहीं. घर डॉक्टरचंच आहे!" स
गंभीरपणें उद्गारले.

खुर्चीवरून उठत मीं लीलाबाईंना म्हटलें, "तुमचं जेवण फार आवड
मला. चपाती, टॉमेटो, ताक, फळं—असलं जेवण जड होत नाहीं. नाहीं त
आमचं सार भात! परदेशी कापडाप्रमाणं भातावरहि बहिष्कार घालण्या
चळवळ आपल्या देशांत सुरू केली पाहिजे."

लीलाबाई नुसत्या हंसल्या.

डॉक्टर त्यांच्याकडे पाहत उद्गारले, "सोनारानंच कान टोचले
बरं झालं!"

लीलाबाईंनीं दिलेले विडे घेऊन बाहेर येत असतांना डॉक्टर म्हणा
"किती तरी दिवस लीला भात सोडायला तयारच नव्हती!" क्षणभर थां
ते उद्गारले, "नव्या दृष्टीनं आयुष्याकडं पाहतांच येत नाहीं आपल्याला अज
जीवनाचा कोणताहि महत्त्वाचा भाग पाहा—अन्न घ्या, प्रेम घ्या, धर्म घ
पांचशें वर्षांपूर्वी जिथं होतों तिथंच आहोंत आपण अजून!"

डॉक्टरांच्या मुद्रेवर तळपणाऱ्या आवेशावरून हा त्यांचा आवडता वि
असावा हें मीं ताडलें. पण सर्वसामान्य चर्चेपेक्षां सदूभाऊच्या बायको
माहिती मला हवी होती. म्हणून मीं मध्येंच म्हटलें, "प्रेमाची गोष्ट आयत
निघालीय्. तेव्हां सदूभाऊच्या त्या बायकोची हकीकत—"

डॉक्टर हंसले, क्षणभर स्तब्ध बसले नि नंतर म्हणाले, "सदूभाऊच्या त्या पत्रावरनं तुम्हीं एखादी गोष्ट लिहिलीत तर ती वाचून वाचकांना कुणाविषयीं सहानुभूति वाटेल?"

"अर्थात् सदूभाऊविषयीं."

"पण मला त्याच्या बायकोविषयींहि सहानुभूति वाटते."

मी क्षणभर चकित झालों. डॉक्टर पुढे म्हणाले, "तें पत्र वाचल्याबरोबर माझं मतहि तुमच्यासारखंच झालं होतं. पण आयुष्यांतलीं विचित्र कोडीं नुसत्या भावनांनीं सुटत नाहीत. म्हणून मीं सदूभाऊच्या सासुरवाडीविषयीं माहिती मिळविण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला, नि मग—"

माझ्या मनात एक विचित्र प्रश्न चमकून गेला. स्वतःचें व्यंग लपविण्याकरिता तर सदूभाऊने हा सारा खटाटोप केला नसेल ना?

डॉक्टर म्हणाले, "सदूभाऊला सासू नव्हती हें तुम्हाला ठाऊकच आहे. खेडेगांवांतले इनामदार म्हणजे काही शुकाचार्य किंवा महात्मा गांधी नव्हेत! पोरीवर लहानपणापासून बापाच्या बदफैलीपणाचे संस्कार झाले होते. घराबाहेरच्या गोष्टी तर सोडूनच द्या; पण खुद्द घरांत—अगदीं धडधडीत—मुलीच्या डोळ्यांसमोर—"

सदूभाऊच्या पत्रांत स्वयंपाकिणीच्या हातांत घराच्या साऱ्या किल्ल्या असल्याचा जो उल्लेख होता, त्याचा अर्थ आतां मला कळला. मी एकाग्रतेनें डॉक्टराचें म्हणणें ऐकूं लागलों—

"इनामदाराची एकुलती एक लेक होती ती. किती लाडावलेली असेल याची कल्पना करा. ना शाळा ना घरकाम. अशा स्थितींत ती लहानाची मोठी झाली. खेडेगांवांतल्या इनामदाराचं घर म्हणजे काय–धर्मशाळाच असते ती! त्यामुळं त्या छाकट्याचं नि तिचं लग्नापूर्वीच संघट्टण झालं. मी तिची वकिली करतोंय्, असं समजूं नका! पण शरीरसुखापेक्षां आयुष्यात दुसरं कांहीं महत्त्वाचं आहे हें तिला कुठं पाहायलासुद्धां मिळालं नाहीं. श्रीमंताची मुलगी असल्यामुळं गरीब नवऱ्याशीं ती कुऱ्यानंच वागूं लागली. लग्न म्हणजे नुसतं शरीराचं मीलन नव्हे; तें भावनांचं मीलन आहे, विचारांचं मीलन आहे, जीवनप्रवाहांचं मीलन आहे, ही कल्पनाच जिला उभ्या आयुष्यांत—"

लीलाबाई आंत आल्यामुळें डॉक्टर एकदम थांबले. लगेच ते हंसून

म्हणाले, " माझीं हीं व्याख्यानं हिला दररोज ऐकावींच लागतात. करते काय बिचारी ? लग्नाची बेडी पायात पडल्यावर ही सक्तमजुरीची शिक्षा भोगायलाच हवी. पण आज मात्र कैद्याला पूर्ण सुटी देणार आहें मी !"

लीलाबाईनीं डॉक्टरांच्याकडे पाहून त्यांचा निषेध करण्याकरतां अशी मान वेळावली, की 'कलहानेंच प्रेमाला गोडी येते' या कल्पनेचे तें मूर्तिमंत चित्रच वाटले मला.

डॉक्टर पुढें म्हणाले, "आतां तुमची वाङ्मयचर्चा सुरू होऊं द्या. मी होतों अध्यक्ष ! म्हणजे झोपायला कुणाची परवानगी नको." लगेच माझ्याकडे वळून ते उद्‌गारले, " लीलाला तुमचं लिहिणं फार आवडत असल, तरी हल्लींच्या तुमच्या एका गोष्टीवर फार नाखूष आहे ती."

लीलाबाई डॉक्टरांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागल्या.

मी कुतूहलाने प्रश्न केला, " कुठली गोष्ट आवडली नाहीं यांना ?"

डॉक्टर शांतपणानें उद्‌गारले, " पारिजातकाचीं फुलें !"

त्यानीं अधिक काहीं बोलूं नये म्हणून लीलाबाई मध्येंच म्हणाल्या, "इश्श ! कांहीं तरीच काय सांगतां ?"

पतिपत्नींच्या या संवादानें मी मात्र गोंधळांत पडलों. मीं दोघांच्याकडे पाहिलें. लीलाबाई नजरेनें डॉक्टराना 'नको, नको.' म्हणून खुणावीत आहेत हें माझ्या लक्षांत आले. पण ही सारी भानगड काय आहे हें मात्र—

लीलाबाईच्याकडे पाठ करून डॉक्टर मला म्हणाले, " तुम्हीं महाराष्ट्राचा फार मोठा गुन्हा केला आहे !"

" कुठला ? मी जन्माला आलों हा ?"

हंसत हंसत डॉक्टर म्हणाले, " दोन-तीन महिन्यांपूर्वी महाराष्ट्राला एक विलक्षण प्रतिभाशाली लेखिका मिळणार होती. पण तुमच्या या पारिजातकाच्या फुलांनीं सारा घोटाळा केला ! तुमची गोष्ट प्रसिद्ध झाली नसती तर—"

डॉक्टरांच्या थट्टेचा सारा रोख आतां कुठें माझ्या ध्यानांत आला.

मीं लीलाबाईंना म्हटलें, " असं पुष्कळदां घडतं. एकच कल्पना अनेकांना सुचते—"

लीलाबाई म्हणाल्या, " कल्पनेनं नव्हती लिहिली मीं ती गोष्ट."

डॉक्टर हंसत म्हणाले, " नाहीं कशी ? मूळच्या विमलला तूं कमल

बनवलंस! मारुतीनं द्रोणागिरी उचलला, तसं नाहीं ना उचलून तूं साताऱ्याला नेऊन ठेवलंस! नि—"

लीलाबाई गंभीरपणानें म्हणाल्या, "माझ्या बालमैत्रिणीचीच कथा आहे ती."

बालमैत्रीण—विमल—नाशिक—

डॉक्टराची थट्टा सुरूच होती. ते म्हणाले, "पोलिस इन्स्पेक्टर असलेल्या विमलच्या नवऱ्याला तूं डॉक्टर केलं नाहींस हें माझं भाग्य! नाहीं तर—"

आता अगदीं खात्रीच झाली माझी. माझ्याकडे आलेल्या त्या पोलिस इन्स्पेक्टरच्या बायकोची कहाणी कळण्याची किती सुंदर संधि आली होती ही!

मीं लीलाबाईंना म्हटलें, "तुम्हीं माझ्या इतक्या गोष्टी वाचल्या आहेत. आतां तुमची एक तरी गोष्ट मला वाचायला द्या ना. दुसऱ्याच्या घरीं दहादां जेवल्यावर त्याला एकदां तरी जेवायला बोलवायला नको का?"

त्यांनीं पहिल्यादां खूप आढेवेढे घेतले. पण पहिलटकरीण कितीहि लाजली तरी आपलें अपत्य दुसऱ्यानीं पाहावें नि त्यांनीं त्याचें कौतुक करावें अशी तिची इच्छा असतेच कीं! नवशिक्या लेखकांनाहि तसेंच वाटत असतें.

डॉ. साने यांच्या घरून मी निघालों तो लीलाबाईची वही घेऊनच.

× × ×

मी बिऱ्हाडीं आलों त्या वेळीं अकरा वाजायला आले होते. त्यांतून काल रात्रीं गाडींत जवळ जवळ जागरणच झालें होतें. झोपेचें पकडवॉरंट चुकविणें अशक्य असल्यामुळें लीलाबाईची वही टेबलावर टाकून नि दिवा मालवून मी अंथरुणावर पडलों.

पण कांहीं केल्या माझे डोळे मिटेनात. पतिपत्नींमध्ये क्षुल्लक कारणावरून अबोला उत्पन्न होतो ना? तशी झोंपेच्या बाबतींत माझी स्थिति झाली. ती माझ्या जवळपास घुटमळत होती. मला हवीहि होती! पण कांहीं केल्या ती माझ्या हाताला मात्र लागेना.

ही कळ लीलाबाईच्या वहीनें लावली आहे हें मीं ओळखलें.

मी झटकन् उठलों, दिवा लावला नि लीलाबाईची वही उघडली. पहिल्या दोन-तीन गोष्टी अपुऱ्याच होत्या. नावांवरून त्याचे कथाविषयहि अगदीं निराळे वाटले मला.

चौथ्या गोष्टीचें नाव पाहताच मी थांबलों—' कुस्करलेलें कमळ !'

विमलची कमल करून कथा लिहिणाऱ्या लीलाबाईचें मला हंसूं आलें. पण ते क्षणभरच. मोठमोठे मराठी लेखकसुद्धां ज्या मोहाला बळी पडतात तो आवरणें एखाद्या नवशिक्या लेखिकेला कसें शक्य आहे ? अनुभवावर केलेलें कल्पनेचें कलम म्हणजेच ललितकथा. पण–

मीं वाचूं लागलों—

" कमळ अंधाराकडे शून्य दृष्टीनें पाहत बसली होती. तिच्या मनांत आलें-देवानें अंधाराच्या सोबतीला इतक्या चांदण्या दिल्या आहेत; पण माणसांच्या दुःखाला मात्र दुःखाचीच सोबत दिली आहे. हें पाहिलें कीं वाटतें–गोष्टींतल्या राजाप्रमाणें सृष्टि निर्माण करणाऱ्या देवाला दोन बायका असाव्यात. एक आवडती नि दुसरी नावडती ! पहिलीपासून निसर्ग झाला असावा. नि दुसरीपासून मनुष्य ! म्हणूनच तो देवाचा इतका नावडता आहे.

बाहेर अंधार वाढत होता. कमळच्या मनांतहि तो वाढत होता. ती म्हणत होती—बाहेरचा अंधार उद्या सकाळीं नाहींसा होईल. पण माझ्या मनांतला अंधार ? तो नाहींसा करणारा सूर्य कधींच उगवणार नाहीं. आतां सुखाची आशा करायची ती पुढल्या जन्मीं. पण—

पुढला जन्म कुणीं पाहिला आहे ? तिनें अंधाराकडे पाहून आपले डोळे पुसले. चटकन् एक कल्पना तिच्या मनात येऊन गेली–चित्रपट अंधारांतच पाहतात !

जखमेवरून हात फिरविल्याशिवाय माणसाला बरेंच वाटत नाहीं. दुःखाचेंहि तसेंच आहे. त्याची आठवण करण्यांतच माणसाला एक प्रकारचें सुख होत असतें. अयोध्येच्या सिंहासनावर बसल्यानंतरसुद्धां आपल्या वनवासाचा जीवनपट पाहण्यांत सीतारामांना आनंद वाटत होताच कीं नाहीं !"

मीं चकित झालों. हस्तलिखित थोडे बाजूला ठेवून मीं विचार करूं लागलों.

एखाद्या मासिकांत एवढाच मजकूर निनांवी छापला असता तर तो मींच लिहिला आहे असें लोकांना वाटलें असतें. माझ्या आवडी-निवडी, माझ्या खोडी, माझ्या लेखनांतल्या विशिष्ट लकबा, साऱ्याच गोष्टी लीलाबाईनीं उचलल्या होत्या, नि त्याहि गबाळेपणाने नाहींत, तर मोठ्या ऐटीनें! माझ्या मनांत आलें—राजांचे तोतये निघतात ना? तशी एखाद्या लेखकाचा तोतया निघाल्याची गोष्ट कुणीं लिहिली तर ती मोठी गमतीची होईल!

मीं मोठ्या उत्सुकतेनें पुढला मजकूर वाचूं लागलो—

"कमलच्या डोळ्यांपुढें तिच्या आयुष्याचा चित्रपट भरभर धावूं लागला.

ती नऊ दहा वर्षांची होती! तिच्या वडिलांची वकिली चांगली चालत असे. पण त्याना कीर्तन करण्याचा नाद होता. कुटाळ लोक म्हणत 'वकिली चालावी म्हणूनच ते कीर्तन करतात!' कमळला ते कधीच खरें वाटलें नाहीं. वडिलांच्याबरोबर ती रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत मोठ्या हौसेनें जागे. पूर्वरंग संपून कथा सुरू झाली कीं, तिच्या डोळ्यांवरली झोप हां-हां म्हणता उडून जाई.

तिच्या वडिलांचीं सात-आठ आवडतीं आख्यानें होतीं. त्यांत रंभा शुकाला भुलविण्याकरितां कशी आली, विश्वामित्र मेनकेच्या सौंदर्याला कसा बळी पडला, पराशर थोर ऋषि असूनसुद्धां नावेंत एका कोळ्याच्या मुलीला मिठी मारण्याइतका पागल कसा झाला, इत्यादि गोष्टी ते खुलवून सांगत. 'स्त्री ही नुसती सौंदर्याचीच खाण नाहीं, ती पापाचीहि खाण आहे' हें ते श्रोत्यांना वारंवार बजावीत. श्रोत्यांत वृद्ध आणि विधवा यांचाच भरणा अधिक असल्यामुळें बहुतेक मंडळी त्यांच्या बोलण्याला मान डोलवीत. तें पाहिलें कीं, लहानग्या कमळलाहि गप्प बसवत नसे. तीहि मान डोलवी.

तिच्या वडिलांचा आवाज मोठा गोड होता. त्यामुळें ते मधून मधून जीं भजनें नि पदें म्हणत तीं कमळ मोठ्या भक्तिभावानें ऐके. तीं सारीं तिला पाठ येत. '**सावध सावध बाबा, ही नार विषाचा प्याला!**' असल्या किती-

तरी ओळी ती आपल्या मैत्रिणींना नेहमीं म्हणून दाखवी. त्यांचा अर्थ त्या वेळीं कुणालाच कळत नसे !

पण कमळच्या मनावर एक गोष्ट न कळत बिंबून गेली: स्त्री आणि पुरुष यांनीं एके ठिकाणीं येण्यांत मोठें पाप आहे.

याच वेळीं तिच्या शेजारीं राहणाऱ्या एका हमालानें पोटांत चाकू खुपसून आपल्या बायकोचा खून केला. तें भयंकर दृश्य पाहायला जमलेल्या गर्दीत कमळहि होती. जमलेल्या आयाबाया 'नवरा कसला ? राक्षस आहे मेला !' असें बोटे मोडून पुटपुटत होत्या. तें दृश्य नि ते शब्द ! नवरा हा राक्षसापेक्षां फारसा निराळा प्राणी नाहीं अशी कमळची त्या दिवशीं खात्री झाली.

याच वेळीं तिच्या घरात एक विलक्षण गोष्ट घडली.

कमळला एक वडील भाऊ व तीन धाकटीं भावंडे होतीं. या साऱ्या भावंडांत दादाच तिला अधिक आवडायचा !

तो तिच्याशीं फारसा खेळत नसे. पण खेळायला लागला म्हणजे म्हणे, "कमळ, मुलींनीं सागरगोट्यानीं खेळण्याचे दिवस नाहींत हे !" कमळ विचारी, "मग कशानं रे खेळायचं आम्ही ?" तो शांतपणानें उत्तर देई, "बंदुकीच्या गोळ्यांनीं !" हें ऐकून कमळला हंसू येई. "वेड लागलं दादाला" ही कुठें तरी ऐकलेली ओळ गुणगुणत ती सागरगोट्यांच्या खेळांत गुंग होऊन जाई.

पण दादाच्या या बोलण्यांत काहीं तरी भयंकर अर्थ आहे हें तिला एके दिवशीं मध्यरात्रीं कळले.

कीर्तन नुकतेंच संपले होते. लोक तिच्या वडिलांच्या पायां पडून परत जात होते. इतक्यांत पांच-सहा पोलिस त्यांच्या घरात शिरले. 'तुमच्या घराची झडती घ्यायची आहे' असें सांगून त्यानीं तिच्या वडिलांना एक कागद दाखविला. तो पाहून ते मटकन् खालींच बसले.

पहांटे चार वाजेपर्यंत झडतीचा गोंधळ सुरू होता. कमळचे वडील कपाळाला हात लावून बसले. तिची आई देवापुढे जाऊन धाईधाई रडूं लागली. तिचीं धाकटीं भावंडें भ्यालेल्या सशांप्रमाणे एका कोंपऱ्यांत जाऊन लपलीं दादा तेवढा—

तो मात्र पोलिसांनीं बसविलें होतें तिथें अगदीं घुमा बसला होता. त्याच्या

मुद्रेवर भय नव्हतें, डोळ्यांत पाणी नव्हतें, कांहीं नव्हतें. एखाद्या देवळांतल्या देवाप्रमाणें तो स्वस्थपणाने सारें पाहत होता.

पहांटे चार वाजतां झडतींचें काम संपले. पोलिसांनीं दादाच्या खोलींतले कांहीं कागद बरोबर घेतले.

कमळच्या मनांत आलें—ते कागद घेऊन जाईनात पोलिस. दादा दुसरे कागद आणील.

पण ते जेव्हां तिच्या दादालाहि नेऊं लागले, तेव्हां मात्र तिचें काळीज कलकललें. तिची आई मुळूमुळू रडत होती. पण कमळ धिटाईने पुढे झाली नि पोलिसांना म्हणाली, "माझ्या दादाला कुठे घेऊन चाललात?" पोलिसांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. ते नुसते हंसले. आपण रडत असताना ते हंसताहेत याचा कमळला विलक्षण राग आला. आपल्या दादाला सोडविण्याकरितां झेप घालून ती एका पोलिसाच्या हाताला कडकडून चावली. त्याबरोबर त्या पोलिसाने इतक्या जोराने तिला ढकलून दिलें, कीं—ती खालीं पडली म्हणून बरें; पायरीवर पडली असती तर मेलीच असती!

त्या प्रसंगाचें स्वप्न तिला पुढे किती तरी वर्षे पडत असे. मग ती ओरडत जागी होई. नि पुन्हां तें स्वप्न पडूं नये म्हणून अगदीं पहाट होईपर्यंत जागी राही.

कट, अत्याचार, क्रांति वगैरे शब्द त्या वेळीं प्रथमच तिच्या कानावर पडले. त्या शब्दाचा पुरा अर्थ तिला कळला नाहीं. पण या शब्दांमुळें सरकारनें आपल्या दादाला पकडून तुरुंगांत घातलें आहे हे मात्र ती कधींहि विसरली नाहीं.

त्या मध्यरात्रीं कमळच्या वडिलांच्या घरांत दुःखानें जो प्रवेश केला तो कायमचाच. ते लवकरच मधुमेहाचें निमित्त होऊन वारले. जिथें फुलें वेचलीं तिथें गोवऱ्या वेचायचें जिवावर येऊन तिची आई जमिनींचें उत्पन्न असलेल्या खेडेगांवीं जाऊन राहिली.

पण त्या खेड्यांत कमळचें शिक्षण होणें शक्य नव्हते. म्हणून तिनें तिला एका मावशीकडे ठेवलें. या मावशीचा नवरा दारूबाज होता. त्यामुळें घरांत दररोज रात्रीं जे खटके उडत ते ऐकतां ऐकता कमळच कान किटून गेले.

नवरा आणि राक्षस या शब्दांची तिच्या कल्पनेनें पूर्वी घातलेली सांगड अधिकच घट्ट झाली.

मावशीच्या घरीं तिला एकच विरंगुळा होता. कांहीं सुचेनासें झालें कीं ती कादंबऱ्या वाची किंवा कविता लिही. आपणांला कविता कशा लिहितां येऊं लागल्या हें तिचें तिलाच कळत नसे. पण बागेंत उडणारें फुलपांखरूं पाहिलें किंवा आकाशांत चमकणाऱ्या चांदण्यांकडे लक्ष गेलें, कीं ती स्वतःला विसरून जाई. मग तिला नव्या नव्या गमतीदार कल्पना सुचूं लागत. आणि—

किती तरी वर्षांनीं तिचा दादा तुरुंगांतून सुटला. तिला भेटायला तो मावशीकडे आला. तिनें मोठ्या हौसेनें त्याला आपली कवितांची वही दाखवली. ती चाळून तो म्हणाला, ‘चुलींत नेऊन घाल ही वही. देशांत बाग फुललेली नाहीं; आग लागलेली आहे!’

तुरुंगात गांधींच्या दोन-तीन मोठया शिष्यांचा सहवास त्याला लाभला होता. गांधींच्या मार्गानेंच देशाचें कल्याण होईल अशी त्याची खात्री झाली होती. तो एका खेडयांत आश्रम काढणार होता. चरखा चालवायचा, हरिजनांच्या मुलांना शिकवायचें, ग्रामोद्धार करायचा, वगैरे अनेक गोष्टी तो बोलत होता. बायकांमध्ये या गोष्टींचा प्रसार करण्याकरितां त्याला कुणी तरी हवेंच होतें. कमळ आनंदानें त्याच्याबरोबर गेली.

पहिले कांहीं दिवस आश्रम हा दुसरा स्वर्ग आहे, असें तिला वाटलें. गोरगरिबांच्या उपयोगीं पडणें, त्यांच्याशीं खेळीमेळीनें बोलणें आणि निसर्गाच्या सान्निध्यांत सारा वेळ काढणे, या गोष्टींत किती आनंद भरला आहे याचा हा पहिलाच अनुभव होता तिचा.

पण थोडे दिवस गेल्यावर आपल्या सुखांत कांहीं तरी कमी आहे असें तिला वाटूं लागलें. दादाविषयीं तिला आदर होता, पण त्याच्या वैराग्याच्या कल्पना तिला कशाशाच वाटत.

एके दिवशीं ती गांवांतल्या जमीनदाराच्या घरीं हळदी-कुंकवाला गेली होती. तिथें तिच्या हाताला अत्तर लावलें.

ती आश्रमांत परत आली त्या वेळीं संध्याकाळच्या प्रार्थनेची वेळ झाली होती.

कमळ दादाजवळ जाऊन उभी राहिली. प्रार्थनेकरतां तिनें तोंडसुद्धां उघडलें. इतक्यांत त्याची भेदक दृष्टि तिच्याकडे पाहूं लागली. " वास कसला येतोय् ?" त्याने विचारलें. " अत्तर लावलंय् हाताला !" भीत भीत कमळनें उत्तर दिले.

तो गुरगुरत म्हणाला, " आधीं हात धुऊन ये. चल जा."

मोठे विचित्र वेड. होते त्याचें हें. कमळने कुठलीशी कादंबरी वाचायला आणली. त्यानें ती आश्रमाबाहेर फेंकून दिली.

" चरख्यासारखा दुसरा सोबती नाहीं माणसाला !" तो तिला नेहमी सांगे.

एका सुटींत त्या खेडेगांवांत एक तरुण आला. आपल्या मामाच्या घरीं राहायला आला होता तो. तो बी. ए. च्या वर्गांत होता. त्याचा आवाजहि मोठा गोड होता. तो गांधींचा भक्त असल्यामुळें मधून मधून आश्रमाकडे येऊं लागला. हळूहळू कमळची व त्याची मैत्री जमली. दोघेहि संध्याकाळीं फिरायला जाऊं लागलीं. तीं नदीवर जात नि पाण्यांत पाय सोडून कविता म्हणत बसत. अशा वेळीं आपण एखादें सुंदर स्वप्न पाहत आहों असें कमळला वाटे.

एके दिवशीं संध्याकाळीं ती प्रार्थनेच्या वेळेपर्यंत परत आली नाहीं. 'इतका वेळ काय करीत होतीस ?' म्हणून दादानें विचारलेल्या प्रश्नालाहि तिला समाधानकारक उत्तर देता आलें नाहीं. तो संतापला. त्याने तिला रात्रभर खोलींत कोंडून ठेवलें.

कमळ आश्रमांतून निघून जायला उत्सुक झाली. याच वेळीं तिची आई आजारी पडली. आयतेंच निमित्त मिळालें तिला जायला.

तिच्या आईला आपलें हें शेवटचें दुखणें आहे असें वाटत होते. ती साऱ्या गोष्टींची निरवानिरव करूं लागली. आपल्या डोळ्यांदेखत कमळचे लग्न व्हावें असा ध्यास घेतला तिनें. लवकरच तिच्या मनासारखें एक स्थळ सांपडलें. नवरा चांगला पोलिस इन्स्पेक्टर होता. सातारला नुकतीच बदली झाली होती त्याची !

आईला वाईट वाटूं नये म्हणून कमळनें या स्थळाविषयीं मुळींच कुरकुर केली नाहीं. पण आपला भावी पति पोलिस इन्स्पेक्टर आहे या कल्पनेनें

तिला कांहीं विशेष आनंद झाला नाहीं. उलट एक प्रकारची भीतिच उत्पन्न झाली मनांत! तिच्या दादाला पकडून नेणारे ते कठोर पोलिस—त्यांच्या-सारखाच आपला नवराहि निर्दय असणार, अशी विचित्र कल्पना तिच्या मनात वरचेवर तरळून जाऊं लागली.

लग्नानंतर लवकरच कमळची नि तिच्या पतीची जी पहिली भेट झाली—

एका शब्दाने अर्थाचा अनर्थ होतो हे तिनें वाचले होतें. पण एका स्पर्शानें मनुष्याच्या आयुष्यात भयंकर फरक पडतो हा अनुभव तिला यायचा होता.

तिच्या पतीनें तिचा हात हातांत घेतला. फुले चुरगळावींत तशीं त्या स्पर्शानें तिच्या मनाची स्थिति केली. तिच्या कल्पनेंतलें मृदुत्व त्या स्पर्शांत मुळींच नव्हते. खेडेगावातल्या त्या तरुणाचा नदीकाठावरला स्पर्श—सतारीच्या तारेवर बोट ठेवावें तसा तिचा हात त्यानें हातात घेतला होता. त्या अनुभवाशीं तिचें मन या प्रसंगाची तुलना करूं लागलें.

अधाशी मनुष्यानें अन्नावर झडप घालावी किंवा टपून बसलेल्या बोक्यानें म्हारीला पकडावें, तसें कांहीं तरी तिला वाटलें. 'नवरा म्हणजे राक्षस' या लहानपणापासून ऐकलेल्या वाक्याची तिला राहून राहून आठवण होऊं लागली. ज्या शरीरसुखाच्या कल्पनेने अंगावर रोमाच उभे राहावेत, त्याची आठवण होताच तिच्या अंगावर काटा उभा राहूं लागला.

नवरा पोलिस इन्स्पेक्टर असल्यामुळे त्याला अनेकदा अवेळीं कामाला जावे लागे. तो अपरात्रीं केव्हाहि परत येत असे. आपली झोंपमोड होऊं नये म्हणून कमळ खोलीचें दार नुसतें लोटून ठेवी. पण तिला नेहमीं एक विचित्र अनुभव येई. तिच्या झोपेची पर्वा नवऱ्याला मुळींच वाटत नसे. तो तिला हलवून जागी करी. नि मग?—सुखदुःखाच्या गोष्टी नाहीत, हास्य-विनोद नाहीं, थट्टामस्करी नाहीं, कांहीं नाहीं, नुसती शरीरसुखाची अपेक्षा.

प्लॅटफॉर्मच्या यंत्रात एक आणा टाकून तिकीट घेतात ना? लग्नाची माळ घालून बायकोहि तशीच खरेदी करतात असें तिला वाटूं लागलें. इतरांशी गोडीगुलाबीनें वागणारा नवरा एकांतांत आपल्याशींच धसमुसळेपणानें कां वागतो हे कोडें तिला उलगडेना; पण त्याच्याविषयींचा तिटकारा मात्र तिच्या मनांत वाढू लागला. लहानपणीं ऐकलेल्या कीर्तनांतल्या गोष्टी राहून राहून

तिच्या डोळ्यांपुढे उभ्या राहूं लागल्या. स्त्री आणि पुरुष यांनीं एकत्रित येण्यांत पाप आहे, हा बाळपणातला विचारहि मधून मधून तिच्या मनात बळावे. आपल्या वडील भावाच्या पावित्र्याची नि नवऱ्याच्या पशुत्वाची तिनें तुलना केली नाहीं, असा एक आठवडाहि गेला नसेल !

अशाच स्थितींत तिला दिवस गेले. आई नसल्यामुळें मावशीनेच तिचें बाळंतपण केलें. पुढें मावशी तिच्याबरोबर काहीं दिवस राहायलाहि आली.

मावशीच्या छत्रामुळे आपण सुरक्षित आहोत असें तिला प्रथम प्रथम वाटलें. पण तिच्या नवऱ्यानें एके दिवशीं भर दुपारीं जेव्हां—

त्या दिवशीं रडून रडून तिचे डोळे सुजले. आपल्या गुहेत कुठल्याहि स्त्रीला बळजबरीनें घेऊन जाणारा रानटी मनुष्य, नि पत्नीच्या इच्छेविरुद्ध तिच्या शरीरावर मालकी गाजविणारा आजचा नवरा यात तिला तिळभरहि फरक वाटेना.

हें दुःख विसरण्याकरिता ती आपल्या मुलाचें कौतुक करण्यात दंग होऊन जाऊं लागली. मधून मधून ती कविता लिही. पोथ्यापुराणें वाचण्याचाहि नाद तिला लागला. बापाप्रमाणें आपणहि कीर्तनकार व्हावें अशी एक इच्छाहि तिच्या मनांत उत्पन्न झाली.

कमळच्या नवऱ्याला तिच्या मनांतल्या वादळाची दादच नव्हती. हळूहळू नवरा बायकोचें बोलणें कमी झालें. त्याच्या बडबडीकडे ती लक्षच देईनाशी झाली. त्याच्या शरीरसुखाचे एक साधन म्हणून यापुढें जगायचे नाहीं असा मात्र तिनें मनाशीं निश्चय केला.

आपल्या या नादांत गुंगत राहून ती सुखीहि झाली असती; पण तिच्या नवऱ्यानें नवे गुण पाघळायला सुरुवात केली.

एकदां तो अपरात्री खोलींत आला. कमळ जागीच होती. कसला तरी भपकारा आला तिला ! सापाचा संशय आल्यावर माणूस कधी गप्प बसेल का ? तिचीहि तशीच स्थिति झाली. ती मुद्दाम त्याच्या जवळ गेली. त्याच्या तोंडाला येणारी ती दारूची दुर्गंधि—कुठें तरी जाऊन जीव द्यावा असें वाटलें तिला !

ती त्याच्याशी अधिक कठोरपणानें वागूं लागली. हळूहळू एका नायकिणीच्या घरीं नेमानें जाण्याइतकी त्याची तयारी झाली. ती बाई चांगली

गाणारी होती. 'आपण तिचें गाणें ऐकायला जातों' असेंच तो तिला सांगे; पण तिला ते खरें वाटेना. एके दिवशीं ती चिडून त्याला म्हणाली, "असले धंदे करण्यापेक्षां दुसरं लग्नच करा कीं!"

त्यानें पडत्या फळाची आज्ञा घेतली नि वर्तमानपत्रांत जाहिरात दिली. 'पहिल्या बायकोची या लग्नाला संमति आहे' म्हणून खुशाल छापून दिलें त्यानें. ती जाहिरात पाहिल्यापासनं कमळ झुरूं लागली. तिला नवरा हवा होता, पण त्याच्यांतलें पशुत्व नको होतें.

सवत आली कीं—

काय करावें हें—

तिला कळेना! तिच्या डोळ्यापुढे अंधार पसरला."

× × ×

लीलाबाईनीं गोष्ट इथेंच सोडली होती. मला मोठी चुटपुट लागली. पुढें या विमलचें—म्हणजे गोष्टींतल्या कमळचें—काय झाले? त्या नाशकाला कुणासाठीं गेल्या होत्या? तिथें जीव देण्याचा प्रयत्न कुणीं केला? विमलनें?

मध्यरात्र झाली होती म्हणून. नाहींतर लीलाबाईंना फोन करून मीं पुढली सारी हकीगत विचारली असती!

माझ्या मनात हे विचार येत असतानाच माझे हात त्या वहीचीं पानें चाळीत होते. चटकन् एक पत्र मला दिसलें. लीलाबाईंचें एखादें खाजगी पत्र चुकून या वहीत राहिले असावें असें मला वाटलें. ते तसेंच राहूं द्यावें म्हणून मी पानसुद्धा उलटणार होतों. इतक्यांत माझ्या मनात आलें—लीलाबाईनीं ही सत्यकथा लिहिली ती त्या विमलच्या माहितीवरूनच. त्या माहितींतलेंच हें एखादें पत्र नसेल कशावरून? लीलाबाईनीं लिहिलेल्या गोष्टीची पुढची हकीगतसुद्धां कदाचित् या पत्रावरून कळेल आपल्याला.

मोहाला अनुकूल साक्षीदारांची कधींच उणीव भासत नाहीं.

मीं तें पत्र उघडून खालची सही वाचली मात्र! मी स्वप्नात तर नाहीं ना असं वाटलें मला. त्या पत्राखालीं सही होती, 'कुंदा केळकर!'

कुंदा! रामभाऊची बायको!

विमलच्या कहाणीच्या वहीतच तिचें पत्र लीलाबाईनीं कां ठेवावें?

कुंदाचीहि अशीच कांहीं करुणकहाणी आहे कीं काय? रामभाऊनें तीन

वर्षे आजारी बायकोला त्रास न दिल्याच्या ज्या गप्पा मारल्या होत्या त्या खऱ्या कीं खोट्या हें पाहायची आयती संधि आली होती ही!

मीं भरभर पत्र वाचूं लागलों. अगदीं लहान होतें ते.

" मीं छोटं पत्र लिहिलं आहे म्हणून रागावूं नकोस. अशक्तपणानं हात कांपतोय्. अक्षरसुद्धां वाईट आलं आहे त्यामुळं. अगदीं लहान मुलासारखं!

मी लहानच आहें आतां; नाहीं ग लीला? क्षयासारख्या दुखण्यातून नुकताच पुनर्जन्म झालाय् माझा. तेव्हा मीं आतां कुक्कूबाळासारखं कांहीं केल तरी—

असं लिहायला लागलें तर पत्र कधींच पुरं होणार नाहीं.

लीला, माझ्या पतींच्या औषधांनीं नि हवेनंच कांहीं मी बरी झालें नाही. तुझ्या पत्राचासुद्धां फार उपयोग झाला.

मधून मधून तूं एका नाजुक गोष्टीविषयीं लिहीत होतीस ना? तिच्याविषयीं खूप सांगायचंय् मला तुला. आज एकच गोष्ट लिहिते.

माझ्या आजाराची कल्पना आल्यापासून त्यांनीं मला कधीं कधीं त्रास दिला नाहीं. या तीन वर्षांत–जणू कांहीं बहीणच होते मी त्याची! पहिल्या पहिल्यादा त्यांना तें कठीण वाटलं. त्यानाच काय मलासुद्धां—

जाऊं दे ते! नाहीं तर याच्यावरच गोष्ट लिहायला लागशील तूं! या आजारानं मला एक नवी दृष्टि दिली बघ. मनुष्यांत देव असूं शकतो हें त्यानं दाखवलं. जाळणारी वीज प्रकाशहि देऊं शकते. होय ना? प्रीतीहि तशीच आहे. ती उपभोगाइतकीच त्यागांतहि गुंग होऊन जाते.

हें सारं मोकळेपणानं लिहिलंय् मी. याच्यावर गोष्ट मात्र लिहूं नकोस हं बाई! नि लिहिलीसच तर नायिकेचं नांव कुंदा ठेवूं नकोस. निदान तें मंदा कर.

मुंबईला केव्हां यायला मिळतं तें बघूं या. अंबाबाईचा नवस फेडायला ते लवकरच कोल्हापूरला जाणार आहेत. पण त्याच्याबरोबर येण्याइतकी शक्ति नाहीं आली मला अजून.

तुझी

**कुंदा केळकर** "

× × ×

दुसरे दिवशीं सकाळीं ती वही परत करण्याच्या निमित्तानें मी डॉक्टरांच्या दवाखान्यांत गेलों. डॉक्टर नुकतेच आले होते.

वर्हा हातांत घेऊन त्यांनीं विचारलें, "कशी काय आहे लीलाची गोष्ट ?"

" थोडी अपुरी वाटली."

" तिचा पुढचा भाग परवाच घडला."

" म्हणजे ? "

" त्या विमलनं जीव देण्याचा प्रयत्न केला ना ?"

" का ?"

" तिच्या नवऱ्यानं दुसरं लग्न केलं म्हणून !" क्षणभर थाबून ते म्हणाले, " दोघांचं अज्ञान बाधलं शेवटीं त्यांना ! नाहीं तर माझ्या बायकोच्या त्या चुलतबहिणीची हकीगत पाहा—"

मीं अधीरपणानें प्रश्न केला, " कोण ? कुंदा केळकर ?"

" तुमच्या ओळखीचा आहे वाटतं ?"

" त्यांना कधीं पाहिलं नाहीं मीं; पण रामभाऊ केळकर नि मी कॉलेजात अगदीं दोस्त होतों ना ? नुकताच येऊन गेला तो कोल्हापूरला !"

कुंदाविषयीं डॉक्टर काहीं तरी बोलणार होते. इतक्यांत दवाखान्याच्या दारांत कुणीतरी आल्यासारखें वाटल्यामुळे ते समोर पाहूं लागले.

मींहि मान वळवली. दारांत आलेल्या व्यक्तीचें लक्ष माझ्याकडे जातांच ती चपापली. ती सुमति होती.

'पारिजातकाचीं फुलें' ही माझी गोष्ट वाचून रागारागानें तिच्यावर चावटपणाचा शिक्का मारणारी नि उषेला पत्र लिहिणारी तिची ही मैत्रीण—

मी गोंधळांत पडलों. माझें मन म्हणत होतें—डॉ. सान्यांच्याकडे हिचें काय काम असावें ?

# सुमति ८

सुमतीच्या मुद्रेवरल्या आश्चर्याचे हां-हां म्हणतां आनंदांत रूपांतर झालें. पुढें येऊन मला नमस्कार करीत ती म्हणाली, "अगदीं शंभर वर्षं आयुष्य आहे हं तुम्हांला, भाऊराव !"

निरनिराळया होराभूषणानीं व ज्योतिषमार्तंडांनीं वर्तविलेलीं माझ्या आयुर्मर्यादेचीं अनेक भविष्यें क्षणार्धांत मला आठवलीं. अठ्ठावन वर्षांच्या पलीकडे मला जिवंत ठेवण्याची त्यांच्यापैकीं कुणाचीच इच्छा नव्हती ! त्यामुळें एकदम आणखी बेचाळीस वर्षं बहाल करणाऱ्या सुमतीचें मीं हसून स्वागत करावें यांत नवल कसलें ?

माझ्या समोरच्या खुर्चीत ती बसत असतांना मीं म्हटलें, "आज माझी एक मोठी अडचण दूर झाली, सुमतिताई."

साने व सुमति माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागलीं.

मी गंभीरपणानें सुमतीला म्हणालों, "आतां एखादं साप्ताहिक काढायला कांहीं हरकत नाहीं मला. साप्ताहिकाचा महत्त्वाचा भाग म्हणजे भविष्य ! तें तुमच्याकडून मिळणार असं आतांच्या तुमच्या बोलण्यावरनं सिद्ध झालंच आहे. बस् ! ठरलं ! पहिल्या स्त्री-ज्योतिष्याचा मान माझं साप्ताहिक पटकावणार !"

माझ्या या थट्टेला प्रत्युत्तर देण्याकरितां सुमतीने ओठ किंचित् उघडलेसुद्धां होते. पण साने मध्येंच बोलूं लागल्यामुळें तिनें ते लगेच मिटून घेतले. लाजाळूच्या इवल्याशा पानाना हाताचा स्पर्श होतांच त्याचा संकोच होतो ना? तशी तिच्या ओठांची ही हालचाल मला वाटली.

साने माझ्याकडे पाहत उद्गारले, "भविष्याइतकंच सिनेमा हेहि साप्ताहिकाचं महत्त्वाचं अंग आहे. त्या बाबतींतहि याची तुम्हांला मदत होईल!"

मी चकित झालो. मला वाटलें—सुमति शाळा सोडून एखाद्या चित्रपट कंपनींत नटी झाली असावी! हल्लीं तरुणतरुणींना पडद्यावर येण्याचा मोह किती अनावर होत आहे याचे पुरावे माझ्यापाशींहि अनेक होते. एल्‌एल्. बी.चा अभ्यास करणारा एक विद्यार्थी 'गाढवाचें काम करावें लागलें तरी बेहेत्तर पण मला एकदां पडद्यावर आणा' म्हणून मध्यें दोन वर्षे माझ्या मागें लागला होता. अगदीं परवा एका प्रोफेसराच्या लठ्ठ पत्नींनींहि असाच पाठपुरावा केला होता माझा! कोलंबसाला नवें जग शोधून काढण्याचा ध्यास लागला होता ना? तसा या लेकुरवाळ्या जाडजूड बाईलाहि एकच छंद जडला आहे—कांहींहि करून एकदा तरी पडद्यावर चमकायचें!

हीं दोन्हीं उदाहरणे क्षणार्धात डोळ्यांपुढें येऊन गेल्यामुळे मी सुमतीकडे मिस्किलपणाने पाहूं लागलों. चटकन् एक गोष्ट माझ्या लक्षात आली. सुमति उषेची बालमैत्रीण. म्हणजे तिचें वय आज तीसबत्तीस तरी असलें पाहिजे. पण ती एखाद्या अठरा-वीस वर्षांच्या मुलीसारखी दिसत होती. तिच्या या सडपातळ बांध्यामुळेंच तर नटी म्हणून तिच्याकडे एखाद्या कंपनीचें लक्ष वेधलें नसेल ना?

मी निरखून पाहत आहें असें वाटतांच सुमति हंसून म्हणाली, "सिनेमाशीं माझा संबंध आलाय् खरा; पण तो नटी म्हणून नाहीं हं!"

"मग?" मीं आश्चर्याने विचारले.

ती किंचित् लाजली, हें पाहून साने म्हणाले, "अहो, या प्रथितयश लेखिका झाल्या आहेत आतां!"

मी कांहीं तरी थट्टा करीन असें वाटून कीं काय, सुमति घाईघाईनें म्हणाली, "तुम्हांला अगदीं शंभर वर्षं आयुष्य आहे असं मघाशी मीं म्हणालें ना, तें कांहीं नुसतं तोंडदेखलं बोलणं नव्हतं. या सिनेमाच्या गोष्टींनी

अगदीं भंडावून सोडलंय् पहा मला. कंपनीला गोष्ट तर लवकर हवीय्. मुख्य नटाखेरीज बाकीची जुळवाजुळवसुद्धां होत आली आहे. पण माझ्या मनांतला गोष्टीचा गोंधळ कांहीं अजून कमी होत नाहीं. आत्तां येतांना त्या गोष्टीचाच विचार करीत होतें मी. एकदम मला वाटलं— इतकं डोकं तापवून घेण्यापेक्षां आजच्या आज कोल्हापूरला तुमच्याकडं जावं. उषाताई फार दिवस बोलवतेय्. तेव्हा तिलाहि बरं वाटेल–नि आपलंहि काम होईल. 'तीर्थ तोंडात नि स्वार्थ पदरांत असं दुहेरी काम साधेल!' "

लगेच डॉक्टरांच्याकडे वळून ती म्हणाली, " शाळा आहे हं मला आज डॉक्टर! आता तर अगदीं वेळेवर जायला हवं रोज. नाहीं तर सिनेमाशीं संबंध आल्याबरोबर बाईचं शाळेवरलं लक्ष उडून गेलं असं गांवभर—"

डॉक्टर उठलेले दिसताच वाक्य अर्धवट टाकूनच सुमतीहि उठली. सान्याच्या मागून कन्सल्टिंग रूममध्यें ती गेल्याबरोबर माझें एक मन दुसऱ्या मनाला तिच्याविषयीं नाहीं नाहीं ते प्रश्न विचारूं लागलें— सुमति तशी कांहीं आजारी दिसत नाहीं. मग ती सान्यांचें औषध कशाला घेते? तिचा बांधा विशींतल्या मुलीसारखा भासतो खरा, पण चेहऱ्यावर मात्र मुलींचा अल्लडपणा काहीं दिसत नाहीं. असें का व्हावें? माझी 'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्ट वाचून हिनें तावातावानें उषेला पत्र पाठविले होतें. पण आता हिने सिनेमासाठीं जी गोष्ट लिहिली आहे ती काय अगदीं सोवळीच असेल? पंढरीच्या वारीला जाणाऱ्या साठ वर्षाच्या जोडप्याची कथा थोडीच असणार आहे ती? तिच्याहि गोष्टींत थोडें प्रेम-बिम कांहीं असेलच कीं नाहीं? नाकानें कांदे सोलणारीं माणसें तोंडानें मासळी खातात याचा नवा नमुना आपल्याला आता पाहायला मिळणार म्हणायचा!

साशंक झालेल्या मनाचे प्रश्न महाभारतातल्या यक्षप्रश्नापेक्षांहि अधिक अवघड असतात. सुमतीविषयींच्या माझ्या सर्व प्रश्नांचें समाधान साने तरी करूं शकतील कीं काय या विचारांत मी होतों. इतक्यांत तीच बाहेर आली.

माझ्याजवळ येतांच ती म्हणाली, " अविनाश आतां शाळेंत जातो ना?"

" हो, नि शाळेंतून पळूनसुद्धां येतो."

" म्हणजे ?"

" त्याच्या शाळेत प्रार्थना असते. एकदां प्रार्थनेच्या वेळीं मास्तरांनीं डोळे मिटले. लगेच स्वारीनें जो पोबारा केला—"

सुमति मनापासून हंसली. मींहि तिच्या हंसण्याला साथ दिली. लहान मुलें हे दुरावलेल्या मनांना जोडणारे दुवे असतात, या उक्तीची खात्री पटली मला.

" नि मंदा काय करते ?" सुमतीनें पुढें विचारलें.

" मलमाच्या सद्र्याचा हट्ट धरून बसते !"

" मलमाचा सद्रा ! हें काय प्रकरण आहे बाई ?"

" मुलं झाल्याशिवाय असल्या शब्दांचा अर्थ कळत नाहीं कुणाला !"

मी हे वाक्य सहज बोलून गेलों खरा; पण लहान मुलाला खेळवतां खेळवतां त्याच्या अंगावरल्या एखाद्या फोडाला न कळत धक्का लागला कीं तें जसें किंचाळतें, तसा कांहीं तरी भाव सुमतीच्या मुद्रेवर उमटून गेला. तिशी उलटलेल्या एका अविवाहित स्त्रीच्यापुढें हें वाक्य आपण उच्चारायला नको होतें, याची मलाहि जाणीव झाली. पण आतां तिचा काय उपयोग होता ? गोफणीनें खेळता खेळता जवळच्या माणसाला दगड मारावा, तसें झालें होतें हे.

मात्र माझ्या पुढल्याच वाक्यानें अभ्रें आलेलें आभाळ एकदम निवळलें. मीं म्हटलें, " मंदाचा मलमाचा सद्रा म्हणजे मलमलीचा सद्रा !"

सुमतीला कांहीं केल्या हंसूं आवरेना. ती हसत हंसत म्हणाली, " निराळाच शब्दकोश आहे म्हणायचा हा !"

" तें काहीं विचारूं नका. मुलांचं सारं जगच निराळं असतं. शाळेंत वर नंबर ठेवला पाहिजे म्हणून अवीला परवां सांगितलं मीं. लगेच त्यानं विचारलं, ' वर म्हणजे कुठं ? आभाळांत ?' एकदां स्वारी राजाराम कॉलेज-मध्यें माझ्याबरोबर व्याख्यानाला आली होती. एका प्रोफेसरानीं गमतीनं त्याला विचारलं, ' तुला घरीं पाळायला काय हवं ? ससा कीं हरिण ?' अवीनं ताडकन् उत्तर दिलं ' हत्ती हवा मला !' "

साऱ्यांनीं औषधाची बाटली सुमतीच्या हातांत आणून दिली नसती तर

माझें हें अवि-मंदाचे पुराण आणखी किती लांबलें असतें कुणाला ठाऊक! बाटली तिच्या हातांत देतांना साने म्हणाले, "होतां होईल तों जाग्रण करूं नका!"

"पण लाइफमध्यें एकदांच येणारा चान्स आहे हा डॉक्टर!"

लगेच माझ्याकडे वळून सुमति म्हणाली, "अग बाई! विसरलेच होते मी! माझ्याकडे चहाला केव्हां येणार तुम्ही?"

"या खेपेला फार घाईत आहे मी."

"कितीहि घाई असली तरी लग्नघाई खास नाहीं. तेव्हा एक तासभर तरी—आलां नाहीत तर उषाताईला असं रागाचं पत्र पाठवीन—"

नाहीं म्हणायचे जिवावर आले माझ्या. शिवाय सुमतीने लिहिलेली ती सिनेमाची गोष्ट ऐकण्याची तीव्र इच्छा माझ्या मनांत उत्पन्न झालीच होती.

तिनें दिलेलें स्वतःच्या पत्त्याचें छोटें कार्ड खिशांत ठेवीत मी तिला पोचवायला दरवाज्यापर्यंत गेलों.

तिनें विचारले, "केव्हा येतां? आज संध्याकाळीं सहा वाजतां?"

"सहा वाजतां व्याख्यान आहे माझं. आठ ते साडेआठपर्यंत येतों. मुंबईत काहीं चहाला काळवेळ लागत नाहीं!"

तिला नमस्कार करून मी परत आंत आलों.

साने माझ्याकडे हंसत म्हणाले, "हिची नि तुमची इतकी ओळख असेल ही कल्पना नव्हती मला. मोठी इंटरेस्टिंग केस आहे ही!"

"काय होतंय् हिला?"

"तसं सांगायचं तर कांहींच होत नाहीं. पण लढाईत प्रत्यक्ष जखम झाली नाहीं तरी मनुष्य गळून जातो ना? तशी झाली आहे तिची स्थिति!"

डॉक्टरांच्या या अलंकारिक भाषणाचा अर्थच मला कळेना! मी आश्चर्यानं विचारलें, "गरीब बिचारी मास्तरीण! लढाई कसली करणार ही कपाळाची?"

"अगदीं चुकताय् तुम्ही. बारा वर्षं ही लढत आली आहे!"

"बारा वर्षं! नि कुणाशीं?"

"निसर्गाशीं!"

"म्हणजे?"

डॉक्टरांनीं टेबलाच्या खणांतून एक कात्रण काढलें नि तें माझ्या हातांत देत ते म्हणाले, "हिची अगदीं अलीकडची गोष्ट आहे ही. ही वाचून पाहा नि मग—"

मी घाईघाईनें वाचूं लागलों. गोष्टीचें नांव 'विकास' होतें. लेखकाचें नांव मात्र कुठेंच दिलें नव्हतें. सुमति निनांवी लेखन करीत असावी हें आतां माझ्या लक्षांत आलें. मी वाचूं लागलों—

## विकास

झुलुझुलु पाणी वाहूं लागले. एखाद्या गायकानें आपल्या कंठांतून बाहेर पडणाऱ्या मधुर स्वरांत गुंग होऊन जावें, त्याप्रमाणें त्या झुलुझुलु आवाजानें पर्वतराजाची समाधि लागली.

पण त्याची ही समाधि फार वेळ टिकली नाहीं.

मांडीवरल्या मुलीच्या पायांतल्या वाळ्यांची छुमछुम त्याला प्रथम ऐकूं येत होती. पण थोड्या वेळानें त्याला वाटलें—कुठें तरी नर्तिकेचें नृत्य चाललेले आहे. आपणांला जो आवाज ऐकूं येत आहे तो तिच्या पायांतल्या पैंजणांचा !

पर्वतानें डोळे उघडून पाहिलें.

झुलुझुलु वाहणारे पाणी खळखळ करीत दूर चाललें होतें.

पर्वतानें नदीला हांक मारली, 'मुली—'

नदीनें वळून मागें पाहिले. तो लाटांचा फेस नव्हता, तिचे हास्य होते.

पर्वतानें विचारले, 'कुठं चाललीस ?'

'दूर दूर !'

'मला सोडून ?'

'हो ! इथं राहून माझ्या जीवनाचा विकास व्हायचा नाहीं !'

× × ×

नदी वेगानें धांवूं लागली.

तिचें पात्र पदोपदीं मोठें होऊं लागलें.

कुणी तिची पूजा करूं लागले.

कुणी चांदण्यांत नौकाविहार करूं लागले.

नदी अभिमानानें पुढें धांवूं लागली.

धांवतां धांवतां तिला दुरून पाण्याचा खळखळाट ऐकूं येऊं लागला. तिनें कांठावरल्या झाडांना विचारलें, ' कोण गातंय् ?'

वृक्ष उत्तरले, ' महानदी. तूं आतां या महानदीला मिळशील.'

नदी जागच्या जागीं थांबून रागानें उद्गारली, ' दुसऱ्या नदीला मिळून माझ्या जीवनाचा विकास व्हायचा नाहीं.'

झाडावरलीं पांखरें किलबिललीं, ' महानदींतून तूं समुद्राला जाऊन मिळशील !'

नदी नाक मुरडून उद्गारली, ' समुद्र ! खाऱ्या पाण्याचं तें मोठं डबकं ! नि त्याला जाऊन मी मिळणार ? छीः ! तिथं माझ्या जीवनाचा विकास होणार नाहीं !'

× × ×

एक मोठें वळण घेऊन नदी दुसऱ्याच दिशेनें वाहूं लागली.

किती रुक्ष प्रदेश होता तो ! जणूं कांहीं हिरवा रंग जगांत आहे हें त्याला ठाऊकच नव्हतें.

नदीचा खळखळाट ऐकताच हजारों लोक तिच्या कांठावर धांवत आले.

कांहीं म्हणत होते, ' देव पावला !'

कांहीं कुजबुजत होते, ' हिचे कालवे काढले कीं, या फत्तरांनासुद्धां फुलं येतील !'

कालव्याच्या कामाला सुरवात होतांच नदी खवळली. ती रागावून म्हणाली, ' अशानं माझ्या जीवनाचा विकास कसा होईल ? तिकडं तुमचीं शेतं पिकतील, पण इकडं माझं पात्र कोरडं होईल ना ?'

× × ×

तिकडे महानदी, तिच्या पलीकडे समुद्र; इकडे हे कालवे काढणारे शेतकरी !

या सर्वांना चुकवून नदी धांवूं लागली.

पण आतां तिची गति मंद झाली होती.

तिनें पुढें पाहिलें—एक भलें मोठें वाळवंट पसरलें होतें. तिनें उजवीकडे पाहिलें—डावीकडे पाहिलें—कसले तरी वादळ सुरू झाले होतें. सपाट जागीं भराभर वाळूच्या टेकड्या उठत होत्या.

कुणी तरी चेटकीण हें सारें करीत आहे असें तिला वाटलें. ती ओरडून म्हणाली, 'मला दुसरं कांहीं नकोय्! मला माझा विकास हवाय्!'

दाही दिशा विकट हास्य करीत आहेत असा तिला भास झाला. पण तें राक्षसाचें हास्य नव्हतें; वाळूच्या प्रचंड वावटळी होत्या.

आजकाल त्या रखरखणाऱ्या वाळवंटांतून प्रवास करणाऱ्या लोकांना एक अगदीं लहान असा झरा दिसतो. त्या झऱ्याच्या आजू-बाजूला उगवलेली हिरवळ पाहून त्यांना मोठा आनंद होतो. त्या लुसलुशीत हिरवळीला कुरवाळल्याखेरीज एकहि प्रवासी पुढें जात नाहीं. हिरवळाच्या मृदु स्पर्शानें त्याच्या मुद्रेवर आनंदाच्या छटा चमकूं लागल्या कीं, त्या चिमुकल्या झऱ्यांत लहान लहान तरंग उठतात आणि हंसत हंसत एकच शब्द गुणगुणूं लागतात—' विकास!'

सुमतीची गोष्ट मी वाचून संपवली असेल नसेल इतक्यांत दवाखान्यांत दोन-तीन माणसें आलीं. माझ्या मनांत आलें—आणखी पांच मिनिटांनीं हे लोक आले असते तर? पण मांजरापेक्षां माणसंच जगात अधिक आडवीं येतात! काय करणार त्याला?

त्या अपरिचित रोग्यांवरला माझा हा राग अगदीं अस्थानीं होता याची मला दुसऱ्याच क्षणीं जाणीव झाली. माझें मलाच हंसूं आलें.

मनुष्यप्राणी किती स्वार्थी आहे! सुमतीच्या आयुष्याचे रहस्य जाणून घेण्याची उत्कंठा मला लागली होती. नि तेवढ्यासाठीं डॉक्टर सान्यांच्याकडे येणाऱ्या रोग्यांनीं थोडें उशीरां यायला हवें होतें अशी इच्छा मी करीत होतों. त्या रोग्यांपैकीं कुणाला बरोबर दहा वाजतां कचेरींत जायचें असेल,

कुणाला घरीं अंथरुणावर खिळलेल्या बायकोला औषध देऊन नि मुलांचें जेवण करून पुन्हां कामधंद्याला बाहेर पडायचें असेल—जगांत प्रत्येकाची आपापल्यापरी अडचण असते. पण या गोष्टीची दखल घ्यायला माझें मन तयारच नव्हतें.

डॉ. साने पहिल्या रोग्याची विचारपूस करताहेत इतक्यांत आणखी दोन-तीन माणसें आत आलीं. आतां आपण चंबूगवाळे आवरलेंच पाहिजे अशी माझी खात्री झाली. मी जायला निघालों असें पाहतांच डॉ. साने म्हणाले, "रात्रीं केव्हा भेटाल?"

"आठ वाजतां सुमतीकडे जायचंय् मला."

"मग? दहा वाजतां?"

"हं!"

"जमलं तर एखाद्या चांगल्या इंग्रजी चित्राला जाऊं."

"बराय्."

तसें पाहिलें तर कुठलेहि चित्र पाहण्याची उत्सुकता मला मुळींच नव्हती. पण डॉ. सान्यांची गाठ पडल्यावर सुमतीची संपूर्ण हकीगत ऐकायला मिळेल या आशेनेच मी त्यांच्या म्हणण्याला होकार दिला.

सारा दिवस राहून राहून मी सुमतीच्या त्या रूपक-कथेचा विचार करीत होतों. स्वप्नावरून रोगाचें निदान करण्याची पद्धत मला ऐकून ठाऊक होती. पण गोष्टीवरून लेखकाच्या रोगाची परीक्षा करण्याची ही सान्यांची पद्धत मोठी अजब वाटली मला!

मी एकसारखा विचार करीत होतों. या रूपक-कथेंतील नदी म्हणजे स्वतः सुमति हे सान्यांच्या बोलण्यावरून उघड होत होतें. ही नदी महानदीला मिळायला तयार होत नाहीं याचा अर्थ काय? सुमतीनें एखाद्या तरुणाच्या प्रेमाचा केलेला धिक्कार कीं वैवाहिक जीवनाविषयींची तिची उदासीनता? कथेंतली नदी समुद्र खारट म्हणून त्याचा तिरस्कार करते. सुमतीच्या प्रणय-जीवनात असा कुठला प्रसंग घडला असेल? एखाद्या गरीब विद्वानानें घातलेल्या मागणीला तिनें वाटाण्याच्या अक्षता दिल्या असतील, कीं—

नि शेवटीं ती नदी वाळवंटांत गुप्त होते. तिच्या विशाल प्रवाहाचा अगदीं लहानसा भाग मात्र एका झऱ्याच्या रूपानें वाहत राहतो. आपल्या आजू-

बाजूला उगवलेली हिरवळ पाहून वाटसरूंना आनंद झाला, कीं त्या झऱ्यांत लहान लहान तरंग उठतात आणि हंसत हंसत एकच शब्द गुणगुणूं लागतात—"विकास!"

गोष्टीचा हा शेवटचा भाग म्हणजे सुमतीच्या सध्यांच्या आयुष्याचें प्रतिबिंब असेल का? तो झरा म्हणजे तिच्या एकलकोंड्या आयुष्यांतला उरलासुरला उत्साह, नि ती हिरवळ म्हणजे तिच्या शाळेंतल्या मुलींचें हास्य!

कल्पनेच्या विमानाची भ्रमंती कधींच थांबत नाहीं. अशा अनेक कल्पना मनांत येऊन गेल्यानंतर माझें मलाच वाटलें—साने डॉक्टर असल्यामुळें त्यांनीं एखाद्या कथेची अशी चिरफाड केली तर ती क्षम्य ठरेल. पण माझ्या-सारख्या लेखकानें तरी कलाकृतीकडे निराळ्या दृष्टीनें पाहायला हवें. कलाकृतींत कलावंताच्या आत्मचरित्राचे प्रतिबिंब असूं शकेल किंवा दुसऱ्याचा अनुभवहि असूं शकेल; मग उगीच हे कल्पनेचे फुगे फुगवत बसण्यात काय अर्थ आहे?

सुमतीचे पूर्वीचे आयुष्य—

तिला मीं पहिल्यादा पाहिली ती माझ्या लग्नांत उषेची बाळपणची मैत्रीण म्हणून. तेव्हांपासूनच्या साऱ्या गोष्टी मी आठवूं लागलों. त्या वेळीं सुद्धा ती आतांएवढीच दिसे. मात्र आज सकाळीं तिच्या मुद्रेवर सुकलेल्या फुलाचा जो उदासपणा दिसला, त्याची छटासुद्धां त्या वेळीं मला आढळली नव्हती. तेव्हां तिचे डोळे उमलत्या कमळाप्रमाणे दिसत होते, तिच्या मुद्रेवर प्रातःकालची प्रसन्नता हंसत होती नि ती...इकडून तिकडे जाऊं लागली, कीं पाहणाऱ्याला वीज लवलवल्याचा भास होत होता.

इंटरच्या का ज्यूनिअरच्या वर्गांत होती ती त्या वेळीं. लग्नाच्या दोन-तीन दिवसांत तिनें उषेची तर भरपूर थट्टा केलीच, पण एकदोन वेळा माझ्यावरहि तो प्रयोग करून पाहिला तिनें. लग्नाच्या गोंधळांत माझ्या एका मित्राच्या खिशातली दहा रुपयाची नोट नाहींशी झाली. ती शोधशोधून तो कंटाळला! शेवटीं मीं त्याला म्हटले, 'अरे बाबा, गप्प बैस आतां. लग्न हें एक युद्ध आहे. त्यांत थोडीफार फुटाफूट व्हायचीच! दहाच रुपये गेले, वीस गेले नाहींत याचा आनंद मान! हवं तर सत्यनारायण कर!'

त्याच वेळीं कांहीं तरी कामाकरितां सुमति आमच्या बिऱ्हाडी आली

होती. माझें हें बोलणें ऐकून ती मोठ्यानें म्हणाली, 'लढाईंत शत्रु कोण नि मित्र कोण हें कळेनास होतं ना? तसंच झालं असावं हे. तुमच्याकडच्या कुणी तरी माणसानं आमच्याकडल्या माणसाचा कोट समजून यांच्या खिशांत हात घातला असावा!'

त्या वेळीं आम्हां दोघांचा निरोप घेतांना तिनें मला बजावलें होतें, 'उषाताईला दोन वर्षांत विदुषी करायला हवी तुम्हीं.'

पुढें दोन-तीन वर्षांनी ती पुण्यांत भेटली, तेव्हां उषेच्या विद्वत्तेंत कांहींच फरक पडला नाहीं असे पाहून तिनें मला टोमणा मारला होता, 'लग्न ही बायकांच्या पायांतली बेडी आहे हेच खरं. कैदी तुरुंगांत काम करतात नि बायका तें घरात करतात; एवढाच काय तो फरक.'

तिच्या या बोलण्यांतला कडवटपणा मला त्या वेळीं चांगलाच जाणवला. पण तिच्या पुस्तकी कल्पनांचे खंडन करण्याचा मात्र मी मुळींच प्रयत्न केला नाहीं. उद्यां लग्न झाल्यावर संसाराला विद्वत्तेपेक्षां इतर गोष्टीच अधिक लागतात हें आपोआप या पोरीला कळून येईल, असें मनांत म्हणत मी गप्प बसलों.

पुढें दोन-तीन वेळां ती आम्हांला पुण्याला भेटली उषा तिला कोकणांत येण्याचा वारवार आग्रह करी, नि प्रत्येक वेळीं 'पुढल्या वर्षी नक्की येतें हं.' असें आश्वासन ती देई. पण तिचे आमच्याकडे येणें कधींच घडलें नाहीं. त्यामुळें तिच्या आयुष्यांतल्या कुठल्याहि स्थित्यंतराची उषेलासुद्धां कल्पना येणें शक्य नव्हतें. मग माझी गोष्ट दूरच राहिली.

अविनाशचें बारसें पुण्यालाच झालें. त्या दिवशीं सुमति मोठ्या हौसेनें आली होती. पण उषेनें तिच्या मांडीवर अवीला ठेवतांच त्याची मान कांहीं तिला सभाळतां येईना. त्या वेळीं ती घाबरून उषेला म्हणाली, 'तुझं रत्न तूंच घे बाई. मी चाळीस मुलींचा वर्ग चालवून दाखवीन; पण असलं एक मूल सभाळणं कांहीं व्हायचं नाहीं आपल्या हातून!'

मग त्या दोन मैत्रिणींच्या लहानपणच्या आठवणी सुरू झाल्या. त्यांतली एक मी अजूनहि विसरलों नाहीं.

लहानपणीं या दोघी मैत्रिणी घराशेजारच्या देवळात जाऊन खेळत असत. एकदां त्यांची खेळांतली बाहुली आजारी पडली. उषेनें ती मांडीवर

घेतली; पण तिला मांडी नीट हलवून बाहुलीला झोंपवितां येईना. तेव्हां सुमतीनें रागावून तिच्या मांडीवरील बाहुली उचलून आपल्या मांडीवर घेतली नि कुठें तरी ऐकलेलें एक गाणें म्हणत आणि मांडी खालींवर करीत तिला हळूहळू झोपविली.

ही आठवण काढून त्या वेळीं दोघी मनमुराद हंसल्या. पण माझ्या मनात मात्र निराळेच विचार उद्भवले—'कालाय तस्मै नमः' या वचनाचे अनेक अर्थ होतात हें त्या क्षणीं मला पटलें. लहानपणीं निर्जीव बाहुलीवर प्रेम करणाऱ्या सुमतीला मोठेपणीं एक बाळजीव पांचदहा मिनिटें मांडीवर घेऊन खेळविणे जड जावें ही घटना खरोखरीच आश्चर्यकारक नव्हती का ?

पुढें आम्ही कोल्हापूरला आलों तेव्हां सुमति पुण्याची शाळा सोडून मुंबईला गेल्याचें आम्हांला कळलें. ती आतां लग्न करणार नाहीं हें उघडच दिसत होते. मात्र तिचा नि उषेचा मधून मधून पत्रव्यवहार होत असला तरी या नाजुक गोष्टीसंबंधानें दोघींनींहि मुग्धताच स्वीकारली होती.

आठवणींचा हा पाठशिवणीचा खेळ मनांत सुरू होतांच सुमतीचें रहस्य जाणून घेण्याची माझी इच्छा अधिकच बळावली. पण तिची माझी भेट रात्रीं आठ वाजतां होणार होती; नि साने तर त्यानंतर माझ्याकडे दहाच्या सुमाराला येणार होते. तिथपर्यंत तर्ककुतर्क करीत बसण्यापलीकडे मला कांहीं करतां येण्याजोगें नव्हतें! स्वैपाकघरांतून खमंग वास आल्यामुळें आशाळभूतपणानें मुलानें तिकडे जावें; पण आईनें दाराला आंतून कडी लावून घेतलेली असावी! अगदीं तस्सा विरस झाला माझ्या जिज्ञासेचा.

× ×

बरोबर आठ वाजतां मीं सुमतीचें बिऱ्हाड गांठले. चौपाटीजवळच्या एका इमारतींत तिसऱ्या मजल्यावर राहत होती ती. पाळण्यांतून झटकन् वर जावें म्हणून मीं तिकडे वळलों. पण त्याची प्रकृति नादुरुस्त झालेली दिसली!

पण मला सुमतीचें रहस्य जाणून घ्यायचें होतें.

मीं भराभर पायऱ्या चढत गेलों. वाळूवरून लहान मुले घसरत येतात ना? तेवढ्या चपळतेने मीं तिसरा मजला गांठला.

उजवीकडे वळतांच दारावर लटकणाऱ्या पितळेच्या पाटीकडे मीं पाहिलें. सुमतीचें नांव तिथें चमकत होतें, पण—मी सर्दच झालों. दारांत सुमति माझ्या स्वागताला सज्ज असण्याऐवजीं—

दाराला एक कुलूप लटकत होतें !

मी येणार आहे हें ती विसरली असेल ?

छेः ! ते शक्यच वाटेना मला.

मग ?

सुमतीवर चांगलाच चिडलों मीं मनात ! जिना उतरण्याकरितां रागारागानें मीं वळलो देखील. इतक्यांत एक सहा-सात वर्षांची, पाठीवर दोन चिमुकले शेपटे सोडलेली, काळसर पण हुशार मुलगी शेजारच्या बिऱ्हाडांतून धांवत पुढें आली नि माझ्याकडे पाहत म्हणाली, " तुम्हींच कां खाडेकर-काका ?"

जन्मांत न पाहिलेल्या या पुतणीला मीं मान हलवून होकारार्थी उत्तर दिलें.

खार जशी झाडावर चटते तशी टुणकन् उडी मारून ती आपल्या बिऱ्हाडात गेली. लगेच धावत येऊन माझ्या हातांत एक किल्ली देत ती म्हणाली, " सुमतिबाईंनीं बसायला सांगितलंय् तुम्हाला."

कुलूप काढता काढता मीं तिला विचारलें, " कुठं गेल्या आहेत त्या ?"

अगदीं रंगात येऊन हातवारे करीत ती उत्तरली, " मोटारींत बसून गेल्या आहेत. सिनेमा लिहिताहेत त्या. आता आम्हाला खूप खूप सिनेमे फुकट पाहायला मिळणार आहेत. तुम्हांलासुद्धा सुमाताई नेतील हं." तिच्या त्या बोलण्याचे कौतुक करीतच मीं खोलीचें दार उघडले.

लगेच आंत येऊन बोटानें वर दाखवीत ती म्हणाली, " इथलं बटन दाबा, म्हणजे दिवा लागेल."

दिव्याचा प्रकाश एकदम खोलींत पसरला. समोरच महात्माजींची दांडी-यात्रेला निघालेली कृश वीरमूर्ति दिसली. सुमतीच्या भावनेचें मीं मनातल्या मनांत कौतुक करणार, इतक्यांत महात्माजींच्या फोटोच्या पलीकडेच कुणातरी तरुणीचा फोटो लटकत असलेला दिसला.

मीं पुढें होऊन निरखून पाहिलें. मर्ना लॉय मिस्किलपणानें माझ्याकडे पाहून हंसत होती ! हे दोन फोटो जवळ जवळ लावणाऱ्या सुमतीच्या स्वभावाचा

मला थांगच लागेना! माझ्या मनांत आलें—वैराग्य आणि विलास हीं माणसाच्या मनात किती जवळ जवळ राहतात!

मीं दुसरीकडे लावलेलीं चित्रें पाहूं लागलों—एका चित्रांत पिसारा उभारून नृत्य करणारा सुंदर मोर माझें स्वागत करीत होता. पण त्याच्या जवळच्याच चित्रांत आपला विकाळ जबडा उघडून एक सिंह उभा होता; त्याच्याकडे पाहतांना हे चित्र आहे याची जाणीव असूनहि माझें मन क्षणमात्र कंपित झाल्यावांचून राहिलें नाहीं.

निसर्गाच्या दृश्यांतहि असाच विरोध केला होता. एका चित्रांतला मोठा गुलाब जणूं कांहीं एखाद्या गुटगुटीत बालकासारखा खिदळत आहे असा भास होत होता; पण त्याच्या जवळचेंच ते दुसरें चित्र बर्फानें सारी जमीन आच्छादून टाकली आहे नि मध्येंच एक निष्पर्ण झाड एखाद्या वृद्ध मनुष्याप्रमाणे जीव मुठींत धरून कसंबसें उभे आहे असें दृश्य होतें तें!

माझ्या मनाचा विलक्षण गोंधळ उडाला. पण माझ्याबरोबरची ती चिमुरडी मुलगी माझ्या मदतीला धांवून आली.

ती पोरगी सांगूं लागली, "सुमाताईंचा पोपट किती छान छान बोलत होता! मला कशी गोड गोड हांक मारायचा!"

कोपऱ्यांतल्या रिकाम्या पिंजऱ्याकडे माझी दृष्टि गेली.

मीं माझ्या छोट्या मैत्रिणीला विचारलें, "सुमाताईंचा पोपट कशानं मेला?"

भुंवया उंचावीत ती उत्तरली, "तो मेला नाहीं. सुमाताईंनीं पिंजऱ्यांतून सोडून दिला त्याला एके दिवशीं."

मी मनांत म्हणत होतों—पाळलेल्या पोपटाला सुमतीनें सोडून कां द्यावें? त्याच्या कोंडमाऱ्यांत तिला आपलं प्रतिबिंब दिसूं लागलं होतं कीं काय?

पिंजऱ्यापलीकडल्या त्या दोन वस्तु—दिलरुबा नि चरका!

सुमतीचें आयुष्य हें एक विलक्षण कोडें आहे अशी माझी खात्री झाली.

मीं माझ्या बालमैत्रिणीला मुद्दामच विचारलें, "सुमाताईंची तुझ्यावर फार माया आहे ना?"

मोठ्या अभिमानानें मान डोलवीत ती उत्तरली, "मला खूप खूप चॉकोलेट आणून देतात त्या!"

मी कांहीं तरी बोलणार इतक्यांत इकडे तिकडे पाहून नि स्वर खालवून ती म्हणाली, "पण एखाद्या दिवशीं खोलींत पाऊलसुद्धां टाकूं देत नाहींत त्या मला. कुण्णाशीं बोलत नाहींत! कडी लावून एकट्याच बसतात नि—"

जिन्यावर कुणाचींशीं पावलें वाजलीं. एखादें पांखरूं भुर्रकन् उडून जावें तशी ती छोकरी खोलींतून हा-हा म्हणतां अदृश्य झाली.

सुमतीचा आवाज स्पष्टपणानें ऐकूं येऊं लागला, "इतकी कांहीं नाजुक नाहीं मी!"

सुमतीच्या मागोमाग एक पोकळ हास्य ऐकूं आले. मीं दाराकडे पाहिलें—एक सुटाबुटांतला बुटका इसम सुमतीच्याबरोबर खोलींत आला. त्याला मीं तत्काळ ओळखले.—सिनेमा सृष्टींतला त्रिंबकजी डेंगळे होता तो! पांच वर्षांत डोअर-कीपरचा मॅनेजर झालेल्या या मनुष्याचें चरित्र अजून कुठल्याहि मासिकांत कसें प्रसिद्ध झालें नाहीं याचें मला नेहमींच आश्चर्य वाटत असे.

मला पाहतांच सुमति म्हणाली, "एक्स्क्यूज हं, भाऊराव. हे अचानक बोलवायला आले साडेसात वाजतां. मीं जाणारच नव्हतें; पण हे कंपनीचे मॅनेजर आले नि—"

त्रिंबकजी बोलूं लागले, "आमच्याकडे तशा चार-पांच नायिका पडून आहेत पण याच्या गोष्टीची नायिका यांनींच पसंत केली पाहिजे असं शेटजींचं म्हणणं आहे. म्हणून एक सुंदर गाणारी बाई दाखवायला घेऊन गेलों होतों यांना. पण—

त्रिंबकजींना सुमतीने पुढे बोलूंच दिलें नाहीं. ती मध्येंच म्हणाली,

"काय पण बाई शोधून काढलीत! मुलखाची छटेल दिसते मेली! माझ्या गोष्टीची नायिका धुतल्या तादळासारखी निर्मळ आहे. हा निर्मळपणा जिच्या दृष्टींतून प्रगट होईल—"

आतां त्रिंबकजींनीं तिला पुढें बोलूं दिलें नाहीं. ते म्हणाले, "मग ही भूमिका तुम्हांलाच करावी लागेल, सुमतिदेवी."

"कांहीं तरीच बोलतां!" अशा अर्थानें सुमतीनें मान वेळावली खरी; पण

तिच्या मुद्रेवरून या सूचनेनें तिला गुदगुल्या झाल्या असाव्या असें दिसत होतें.

सुमति पडद्याआड आंतल्या खोलींत गेली. लगेच स्टोव्हचा आवाज ऐकूं येऊं लागला. मी मॅनेजरमहाशयांची बडबड ऐकत स्वस्थ बसलों. 'सुमति-देवीसारखी कथालेखिका अख्ख्या दुनियेंत आढळणार नाहीं, त्या सिनेमांत येतील तर दोन वर्षांत मलबार हिलवरला एखादा बंगला खरेदी करतील,' वगैरे मुक्ताफळें आंत असलेल्या सुमतीला ऐकूं जातील इतक्या जोरानें तो उधळीत होता.

मात्र त्याच्या बोलण्यांतून सुमति सिनेमाची कथालेखिका कशी झाली या गोष्टीचा उलगडा झाला मला! या कंपनीचे मालक होते एक गुजराथी गृहस्थ. त्या शेटजींची मुलगी सुमतीच्याच शाळेंत शिकत होती. घरीं शिकवणीला सुमतिबाईच हवी, असा त्या मुलीनें बापापाशीं हट्ट धरला. सुमति शेटजींच्या मोटारींतून त्यांच्या घरी जाऊं लागली. तिला सिनेमा पाहण्याचा फार नाद आहे, मधून मधून ती गोष्टीहि लिहिते, हें शेटजींना लवकरच कळलें. धंद्याच्या दृष्टीनें त्यांना कांहीं तरी स्टंट हवाच होता! कथालेखिका म्हणून एका बाईचं नांव मिळालं तर त्याची खूप जाहिरात करतां येईल, या कल्पनेनें त्यांनीं सुमतीला गोष्ट लिहिण्याचा फार आग्रह केला. नाहीं नाहीं म्हणत तिनें जी गोष्ट लिहिली ती त्याना पसंत पडली. फक्त एकाच बाबतींत शेटजींचें नि तिचें अजून एकमत होत नव्हतें. सुमतीच्या कथेंत नायिका विवाहित नायकावर प्रेम करते, एका विलक्षण योगायोगामुळें त्या दोघांना एकाच खोलींत एक रात्र काढावी लागते आणि या गोष्टीचा फायदा घेऊन नायिकेचे हितशत्रु तिला जगातून उठविण्याचा प्रयत्न करतात, असा भाग होता. तीं दोघें एकाच खोलींत रात्र काढीत असलीं तरी तीं एकमेकांना स्पर्शसुद्धां करीत नाहींत, असें सुमतीनें दाखविलें होतें. पण शेटजींना हें मान्य नव्हतें. लोकांचा संशय दृढ व्हावा म्हणून नायकाच्या अंथरुणांत नायिकेच्या डोक्यांतील गुलाबाचें फूल किंवा आंकडा पडलेला दाखवावा, तो आंकडा सकाळीं नोकराला सांपडावा नि मग नायिकेविषयीं संशय पसरत जावा, अशी कथानकाची गुंफण त्यांना हवी होती. सुमतीचा याला तीव्र विरोध होता. तिच्या नायिकेचं नायकावरलें प्रेम केवळ मानसिक असल्यामुळें, शेटजींना हवा

असलेला बदल लोकप्रिय होण्यासारखा असला तरी, तो करायला ती तयार नव्हती. नायिकेच्या पवित्र प्रेमावरच कथानकाचा उठाव अवलंबून असल्यामुळें ती नायकाच्या अंथरुणापाशीं जाते किंवा त्याला स्पर्श करते, असें दाखविण्याने कथेचा आत्माच नाहींसा होतो असें तिचें म्हणणें होतें.

हें सारें सांगून त्रिंबकजी मला म्हणाले, "हें पाहा, भाऊसाहेब, सुमतिदेवी तुमचं खास ऐकतील. तेव्हां त्यांची गोष्ट वाचून त्यांना सांगा कीं त्या नायिकेला नायकाच्या अंथरुणावर जाऊन बसूं दे थोडा वेळ. त्याला एकदम फिट आली नि म्हणून ती त्याच्याजवळ गेली असं दाखवलं तरी चालेल; पण—"

त्रिंबकजी डोअरकीपरचे मॅनेजर झाले तसे लवकरच मॅनेजरचे कथालेखकहि होणार, असे मला त्याच्या या बोलण्यावरून वाटूं लागलें.

माझें मन मात्र सुमतीच्या कथानकांतल्या वादग्रस्त प्रसंगापेक्षां एका निराळ्याच गोष्टीचा विचार करूं लागलें. मानसिक प्रेम—पवित्र प्रेम. यत्किंचित्‌हि शारीरिक आकर्षण नसलेलें प्रेम—सुमतीला या काव्यमय कल्पनेविषयीं इतका मोह का वाटावा ? आतां तिची तिशी उलटून गेली आहे. एवढ्या वयात कोणत्याहि पुरुषाचें तिला कधीं आकर्षण वाटलेंच नाहीं, कीं आपलें या बाबतींतलें अपयश लपवून ठेवण्याकरितां ती आत्मवंचना करीत आहे ?

डॉक्टर सान्यांचे सकाळचे शब्द मला आठवले—'लढाई! लढाईत प्रत्यक्ष जखमा झाल्या नाहींत तरी मनुष्य गळून जातोच ना ?'

सुमति ट्रे घेऊन बाहेर आल्यामुळें माझें विचारचक्र जागच्या जागीं थांबलें. चहा घेतां घेतां ती मला म्हणाली, "आजचा चहा तुम्हांला फार महाग पडणार आहे!"

मी हंसत हंसत उत्तरलों, "काहीं हरकत नाहीं. बायकोच्या मैत्रिणीचा आहे हा चहा. तेव्हां हिशेबानं वागून कांहीं निभाव लागणार नाहीं इथं!"

मी हें बोलून गेलों खरा; पण मला जें बोलायचें होतें तें हें नव्हतें. मला म्हणायचें होतें–'तुमचं लग्न ठरलं असतं तर पांच-पन्नास रुपयांचा अहेर आम्हांला करावा लागलाच असता कीं! त्यापेक्षां तर हा चहा महाग पडणार नाहीं ना ?'

चहाचे घोट घेतां घेतां मध्येंच सुमति उठली. टेबलावरून एक जाडजूड
। सुंदर नोटबुक उचलून ते माझ्या हातांत देत ती म्हणाली, "नोटबुकाच्या
|कारावरून घाबरून जाऊं नका हं! हें सारं भारूड वाचण्याची शिक्षा कांहीं
तुम्हांला देत नाहीं. ही खूण घातली आहे ना? तिथं माझ्या सिनेमाच्या
ष्टीचा साराश आहे. तेवढा वाचा नि उद्या संध्याकाळीं—"

"उद्या संध्याकाळीं मला सवड नाहीं. चार-पाच मित्र येणार
ाहेत माझ्याकडे."

"येईनात बिचारे! फोनवरनं दोन मिनिटं तुम्ही माझ्याशीं बोलाल कीं
ाहीं? फक्त एकच शंका विचारायचीय् मला. तुमच्या फोनचा नंबर
द्या, म्हणजे—"

त्रिंबकजींनीं डोळ्यानें मला खुणावलें. पण तें लक्षांतच आलें नाहीं असें
ाखवीत मीं एका चिठ्ठीवर फोनचा नंबर टिपून ती सुमतीला दिली.

चहा होताच सुमति म्हणाली, "शेटजींच्याकडं जाऊन नायिकेच्या
ाबतींत आतांच्या आता काहीं तरी नक्की ठरवायचंय्. तेंव्हा—एक्स्क्यूज
. नि हे पाहा, भाऊराव—परवां दिवशीं सकाळीं मुहूर्ताला यायला हवं
म्हीं. बाकी तुम्हांला काहीं आग्रह करायला नको म्हणा. तुमच्या
ायकोच्या मैत्रिणीचंच चित्र आहे. तेंव्हां—"

घाईघाईनें आरशापुढं जाऊन ती केशभूषा करूं लागली. पण लगेच मागं
ळून ती म्हणाली, "परवा मुहूर्ताला केंव्हा जायचं ते उद्यां फोनवरनं
ांगेनच तुम्हांला!"

नवें खेळणें मिळालें कीं लहान मुलाला जो आनंद होतो तो तिच्या
ोमरोमांत नाचत होता. चित्रपटसृष्टि ही मयसभा आहे हे कटुसत्य सांगून
तेचा विरस करणें अगदीं जिवावर आलें माझ्या! मी सहज उठून इकडे-
तेकडे पाहूं लागलों. मधला पडदा दूर करून आंतल्या खोलींतहि डोकावून
ाहिले मीं. चांगली प्रशस्त होती ती! मीं तिला विचारलें, "भाडं काय
ेतां तुम्हीं?"

"तीस!"

"एकट्याच राहतां एवढ्या जागेत?"

"दुसरं माणूस आणायचं कुठून?" तिनें हंसत उत्तर देण्याचा प्रयत्न केला.

पण बोलतां बोलतां तिच्या हातांतलें पावडरीचे फूल खालीं गळून पडलें. मीं निरखून पाहिलें—तिचा हात थरथर कापत होता.

घरीं येऊन घाईघाईनें मीं जेवलों नि सुमतीचें नोटबुक उघडलें. तिची खूण खूप पुढें होती. पण त्या सिनेमाच्या गोष्टीखेरीज आणखी काय काय तिनें लिहिलें आहे हें पाहण्याची मला इच्छा होतीच कीं!

लहान-मोठ्या रूपककथा होत्या त्या. मला सकाळच्या तिच्या त्या नदीच्या गोष्टीची आठवण झाली. सान्यांची त्या गोष्टीवरली मल्लीनाथीहि आठवली. सुमतीच्या मागच्या आयुष्यावर या कथांनी कदाचित् प्रकाश पडेल असें मला वाटूं लागलें. मीं भराभर एकेक गोष्ट वाचायला सुरुवात केली.

पहिल्या गोष्टीचें नांव होतें 'मेघमाला!'

अनेक चातक त्या मेघमालेंतल्या जलबिंदूंकडे उत्कंठेनें पाहत असतात. पण ती त्या सर्वांचा धिक्कार करते आणि त्यांना सांगते—"माझा जन्म तापलेल्या धरणीला शांत करण्याकरितां आहे, तिला फुलविण्याकरितां आहे. तुमच्यासारख्या क्षुद्र पांखरांच्या क्षणिक सुखाकरितां नाहीं."

गोष्ट वाचून होताच मी विचार करूं लागलों. स्त्रीचें जीवन पुरुषाच्या क्षणिक सुखाकरितां नाहीं; तें समाजसेवेसारख्या उच्च ध्येयाकरितां आहे, अशा कल्पना सुमतीच्या मनांत घोळत होत्या, तेव्हांची तर ही गोष्ट नसेल ना?

मीं गोष्टीच्या खालची तारीख पाहिली: १ जून १९३३.

आठ वर्षांपूर्वी ही गोष्ट सुमतीनें लिहिली होती. आणि आज सकाळीं मीं वाचलेली ती नदीची गोष्ट? 'तिची ही अगदीं अलीकडची गोष्ट आहे' असें डॉक्टर म्हणाले होते. माझ्या मनांत आलें – मृगजळामागें धांवणाऱ्या हरिणीसारखी तर सुमतीची स्थिति झाली नसेल ना? ऐन विशींत मनुष्याची छापील पुस्तकांवर नि त्यांतल्या उच्च उच्च तत्त्वांवर विलक्षण अंधश्रद्धा असते. जगांत जीवन हें एकच विश्वसनीय पुस्तक आहे याची त्याला त्या वेळीं जाणीवहि असत नाहीं. असावी तरी कुठून? हे पुस्तक नेहमींच अप्रकाशित असतें.

मधलीं काहीं पानें सोडून मीं सुमतीची एक गोष्ट वाचूं लागलों. खालीं

लेखनकाल १७ मार्च १९३६ हा दिला होता. या गोष्टीचे नांव होतें 'कमलिनी !'

या कमलिनीकडे भृंग येतो. तिलाहि तो आवडतो. ती त्याला आपल्या अंतःकरणात जागा देते. पण 'आपल्या रसाला मात्र स्पर्श करायचा नाहीं' म्हणून त्याला निक्षून सांगते. भृंगाला वाटते – आज ना उद्यां कमलिनीला आपली दया येईल, ती आपला रस चाखूं देईल; पण कमलिनी आपला हट्ट सोडीत नाहीं. शेवटीं भृंग कंटाळून तिला सोडून निघून जातो. कमलिनी मनाशीं म्हणते, 'पुरुषांची जातच लबाड !'

नदीच्या स्वच्छ पाण्यांत अगदीं तळाशीं पडलेली वस्तूसुद्धां स्पष्ट दिसते ना ? अगदीं तस्सें या गोष्टींत सुमतीच्या जीवनाचें प्रतिबिंब मला दिसूं लागलें ! कुणा तरी तरुणावर तिचे प्रेम बसलें असावे. परिचय वाढत गेल्या-नंतर त्या तरुणानें हस्तस्पर्शाची किंबहुना चुंबनाचीहि अपेक्षा केली असावी नि मानसिक प्रेम, पवित्र प्रेम, इत्यादि कल्पनांच्या जाळ्यांत गुरफटलेल्या या वेड्या पोरीनें त्याची निराशा केली असावी !

मी मधलीं दहा बारा पानें सोडून १९३८ मधली एक गोष्ट वाचूं लागलों. रूपक-कथा नव्हती ती. पण—

'वनभोजन' हें गोष्टीचें नांव !

'शाळेंतल्या कांहीं मुली आपल्या आवडत्या मास्तरणीच्या बरोबर वन-भोजनाला जातात. मुली झाडावर चढतात, विहिरींत पोहतात, फुगड्या खेळतात नि शेवटीं जेवायला बसल्यावर चार दिवस उपाशी असल्याप्रमाणें खाऊं लागतात.

मास्तरीणबाईचा घांस मात्र हातातच रेंगाळत राहतो. तिला समोरच्या झाडावर बसलेले एक पक्ष्यांचें जोडपें दिसतें. चोंचींत चोंच घालून तें क्रीडा करीत असते.

तिच्या डोळ्यापुढें नुकताच पाहिलेला एका झोंपडीतला शेतकऱ्याचा संसार उभा राहतो. वीतभर जागा, पांच-दहा मडकीं नि चार-दोन रकटीं—हेंच काय तें त्या झोपडींतले वैभव. पण नवरा मोट सोडून झोंपडींत भाकरी खायला येतो तेव्हां दारांत त्याची कारभारीण एक उघडे-नागडें मूल घेऊन

उभी असते. नवरा त्या मुलाचा मुका घेण्याकरिता म्हणून पुढें होतो नि एकदम आपल्या कारभारणीचाच—

तिची ती लाज—तिचा तो आनंद—

मास्तरीणबाईचा घांस हातांतून गळून खालीं पडतो!'

ही गोष्ट सुमतीला स्वतःच्या आयुष्यावरूनच सुचली असावी यांत शंकाच नव्हती.

पुढच्या गोष्टीविषयींचें कुतूहल माझ्या मनात अनावर झालें. पण मी ती वाचू लागणार इतक्यांत दारावरची घंटा वाजली.

मीं जाऊन दार उघडलें. डॉ. साने आले होते. सुमतीच्या गोष्टी वाचता वाचता ते चित्रपटाला जाण्याकरितां आपल्याकडे येणार आहेत ही गोष्ट मी अजिबात विसरून गेलों होतो.

आंत येताच डॉक्टर म्हणाले, "आजच्या सगळया चित्रपटाची चौकशी केली मीं. पण मला हवं होतं तें चित्र कुठंच नाहीं!"

"कुठलं चित्र?" मी उत्सुकतेनें विचारलें.

"'No Flesh, No Spirit.' तें पहिल्यादा लागलं तेव्हां इथं फारसं आवडलं नाहीं कुणाला. गल्लाभरू असं कांहींच नव्हतं त्यांत. पण त्याचं कथानक मात्र इतकं हृदयंगम होतं – कोल्हापूरला येईल तेव्हा तें अवश्य पहा हं."

खुर्चीवर बसून डॉक्टरानीं सिगारेट पेटविली, दोन-तीन धूम्रवलयें निर्माण केलीं नि मग ते म्हणाले, "दुसऱ्या कुठल्या तरी चित्राला जाऊं या का?"

"हं." मीं म्हटलें.

"मग कपडे करा ना. दहा होत आले."

"तें चित्र आपण इथंच पाहिलं तर?"

"म्हणजे?"

सुमतीच्या नोटबुकाकडे बोट दाखवीत मीं म्हटले, "सुमतीच्या रूपककथा वाचीत होतों मी आत्तां. तुम्ही म्हणालांत तशी इंटरेस्टिंग केस आहे खरी ही. तिची सारी हकीगत सांगा ना मला."

× × ×

डॉक्टरांनीं शांतपणानें हातांतली सिगारेट संपविली. मग क्षणभर माझ्याकडे रोखून पाहत ते म्हणाले, " एक अट आहे हं मात्र माझी !"

" कुठली ?"

" मी सांगतोंय् त्या गोष्टीवर कादंबरी-बिदंबरी लिहायची नाहीं. प्रोफेशनल सीक्रेट सांगणार आहें मी तुम्हांला."

मीं होकारार्थी मान हलविली.

डॉक्टर समोरच्या कॅलेंडरकडे पाहात बोलूं लागले—

" सुमति माझ्या दवाखान्यांत प्रथम आली त्याला सात-आठ महिने तरी सहज झाले असतील. मी रोगांचा मानसिक दृष्टीनंहि विचार करतो असं तिला कुणीं तरी सांगितलं होतं. म्हणून मुद्दाम माझा सल्ला घेण्याकरितां ती आली. तिला पहिल्यांदां तपासली तेव्हां मी स्वतःच गोंधळून गेलो. छातीची धडधड नि हातापायांच्या तळव्यांना येणारा घाम यांच्याखेरीज विकृतीचं कुठलंच लक्षण मला दिसेना ! पण या दोन्ही गोष्टी अगदीं साध्या आहेत. डॉक्टर तपाशीत आहे या कल्पनेनसुद्धां हीं लक्षणं अनेकांना होतात. त्यांतून सुमति तर तरुण स्त्री होती. ती नर्व्हस् नसेलच म्हणून कुणीं सांगावं ? तिचा विश्वास संपादन केल्याखेरीज मला विकृतीचं निदान करणं अगदीं अशक्य होतं.

तिला चित्रपट फार आवडतात असं कळताच एक-दोनदा मी तिला घेऊन चित्रपट पहायला गेलो. इंग्रजी चित्रपटांतल्या चुंबनाच्या प्रसंगीं ती एकदम आपले ओठ आवळून घेते एवढं माझ्या लक्षात आलं. पण असल्या बाबतींत 'ता' वरून ताकभाताचा तर्क करणं धोक्याचं असतं. मी तिला नेहमीं संध्याकाळीं येऊन औषध घेऊन जायची सूचना केली. मधून मधून दवाखान्यांत दुसरं कुणी नसलं म्हणजे ती माझ्याशीं मोकळेपणानं बोलत बसे. त्या बोलण्यांत वाटेल ते विषय येत—गांधीवाद, ज्योतिष, सेक्स नि टॉमटॉमधले व्हिटॅमिन्ससुद्धां !"

आपल्या या विनोदावर खूष होऊन डॉक्टर स्वतःच हंसले; अर्थात् मीहि हंसलो. मात्र मी एक शब्दसुद्धा बोललो नाहीं. नुकता कुठें कथानकाला रंग भरूं लागला होता त्याचा भंग करण्यांत काय अर्थ होता ?

डॉक्टर पुढे सांगूं लागले—" एके दिवशीं आत्महत्येवरलं एका मानस-

शास्त्रज्ञाचं पुस्तक माझ्या टेबलावर मीं मुद्दाम ठेवलं; तिनं तें सहज उचलून पाहिलं. आमचं दोघाचं आत्महत्येविषयीं बोलणं सुरू झालं. मीं मुद्दामच म्हटलं, 'आत्महत्या ही एक वेडाची लहर आहे!' तिनं उत्तर दिलं, 'मुळींच नाहीं. शहाण्या सुरत्या माणसांच्या मनांतसुद्धां आत्महत्येचे विचार कधीं कधीं येतात.' हे शब्द तोंडांतून गेल्यावर आपण गप्प बसायला हवं होतं हा भाव तिच्या मुद्रेवर उमटला. जणूं कांहीं तो मला दिसलाच नाहीं असं दर्शवीत मी पुढें बोलूं लागलों. बोलतां बोलतां आपल्या स्वतःच्या मनांत मध्यें आत्महत्येचे विचार घोळत होते हें तिला कबूल करावंच लागलं.

हे विचार तिच्या मनांत येण्याचं कारण मी शोधूं लागलों. पैशाच्या दृष्टीनं ती सुखी होती. घरची तर कसलीच काळजी नव्हती तिला. तीन मिळवते भाऊ असलेल्या बहिणीवर घराचा कसला भार पडणार?

राहून राहून माझ्या मनांत एकच गोष्ट येऊं लागली. हिचा प्रेमभंग झाला असावा! पण ते तिला विचारायचं कसं? 'तुम्हांला कांहीं विचित्र स्वप्नं वगैरे पडतात का?' असं मीं एक-दोनदा तिला विचारलं; पण तिनं त्या प्रश्नाचं उत्तर देण्याची टाळाटाळच केली. तिला लिहिण्याचा नाद आहे हें माझ्या लक्षांत आलं, तेव्हा एका नवीन पद्धतीनं मीं तिच्या विकृतीचं निदान करावयाचं ठरवलं. अभिजात लेखकालासुद्धां आपल्या आवडीनिवडी नि सुखदुःखं बाजूला ठेवून अनेकदा लेखन करता येत नाहीं. त्या दृष्टीनं मी सुमतीच्या गोष्टी वाचूं लागलो. हळूहळू माझी खात्री झाली कीं, ही मुलगी अकारण निसर्गाविरुद्ध लढत आली आहे. मीं तिला सरळ लग्न करण्याचा सल्ला दिला. त्यामुळें कांहीं दिवस माझ्यावर मोठा घुस्सा झाला होता तिचा! पण शेवटीं माझं निदान बरोबर आहे हें तिला कबूल करावंच लागलं.

एकदा तापानं आजारी असतांना मी मुद्दाम तिच्या समाचाराला गेलों. भावनाशील माणसं आजारांत अधिक बडबडीं होतात. गोष्टीवरून गोष्टी निघाल्या नि तिचं सारं पूर्व आयुष्य मला कळून चुकलं.

तिची पूजा करावी कीं कींव करावी हेंच मला कळेना!"

पाणी पिण्याकरितां डॉक्टर मध्येंच उठले. मला मात्र चित्रपटाचें मध्यंतर अगदीं योग्य वेळीं करणाऱ्या लेखकासारखें त्यांचें हें गोष्ट सांगण्याचं कौशल्य वाटलें.

पाणी पिऊन डॉक्टर बोलूं लागले—

"शरीराच्या दृष्टीनं ती आतांपर्यंत पवित्र आहे यांत शंकाच नाहीं. पण हे पावित्र्य राखण्याकरितां तिनं आपली सर्व मानसिक शक्ति खर्च केली आहे.

आतांपर्यंत तिच्यावर तीन पुरुषानीं प्रेम केलं आहे. त्यांतल्या दोघांवर तिचंहि प्रेम होतं. पण त्यांतलं कुठलंच प्रेम सफल होऊं शकलं नाहीं.

प्रीतीनं तिच्या आयुष्यांत प्रथम प्रवेश केला ती कॉलेजांत असतांना. कुठल्याहि विद्यार्थ्याचं तिला आकर्षण वाटत नव्हतं. पण ती ज्यूनियरला असतांना कॉलेजातल्या संमेलनाच्या नाटकात मुलींनीं काम करायचं ठरलं. सुमतीनं हौसेनें पुढाकार घेतला. नायिकेच्या कामाकरितां तिचीच निवड झाली. त्याचं नाटक बसविण्याकरितां एक प्रख्यात नट आला होता. त्याचं रूप आणि गोड आवाज यांची तिच्यावर मोहिनी पडली. लहानपणापासून तिला गाण्याचा नाद होताच. त्यामुळं या आकर्षणांत भर पडली.

आयत्या वेळीं नाटकांत नायकाचं काम करणारा विद्यार्थी आजारी पडला. नि नाटक बसविण्याकरितां आलेल्या त्या नटालाच तें काम करावं लागलं. त्याच्याबरोबर काम करतांना सुमतीला विलक्षण आनंद झाला. नायक नायिकेला लग्नाचं वचन देतो असा एक प्रसंग होता त्या नाटकांत! त्या वेळच्या सुमतीच्या अभिनयाला सर्वांच्या टाळ्या पडल्या. सुमतीनं त्या वेळीं जो भाव दर्शविला होता तो केवळ अभिनय नव्हता. तिला आवडणाऱ्या त्या नटाच्या हस्तस्पर्शानं तिच्या हृदयवीणेंतून मधुर संगीत उमटूं लागलं होतं."

प्रेमाचा विषय आला कीं डॉक्टरसुद्धां कवि होतो, हे शब्द माझ्या अगदीं जिभेवर आले होते. पण डॉक्टरांच्या कथाप्रवाहाला खंड पडूं नये म्हणून मीं ते आंतल्या आंत गिळले.

माझ्याकडे पाहून स्मित करीत डॉक्टर म्हणाले, "तो परत जायला निघाला तेव्हां सुमतीनं त्याची एकांतात गाठ घेतली. तिच्या उत्कट प्रेमाची त्याला कल्पना आली. विरहाच्या प्रेमानं वेडावून जाऊन त्यानं तिचं चुंबन घेतलं.

अशा वेळीं नाटकांत किंवा चित्रपटांत हटकून कुणी तरी तिसरं आंत येतं. सुमतीच्या बाबतींत तसं कांहींच घडलं नाहीं. पण तिचा निरोप घेऊन

निघून गेल्यावर त्या नटानं तिला पत्रावर पत्रं पाठवायला सुरुवात केली. त्याच्या प्रत्येक पत्रांत त्या चुंबनाचा हटकून उल्लेख असे.

सुमतीनं तीं पत्रं जपून ठेवलीं. योगायोगानं तीं तिच्या चुलत्याच्या हाताला लागलीं नि मग — मग हिंदु कुटुंबांत काय होतं ते सांगायलाच नको. भिकारड्या नटावर प्रेम केल्याबद्दल तिच्या घरांतल्या सर्व माणसांनीं तिला बोचून खाल्लं. तो एखादा आय. सी. एस्. असता तर झाल्या गेल्या गोष्टीत त्यांना कांहीं वावगं वाटलं नसतं!

तिच्या चुलत्यांनीं त्या नटाला एक भयंकर पत्र लिहिलं नि त्याच्या खालीं सक्तीनं सुमतीची सही घेतली.

त्याला विसरून जाणं सुमतीला पहिल्यादा फार कठीण गेलं. पण समाजसेवेच उच्च ध्येय पुढं ठेवून ती अभ्यास करूं लागली नि एम्. ए. ला पहिल्या वर्गांत आली.

पुढं पुण्याला मास्तरीण झाल्यावर तिला एक निराळाच अनुभव आला. तिच्या शाळेंत येणाऱ्या एका श्रीमंत मुलीच्या घरीं ती जाऊं येऊं लागली. ती मुलगी मातृहीन होती. थोडा परिचय होतांच तिच्या पोक्त वडिलांनीं सरळ सुमतीला मागणी घातली.

प्रीतीचा एक कटु अनुभव तिनं आधींच घेतला होता. या दुसऱ्या अनुभवानं तर तिला शिसारीच आणली. प्रीति ही मानवी जीवनांतली विकृति आहे अशा दृष्टीनं ती प्रेमाकडे पाहूं लागली. उच्च ध्येय, समाजसेवा, जीवनाच्या उदात्त कल्पना, ही भाषा दोन-तीन वर्षं तिच्या जिभेवर एकसारखी नाचत होती.

पण—

माणसाला मरण चुकवतां येत नाहीं, असं म्हणतात. प्रेमाच्या बाबतींतहि ते तितकंच खरं आहे. मृत्यूला चुकवण्याकरितां परीक्षितीनं खूप प्रयत्न केले; पण बोरांतल्या अळीचं रूप घेऊन मृत्यूनं त्याला शेवटीं गांठलंच! प्रीति ही तशीच आहे. माणूस सप्तपाताळांत लपून बसला तरी त्याला ती शोधून काढते.

या नियमाला सुमति तरी कुठून अपवाद होणार? तिचे एक सहकारी शिक्षक चांगले रसिक होते. ही आपल्या रूपक-कथा त्यांना दाखवूं लागली. त्यांनीं

सुचविलेल्या सुधारणा तिलासुद्धां मान्य कराव्या लागत. या निमित्तानं दोघांचा स्नेह वाढत गेला. त्या गृहस्थाचं लग्न झालं होतं. एक-दोन मुलंहि होतीं त्याला! त्यामुळं सुमतीला व त्याला एकमेकांच्या सहवासांत निर्वेध काळ काढणं शक्य नव्हतं! पण मराठी वाङ्मयाचा सविस्तर इतिहास लिहिण्याची स्फूर्ति त्याला एकदम झाली. सुमतीलाहि ती कल्पना पसंत पडली. स्वतंत्र खोली घेऊन काम करायला सुरुवात केली त्यांनीं. रात्रीं अकरा अकरा वाजेपर्यंत तीं दोघं तिथं बसत. लोकांना आधींच कुटाळकीची हौस असते. त्यांत अविवाहित तरुणी विवाहित पुरुषाबरोबर रात्रीं अकरा अकरा वाजेपर्यंत एकांतांत बसूं लागल्यावर मग काय? रॉकेलच्या कारखान्याला आग लागावी तसं झालं.

सुमतीनं लोकांकडे कधींच लक्ष दिलं नाहीं. पण कांहीं दिवसांनीं तिला एक गोष्ट कळून चुकली. ती म्हणजे, मराठी वाङ्मयाचा इतिहास मास्तरांच्या सहवासापेक्षां अधिक रुक्ष आहे ही! आपलं प्रेम नुसतं मानसिक राहावं म्हणून ती खूप धडपडली. ती नियमानं विवेकानंदांचे ग्रंथ वाचूं लागली. तो मास्तरहि सज्जन असल्यामुळं बरेच दिवस साध्या दर्शनसुखावरच त्यानं समाधान मानलं. पण एके दिवशी घरांत त्यांचं नि बायकोचं भांडण झालं. त्या मनःस्थितींत त्यानं मर्यादेचा थोडासा अतिक्रम केला. सुमति एकदम संतापली. पुन्हा त्याचं तोंड पाहायचं नाहीं, अशी प्रतिज्ञा करून तिनं नोकरीचा राजीनामा दिला."

सुमति पुण्याची चांगली नोकरी सोडून मध्येच मुंबईला कां आली, हें कोडें आतां मला उलगडलें. मीं डॉक्टराना उत्सुकतेनें विचारलें, "ती इथं आल्यावर मग पुढं काय झालं?"

"दुसरं काय होणार? कांहीं दिवस चरखा घेऊन सूत काढलंन् तिनं. कांहीं दिवस दिलरुबा वाजविण्यांत गेले. पण शेवटीं मनुष्याच्या मनाचं संगीत चरख्यांत नाही नि दिलरुब्यांतहि नाहीं, तें प्रेमांत आहे, हें तिला कळून चुकलं. शाळेंत ती लोकप्रिय झाली. पण शाळेचं काम म्हणजे उंसाचा चरक, ही पुण्याला अंधुकशी तिच्या मनांत येणारी कल्पना हळूहळू बळावतच गेली.

पुढं तिला फिट्स येऊं लागल्या. त्या कमी झाल्यावर प्रकृति पूर्ववत् व्हावी म्हणून ती माझा सल्ला घ्यायला आली !"

"नि तुम्ही तिला सिनेमाची गोष्ट लिहायचा सल्ला दिलांत. छान ! रोग्याला औषध द्यायचं कीं त्याला अपथ्य करायला सांगायचं ?"

"खरं सांगू तुम्हांला, भाऊराव ! सुमति विलक्षण हुशार आहे. तिची इच्छाशक्ति नि कर्तृत्वशक्ति या दोन्हींना प्रकट व्हायला योग्य क्षेत्रच मिळालेलं नाहीं. एखाद्या बुद्धिमान् मनुष्याचा संसार करूनसुद्धां चांगली समाज-सेवा केली असती तिनं. पण लग्नाचा विचार आता तिला पटतच नाहीं. नि तिच्या बुद्धीच्या नि भावनांच्या शक्तीला गुंतवून ठेवणारं उदात्त असं कांहीं तिच्या आयुष्यांत आलेलं नाही ! तेव्हा तिच्या लेखनाला प्रोत्साहन देण्याचं मीं ठरविलं. माझ्या आग्रहामुळच ती आपल्या कथा छापायला लागली. कुणी ना कुणी गोष्ट आवडल्याचं सांगितलं, कीं तिला फार आनंद होतो. दोन-दोन दिवस त्या नादांत गुंगत राहते ती. सिनेमाच्या गोष्टीचा तर टॉनिक-सारखा उपयोग झाला तिला. त्या कामाला लागल्यापासनं आपण आजारी आहों हें विसरूनच गेली आहे ती !"

× × ×

दुसरे दिवशीं संध्याकाळीं फोनवरून सुमति माझ्याशी बोलायला लागली तेव्हा तिच्या स्वरांत इतका उत्साह नि आनंद भरला होता, कीं डॉक्टरांचे रात्रीचे शब्द माझ्या कानांत घुमूं लागले—'आपण आजारी आहों हें विसरूनच गेली ती !' माझ्या मनांत आलें–पण हा विसर कृत्रिम आहे, क्षणभंगुर आहे. संसारांतल्या जोडीदाराच्या सहवासांत, मुलांविषयींच्या वात्सल्यांत किंवा एखाद्या ध्येयाच्या पूजनांत माणसाला जो विसर पडतो तो—

सुमति मला पुढें विचार करूं द्यायला कुठें तयार होती ? ती फोनवरून म्हणत होती, "सकाळीं साडेआठला तयार राहा हं. साडेआठ म्हणजे साडेआठ ! कळलं का ? शेटजींचा फोन येईलच तुम्हांला. पण मी मुद्दाम बजावतेंय् ! नाहीं तर कांहीं तरी सबब सांगाल नि कुठं तरी पळून जाल !"

"मुहूर्त केव्हा आहे ?" मीं विचारलें.

"दहा अठराला."

" मग इतक्या लवकर कशाला जायचं तिथं ? "

" अय्या ! तुम्हांला सांगायचं विसरलें कीं !"

मीं ऐकूं लागलो.

" उद्यां मेकअप् आहे माझा !"

" मेकअप् ?"

फोनवरून माझ्या स्वरांतलें आश्चर्य तिला जाणवलें असावें.

ती हंसत हंसत म्हणाली, " इतकं नवलसं वाटलं तुम्हांला ? सुशिक्षित स्त्रियानीं ही करीअर आतां घ्यायलाच हवी. नाहीं का ?"

मीं मनात म्हटलें—या विषयावर दोन तास व्याख्यान देण्याइतकी माझी तयारी आहे. पण—विनाकारण फोनला त्रास देण्यांत कांहीं मतलब नाहीं.

सुमति सांगत होती, " काल रात्रीं शेटजी म्हणाले, दुसरी चांगली नटी मिळत नाहीं तर तुम्हींच काम करा ! परवां अगदीं उत्तम मुहूर्त आहे. त्याचा आग्रह मला मोडवेना. दुसऱ्या कुणी तरी काम करून आपल्या गोष्टीचा विचका करण्यापेक्षा—अय्या ! एक गोष्ट विसरतच होतें कीं !"

गौरीहरापुढे बसलेल्या वधूच्या मनाचा जसा गोंधळ उडावा, तशी सुमतीची स्थिति झाली होती हे उघड दिसत होतें.

किंचित् थाबून तिनें विचारलें, " माझी सिनेमाची गोष्ट वाचलीत ना ?"

" हो."

" तिच्यातला तो खोलींतला प्रसंग—"

" हं."

" शेटजींना त्यात बदल हवा आहे. नायिकेच्या डोक्यांतला आंकडा नायकाच्या अंथरुणांत सांपडून संशयाला सुरुवात झाली तर फार बहार होईल, अस ते म्हणतात."

मीं म्हटलें, " पण आंकडा तिथं पडायला काहीं कारण हवं ना ? मात्र मलासुद्धां तुम्हीं लिहिलेला कांहीं भाग पटत नाहीं !"

" म्हणजे ?" सुमतीच्या स्वरांत आश्चर्य आणि भीति यांचें विचित्र मिश्रण झालें होतें.

" लहानपणापासून प्रेम असलेलीं दोन माणसं अनेक वर्षांनीं एकमकांना

भेटतात नि एकान्त असूनसुद्धां त्यांच्या मनांत चंचल विचार मुळींच येत नाहीं, ही अगदीं विचित्र गोष्ट आहे."

" बराय्. उद्यां समक्षच चर्चा करूं त्याची !"

मीं सहज प्रश्न केला, " नायिका तुम्हीं झालांत ? पण नायकाचं काम कोण करणार आहे ?"

" मोतीलाल, पृथ्वीराज, वगैरेंची चौकशी करीत होते शेटजी; पण चित्र मराठींत निघालंच पाहिजे, असा माझा हट्ट आहे. म्हणून दोन-तीन मराठी नटांशीं वाटाघाट सुरू केली आहे त्यांनीं. कुणी का नायक होईना ? मीं नायिका होणार हें अगदीं निश्चित !" बोलणें संपतांच तिनें जें हास्य केलें तें लहान मुलाच्या खिदळण्यासारखें वाटलें मला !

× × ×

माझ्या कानात घुमणारें तिचें ते हास्य दुसरे दिवशीं सकाळीं आठ वाजतां ती माझ्याकडे कंपनीच्या गाडींतून आली तेव्हां तिच्या मुद्रेवरहि चमकत होतें. छेः ! नुसतें चमकत नव्हते, अगदीं नाचत होते.

स्टूडिओच्या दारातच शेटजींनीं आमचें स्वागत केलें. मीं कल्पना केल्या-इतकें त्यांचे पोट मोठें नसल्यामुळे माझा त्यांच्या कर्तबगारीविषयीं बराच अनुकूल ग्रह झाला.

सुमति मोटारींतून उतरताच शेटजी हर्षानें तिला म्हणाले, " हे पहा सुमतिबेन, आपलं चित्र अगदीं फस्स क्लास होणार ! आज नायक कुणाला करायचं या काळजींत होतो आम्ही—पण काल संध्याकाळीं भगवान् गोपाळकृष्ण आमच्या मदतीला धांवून आला—रूबाब आहे, गळा आहे, सारं काही आहे या माणसाला. तुमच्या मराठी नाटकात चांगलं नांव कमावलं होतं म्हणे यानं !"

बोलतां बोलतां आम्ही शेटजींच्या कचेरीपाशीं आलो. व्हरांड्यांतल्या खुर्चीवर पाठमोरा बसलेला एक इसम आमची चाहूल लागतांच उठला. त्यानें सहज वळून पाहिलें.

या मनुष्याला आपण कुठें तरी पाहिले आहे अशी माझी खात्री झाली.

शेटजी सुमतीला म्हणत होते, " हे तुमचे जोडीदार बंडोपंत आपटे !"

मीं सुमतीकडे पाहिलें. ती एकदम निश्चल झाली होती नि वेड्याप्रमाणें बंडोपंताकडे पाहत होती.

मीं बंडोपंताकडे पाहिले. तोहि गोंधळून सुमतीकडे पाहत होता. डॉक्टरानीं सांगितलेल्या सुमतीच्या प्रणयजीवनाची मला एकदम आठवण झाली. तिच्या आयुष्यांतला तो नट म्हणजे हा बंडोपंतच असेल का ?

पण हा विचार करायला मला अवसरच मिळाला नाहीं.

सुमतीच्या हाताच्या मुठी एकदम घट्ट झाल्या. तिच्या नजरेंत विलक्षण शून्यता आली. तिला फिट येत होती. पुढल्याच क्षणीं तिचा तोल गेला. मीं तिला सावरून धरले म्हणून बरें; नाहीं तर—

शेटजी ‘ पाणी पाणी ’ म्हणून ओरडले !

## बंडू

## ९

सुमतीला भोवळ आली असावी अशा समजुतीनें शेटजींनीं पाणी मागविलें खरे, पण डोळ्यांना पाणी लावून शुद्धीवर येण्याइतका तिचा आजार साधा नाहीं याची मला कल्पना होती.

डॉक्टर सान्यांच्या बोलण्यांत तिला मध्ये फिट्स येत होत्या असे आलेंच होतें. त्या दिवशीं दवाखान्यात ' जाग्रणं-बिग्रणं करूं नका हं ' म्हणून त्यांनीं तिला बजावल्याचेंहि माझ्या लक्षांत होतें. शिवाय सिनेमाच्या गोष्टीच्या नादांत तिच्या हातून अतिरिक्त श्रम झाले असण्याचाहि संभव होता. त्यामुळेंच तिला ही फिट आली असावी असें मला वाटलें. नाजुक प्रकृति म्हणजे काय, तारेवरली कसरतच ! थोडेंसें अलीकडे पलीकडे झालें कीं तोल गेलाच म्हणून समजावें.

साध्या पाण्याने काम भागत नाहीं असे दिसताच शेटजींनीं शेजारच्या डॉक्टराना बोलावले. त्यांच्या प्रयत्नांना यश येऊन मध्यें सुमतीनें डोळे उघडले देखील ! पण डोळे उघडून पाहतां पाहतां बंडोपंताकडे तिची नजर वळली मात्र ! एखादी जखम एकदम उघडी व्हावी नि तिच्यांतून होणाऱ्या रक्तस्रावा-मुळे माणसाची शुद्धि जावी ! अगदीं तशी स्थिति झाली माझी !

डॉक्टरांनीं पुन्हां उपचार सुरू केले. शेटजी हळूच त्यांच्या कानाला

लागले. डॉक्टरांनीं त्यांना काय सांगितलें तें आम्हांला ऐकूं आलें नाहीं. पण रोग्याला त्रास होऊं नये म्हणून आम्हां सर्वांना पलीकडल्या खोलींत घेऊन जातां जातां ते उद्गारले, " ज्योतिषी कसला ? हजाम आहे लेकाचा !"

मराठींत अगदीं अस्सल वाक्प्रचार आत्मसात् करण्यांत शेटजींनीं प्रावीण्य संपादन केलें होतें यांत शंका नाहीं. पण त्यांच्या मराठीवरल्या प्रभुत्वाचें कौतुक करण्याची ही वेळ नव्हती.

मीं त्यांना विचारलें, " कुठल्या ज्योतिषानं हा मुहूर्त दिला तुम्हांला ?"

" परवां सट्टयाच्या वेळीं सांगितलंन् तें अगदीं अक्षर न् अक्षर खरं ठरलं, म्हणून तर सुमतिबेनची पत्रिका त्याला मुद्दाम नेऊन दाखवली नि मुहूर्त काढायला सांगितला. चार दिवस घोळ घालून दोनशें रुपये घेतले लेकानं. असा फस्स क्लास मुहूर्त पुन्हां पांचदहा वर्षांत मिळणार नाहीं असं छातीला हात लावून बोलला गाढव ! म्हणून तर मीं ही घाई केली ! गोष्ट तयार नव्हती—नायिका नव्हती—नायक नव्हता—कांहीं नव्हतं. पण मुहूर्त फुकट जाऊं नये म्हणून इतकी गडबड केली मीं ! हे बंडोपंत इथं आल्याचं रात्रीं आठला कळलं. रात्रीच्या रात्रीं त्यांना गांठलं. रात्रीं बारा वाजतां करारावर याची सही झाली—"

डॉक्टर आंत आल्यामुळें शेटजींना सिनेमापुराणांतल्या या नव्या अध्यायाची पोथी मध्येंच थांबवावी लागली.

शेटजींनीं विचारलें, " काय डॉक्टर, कांहीं होप आहे का ?"

डॉक्टर हंसत उत्तरले, " तशी काही सीरियस केस नाहीं. लवकरच शुद्धीवर येतील त्या. पण चार-आठ दिवस एखाद्या नर्सिंग-होममध्यें ठेवलें पाहिजे त्यांना. त्यांचे फॅमिली डॉक्टर कोण आहेत हे कळलं तर केस त्यांच्या हवालीं करून—"

मी मध्येच म्हणालो, " डॉक्टर साने."

डॉक्टर व शेटजी सान्यांना फोन करायला निघून गेले. खोलींत मी नि बंडोपंत—बंडोपंत कसला ? माझा बालमित्र बंडू आपटे—असे दोघेच उरलों.

क्षणभर बोलावें कीं बोलूं नये या विचारांत तो पडलेला दिसला.

पण शेवटीं मनाचा निश्चय करून तो म्हणाला, "मला ओळखलंत का, भाऊसाहेब?"

"तूं मला ओळखतोस कीं नाहीं या काळजींत पडलों होतो मी!" हंसत हंसत मी उत्तरलों.

एकवचनात काय विलक्षण जादू असते! त्याच्या मुद्रेवरला परकेपणा क्षणार्धात मावळला. तो मोकळेपणाने हंसत म्हणाला, "राजाला सारे लोक ओळखतात. पण राजा काहीं साऱ्या लोकांना—"

मीं त्याला मध्येंच थांबवून म्हटलें, "हे पाहा, बंडू, हा लोकशाहीचा काळ आहे. राजा नि रंक हे शब्द आता लवकरच जुने होतील. फार तर शब्दकोशात राहतील ते! तेव्हा—"

"तसं नाहीं, भाऊसाहेब!"

"माफ कर हं, बंडू! आणखी एक डोस पाजायचाय् मला तुला. माझं नांव भाऊ आहे. हें साहेबाचं शुक्रकाष्ठ माझ्या नांवापुढं हल्लीं लागलंय् खरं; पण तुझ्यासारख्या लहानपणच्या सोबत्यानं तरी तो अत्याचार माझ्यावर करूं नये अशी माझी इच्छा आहे."

"बरं बुवा!" असे उद्गार काढून तो कुठल्या तरी विचारात गढून गेला.

त्याच्याकडे पाहता पाहता 'मानवी जीवन ही अतर्क्य वळणें घेणारी नदी आहे' या उक्तीची मला आठवण झाली. सव्वीस-सत्तावीस वर्षांनीं आम्ही दोघे एकमेकांना भेटत होतो. नि ते कुठें? तर एका गुजराथी कंपनीच्या स्टूडिओंत!

माझें मन भूतकाळांत धावूं लागलें. मी नि बंडू शाळेत अगदीं एका बाकावर बसत होतों नि भर उन्हांतून हातात हात घालून क्रिकेट मॅच पाहायला सांगलीहून बुधगांवला जात होतों. इंग्रजी शाळेंतल्या आमच्या तालीम-मास्तरनीं 'जो कुणी तालीम चुकवील त्याची तंगडी धरून युनिव्हर्सिटींतून त्याला बाहेर काढीन' अशी एकदा आम्हां सर्वांना धमकी दिली होती. मधल्या सुटींत बंडू त्याच्या या धमकीची नक्कल इतकी हुबेहूब करी, कीं हंसतां हंसतां आमची मुरकुंडी वळे. साऱ्याच मास्तरांच्या नकला तो उत्तम करी. पण त्यांतल्या त्यांत तालीम-मास्तर, देवधरशास्त्री नि अळूरकर यांच्या त्याच्या नकला अगदीं बहारीच्या असत.

माझी नि त्याची विशेष दोस्ती होण्याचें कारण त्याचें पाठांतर नि गोड गळा! 'भारती जडा सुधींहि मंदधी बने,' 'सज्ज करुनि चाप मदन येत मागुनी,' इत्यादि पदांपासून 'होई विजयी तूं रंभे शुभांगे अनंग-रंग-ढंगे' ह्या पदापर्यंत साऱ्या नाटकांतील गाणीं त्याला तोंडपाठ येत असत. गाण्याचें अंग त्याला उपजतच होतें. त्यामुळें अभ्यास चांगला नसूनहि आमच्या कंपूला तो हवाहवासा वाटे.

एखाद्या मोहळांतून थेंब थेंब मध ठिबकावा, त्याप्रमाणें एक एक गोड आठवण माझ्या मनाला आपल्या हळुवारपणानें सुखवून जाऊं लागली.

मात्र, बंडू समोर गप्पच बसलेला दिसला मला! म्हणून मी त्याला म्हटलें, "बुधगावच्या वाटेवरलीं तीं सात चिंचांचीं झाडं आठवतात का तुला?"

त्यानें हंसत उत्तर दिलें, "न आठवायला काय झालं? एकदां मॅच संपल्यावर आपण रमत-गमत परत यायला लागलों होतों. तीं झाडं यायच्या आधींच काळोख पडला. थोड्या वेळानं त्या झाडावरनं आपण जाऊं लागलों. तेव्हा तूं म्हणालास, 'भुतासारखीं दिसताहेत हीं झाडं!' "

इतकीं वर्षं हें वाक्य बंडूच्या लक्षांत कसें राहिलें याचें मला आश्चर्य वाटलें.

क्षणभर थांबून एक सुस्कारा टाकीत बंडू म्हणाला, "ते दिवस कांहीं परत येणार नाहींत आतां; आपल्या वर्गातली त्या वेळची मंडळी किती हुशार होती! नाहीं? बुवा गोसावी–रामभाऊ जोशी–रघुनाथ बखले—"

तो मध्येच थांबला. त्या थांबण्यांत बोलण्यापेक्षांहि अधिक अर्थ होता. त्याची निराश दृष्टि म्हणत होती—"माझ्या वर्गातला बुवा गोसावी आज प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचा अध्यक्ष झाला आहे, रामभाऊ फर्ग्युसन कॉलेजात नामांकित प्रोफेसर आहे, रघुनाथ बखले भारतसेवक-समाजाचा सभासद म्हणून काम करीत आहे! नि मी मात्र—"

त्याला उदास करणारा हा विषय बदलण्याच्या दृष्टीनें मीं हंसत विचारलें, "या शेटजींचे आभार मानले पाहिजेत मला! कुठं सांपडलास तूं काल त्यांना?"

"चार-पाच दिवस झाले मला नागपूरहून येऊन. इथल्या कुठल्या तरी सिनेमा कंपनींत काम मिळतंय् का पाहत होतों. काल रात्रीं नशीब उघडलं असं वाटलं! पण—"

सिंधू आपटेची सारी हकीगत ठाऊक असूनहि मीं मुद्दाम प्रश्न केला, " तुझीं बायका-मुलं कुठं आहेत ?"

"देवाला ठाऊक !" तो हताशपणानें उद्गारला. नंतर आवंढा गिळून तो सांगूं लागला, " माझी पहिली बायको फार दिवस जगली नाहीं. एक कीट मागं ठेवून ती निघून गेली. आईवेगळया तान्ह्या मुलीची आबाळ होऊं नये म्हणून मीं त्या मुलीला आजोळीं ठेवली. तिथलाच लळा लागलाय् तिला. पुढं काही दिवसानीं दुसरं लग्न केलं मीं. एखाद्या विधवेला सुखी करावी म्हणून मुद्दाम पुनर्विवाह केला. पण ती बायको माझ्याशीं भांडून नुकतीच निघून गेली. दोन्ही मुलंहि तिच्या बरोबरच आहेत. कांहीं-कांहीं पाश नाहीं मला आता. सडाफटिंग आहे मी ! हवं तिथं राहावं, हवं तस वागावं—"

माझ्या मुद्रेवरून त्याचें हे शेवटलें बोलणें मला आवडले नाहीं हें त्याच्या लक्षांत आलें. तो म्हणाला, " हे पाहा, भाऊ, ज्याचं जळतं, त्यालाच कळतं. या दुसऱ्या बायकोला फुलासारखी वागवली मीं. पण त्याचं फळ मला काय मिळालं ? फुलाचा वास कुठंच नाहीं. त्याच्या काट्यांनीं काढलेलं रक्त मात्र—" मध्येच थांबून तो दुसरीकडे पाहूं लागला.

न कळत अभिनयपूर्वक तो बोलूं लागला होता. त्याचीं हीं शेवटचीं वाक्यं ऐकून मी मात्र गोंधळांत पडलों. सिंधू आपटेचं तें आत्मवृत्त खरं कीं आता बंडू माझ्यासारख्या बालमित्राला जें हृद्गत सांगत होता तें खरं ? तिची हकीगत वाचतांना तर तिचा दुसरा नवरा शुद्ध पशु असला पाहिजे अशी माझी समजूत झाली होती !

पण—

मीं बंडूकडे पाहिलें. लहानपणीं इतकाच तो आताहि सालस दिसत होता.

डॉ. सान्यांची चिठी घेऊन एक नोकर मला बोलवायला आल्यामुळें "पाच मिनिटात आलोंच हं !" असें बंडूला सागून मी बाहेर आलो.

सान्यांनीं मला एका बाजूला नेऊन विचारलें, "सुमतीबरोबरच तुम्ही इथं आलांत, कीं—"

" मला घेऊनच ती आली ना !"

"गाडींत ती तुमच्याशीं काय काय बोलत होती ?"

" दुसरं काय बोलणार ? तिच्या गोष्टीची चर्चा करीत होतों आम्ही."

" तिच्या गोष्टींवर तुम्हीं फार कडक टीका केलीत का ?"

" छेः ! उलट अवास्तव स्तुतिच केली मीं ! मात्र एका गोष्टीसंबंधानं तुमची चूक होतेय् असं मीं तिला पुनः पुन्हां बजावलं."

" कुठली गोष्ट ?"

" मानसिक प्रेमाविषयींची तिची कल्पना. स्त्रीपुरुषांच्या सुखांत मनाच्या मीलनाइतकाच शरीराच्या मीलनाचाहि भाग असतो हें—"

" हें ऐकून काहीं तिला शॉक बसणार नाहीं. माझ्या तोंडून हजारदां ही गोष्ट ऐकली असेल तिनं !"

डॉक्टर विचारांत पडलेले दिसले.

मीं मध्येंच म्हटलें, " मला दुसराच संशय येतोय् !"

" कसला ?"

" तिच्याबरोबर नायकाचं काम करायला शेटजींनीं जो नट आणला होता त्याला पाहून—"

साने अधीर दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागले.

" त्याची नि तिची पूर्वीची ओळख—किंबहुना प्रेम असावं !"

" कुठं आहे तो ?"

" पलीकडच्या खोलींत बसलाय् !"

" पण असल्या नाजुक गोष्टीविषयीं तो माझ्याशीं मोकळेपणानं बोलायला तयार कसा होईल ?"

" तो माझा बालमित्र आहे. शिवाय तुमचा एक रोगीहि आहे !"

" म्हणजे ?"

"त्याची बायको त्याला सोडून निघून गेली आहे. त्या सदूभाऊचीच बहीण आहे ती ! तेव्हां—"

सुमति शुद्धीवर आल्याचे कळल्यामुळें डॉक्टर लगबगीनें तिकडे गेले.

× × ×

डॉ. सान्यासारख्या परक्या मनुष्यापुढें आपल्या वैवाहिक जीवनाची कहाणी सांगायला बंडू पहिल्यांदां तयारच होईना ! मीं त्याच्याशीं खूप वाद घातला. केवळ अज्ञानामुळें संसारसुखाचा सत्यनाश झाल्याचे अनेक• दाखले

दिले, नि शेवटचा उपाय म्हणून त्याची बायको कोल्हापूरला असून या बाबतींत मला भेटली होती, असेंहि सांगितलें. तेव्हां कुठें डॉक्टरांना आपले रहस्य सांगायला तो तयार झाला.

सान्यानी सुमतीला नर्सिंग होममध्ये पाठविण्याची व्यवस्था केली. बंडूची सारी हकीकत त्यानीं शातपणाने ऐकणें जरूर होतें. त्या दृष्टीनें रात्रीचीच वेळ सोइस्कर असे ठरले.

× × ×

डॉ. साने, मी व बंडू रात्रीं नऊ वाजता मोटारींतून बाहेर पडलो. दूर कुठें तरी समुद्रावर जाऊन बसायचे ठरविलें होते आम्हीं.

ब्लॅक-आउटमुळें रात्र फार झाल्यासारखें भासत होते. आम्ही समुद्रावर पोंचलों तेव्हां ओहोटीमुळें वाळवंटाचा मोठा भाग उघडा पडलेला दिसत होता. आतांपर्यंत बंडू सान्यांच्याशीं एक शब्दसुद्धां बोलला नव्हता. त्यामुळें तो डॉक्टराच्याशीं मोकळेपणाने बोलेल कीं नाहीं याची मला शंकाच वाटूं लागली होती. त्यानें तोंडाला कुलूप घातले कीं माझा हा सारा खटाटोप फुकट जाणार होता.

पहिलीं पाच-दहा मिनिटें अशींच गेलीं. आम्हीं तिघेंहि हाताने वाळूशीं कांहीं तरी चाळे करीत नि मधून मधून एखादे जुजबी वाक्य बोलत बसलो होतों. पण मुख्य मुद्द्याचा विषय मात्र—

कंटाळून मीं समुद्राकडे पाहिलें. लहान लहान लाटा किंचित् पुढें येऊं लागल्या होत्या. भरती सुरू झाल्याचीं लक्षणें होतीं हीं.

मीं बंडूकडे पाहिलें. त्याचे ओंठहि हलूं लागले होते.

खालीं पाहत तो म्हणाला, " डॉक्टर, सकाळीं भाऊ म्हणाला—शरीराची जखम उघडी टाकल्यानं चिघळते; पण मनाची जखम उघडी केल्यानंच बरी होते. मलाहि ते खरं वाटलं. म्हणून माझी कहाणी तुमच्यासमोर सांगायचं मीं कबूल केलं त्याच्यापाशीं; पण सांगायची वेळ आल्याबरोबर मात्र—"

मीं बंडूच्या खांद्यावर हळूच हात ठेवून म्हटलें, " अगदीं संकोच बाळगूं नकोस तूं. जें काहीं सांगायचं असेल ते मोकळेपणानं सांग."

डॉक्टरांनींहि दृष्टीनें त्याला धीर दिला.

त्याच्या हाताचा वाळूशीं चाळा चाललेलाच होता. आतां त्या चाळ्याला

एका घराचें स्वरूप आलें होतें. त्या घराकडे बोट दाखवीत तो म्हणाला, " माणसाचं सुख या वाळूच्या घरासारखं असतं हेंच खरं. तें केव्हां कोसळून पडेल—अगदीं लहानसं कारणसुद्धां पुरतं त्याला ! जाऊं दे ते. मीं तुम्हांला माझी सारी हकीकतच सांगतों. म्हणजे झाल्या गेल्या गोष्टींत माझा दोष किती आहे हे तुम्हांलाच ठरवतां येईल."

तो क्षणभरच थांबला. दूरवर पाहण्याचा प्रयत्न करणाऱ्यासारखी त्याची नजर झाली होती.

भरतीच्या लाटा जोरजोरानें येऊं लागल्या होत्या.

बंडू सांगू लागला, " शाळेंत कांहीं मोठा हुशार विद्यार्थी नव्हतों मीं. माझा कल होता नकला करण्याकडे नि गाण्याकडे. त्यांत पहिला नंबर पटकाविला असता मीं. पण माझे मामा होते बडे वकील ! त्यांना मूलबाळ काहीं नव्हतं. त्यांची मोठी इच्छा होती, कीं मी एल्एल्. बी. होऊन त्यांची वकिली पुढं चालवावी. इंग्रजी चौथींतून पांचवींत जातांना ज्याच्या नाकीं नव आले तो रडतराऊत एल्एल्. बी. कसा होणार, ही शंका त्यांना कधींच आली नाहीं. मीं नेहमीं मनात म्हणें—विहिरींत पोहायला भिणारा कृष्णाबाईच्या पुरात उडी टाकून पैलतीराला कसा जाईल ?"

त्याच्या या दाखल्याची मला मोठी गंमत वाटली. बाळपणींचे संस्कार मनावर कसे कोरल्यासारखे असतात !

" पण मामांच्यापुढं हें बोलायची सोयच नव्हती. अगदीं जमदग्नीचा अवतार होते ते ! आईहि त्यांचीच री ओढी. तिचा बिचारीचा काय दोष होता त्यांत ? आपल्या मुलानं मोठा वकील होऊन खोऱ्यानं पैसे ओढावेत अशी कुठली आई इच्छा करणार नाहीं ?

मला मात्र राहून राहून वाटे—मक्याच्या मळ्यांत द्राक्षं होत नाहींत. शाळेंतलं तें जगाम-जगम, नि ए स्क्वेअर्ड मायनस् बी स्क्वेअर्ड, यांनीं तर माझं डोकं अगदीं पिकून जाई. पण वडील लहानपणीं वारलेले, बरोबरीचं किंवा जवळचं दुसरं कुणी नाहीं, तेव्हां मनांतल्या गोष्टी सांगायच्या तरी कुणाला ? आईची माझ्याविषयींची आशा खोटी आहे हें मला कळत होतं. पण मी मनांत नेहमीं म्हणें—लहानपणीं मी किरकिरूं नये म्हणून. आईनं

मला अफूच्या गुंगींत ठेवलं असेल. आतां तिनं कुरकुरूं नये म्हणून आपणहि तिला आशेच्या गुंगींत ठेवायला हवं !

पण माझी ही इच्छा सफल व्हायची नव्हती.

इंग्रजी सहाव्वीच्या परीक्षेंत मी नापास झालों. मला खालच्या यत्तेतच राहावं लागलं. निकालाच्या दिवशीं रात्रीं मी खूप उशीरां घरीं परत आलों. मला वाटलं—मामा झोपले असतील. पण ते जागेच होते. त्यानीं एकदां जो आपल्या तोंडाचा पट्टा सुरू केला—मला वाटतं, तरवारीच्या पट्टयापेक्षाहि जिभेचा पट्टा अधिक वाईट. साध्याभोळ्या जीवांचे बळी घेण्यांत हा दुसरा पट्टाच अधिक तरबेज असतो !"

भरतीच्या लाटांचा खळखळाट आतां चांगलाच ऐकूं येऊं लागला होता. मीं मनांत म्हटलें—बंडू आतां अगदीं बोलण्याच्या रंगात आलाय् !

समोरचें वाळूचें घर हातानें मोडून टाकींत बंडू म्हणाला, "मामाचं तें बोलणं माझ्या अगदीं जिव्हारीं लागलं. या घरांत पुन्हां पाणीसुद्धां प्यायचं नाहीं, असा निश्चय केला मीं ! त्या दिवशीं रात्रीं न जेवतांच मी निजलों.

दुसरे दिवशीं पहांटे आईच्या ट्रंकेंतले पांच रुपये घेऊन मी गुपचुप घरांतून बाहेर पडलों. मामांनीं माझा खूप शोध केला. पण माझा पत्ता त्यांना कधींच लागला नाहीं.

मी एका बुवाच्या बरोबर खानदेशांत गेलो. तिथं एका चांगल्या हरिदासानं मला पाहिलं. त्यालाहि मागं साथ करणारा पोरगा हवाच होता. गाणं शिकवायचं कबूल करून त्यानं मला आपल्याबरोबर फिरवायला सुरुवात केली. त्याच्याबरोबर फिरतां फिरता माझी गाणं शिकण्याची भूक अधिक वाढत गेली. चार कटाव, पंचवीस दिंड्या नि दोनशें आर्या पुनः पुन्हां म्हणून माझं कांहीं समाधान होईना. नागपूरला एक बडे मुसलमान गायक आहेत अशी बातमी मला लागली. एके दिवशीं मीं त्या हरिदासाच्या हातावर तुरी दिल्या नि तडक नागपूर गांठलं.

त्या खांसाहेबांची शागिर्दी मीं कशी केली हें सांगत बसलों तर एक ग्रंथच होईल. 'गायनविद्या ही सोन्याची खाण आहे' असं म्हणतात. मिळकतीच्याच नव्हे तर इतर दृष्टींनींहि, तें खरं आहे.

सोन्याच्या खाणींतलं सोनं जसं मातींत मिसळलेलं असतं त्याप्रमाणं

गायनविद्या ही अनेक मोहांशीं संलग्न झालेली असते. पण मी कुठल्याहि मोहाला बळी पडलों नाहीं. विद्या हस्तगत करण्याचा कैफ मला इतका भयंकर चढला होता, कीं कुठल्याहि व्यसनाकडे मी ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहीं."

बंडू विसांवा घेण्याकरितां क्षणभर थांबला. माझ्या मनांत आले-बंडूला कुठलेंहि व्यसन नाहीं. मग त्यानें शरीरसुखाच्या बाबतींत बायकोवर जुलूम कां करावा? असल्या बाबतींत दारूबाज नेहमीं अतृप्त असतो व त्यामुळेंच बाटल्यामागून बायाहि त्याच्या आयुष्यांत प्रवेश करतात. पण बंडूसारख्या सात्त्विक मनुष्यानें—

लाटांचा खळखळाट वाढत होता. बंडूहि आतां झरझर बोलूं लागला होता.

"त्या दिवसाची आठवण झाली कीं अजून मन कसं प्रसन्न होतं. गाणं शिकायच्या नादांत भूक, तहान, फार काय—आईच अस्तित्वसुद्धां मी विसरून गेलों होतो. तीं सात-आठ वर्षं केव्हां निघून गेलीं हें मला कळलं सुद्धां नाहीं!

पुढं मामा वारल्याचं मीं वर्तमानपत्रांत वाचल. तेव्हां कुठं माझ्या त्या मोठ्या स्वप्नांतून मी जागा झालो. आईची चौकशी करण्याकरिता मी परत आलों.

पण मधल्या काळांत विलक्षण घडामोडी झाल्या होत्या. पन्नाशीची झुळूक लागल्यावर आमचे मामा एका बाईच्या नादाला लागले. त्यांनीं पाण्या-सारखा पैसा मिळवला होता. पण एखादं धरण फुटावं ना? तशी त्यांच्या त्या पैशाची स्थिति झाली. वृद्धापकाळांतल्या व्यसनामुळं गांवांत त्याची नाचक्कीहि फार झाली.

मी आलों तेव्हां आई वैतागून काशीला जायला निघाली होती. तिचं उरलं-सुरलं आयुष्य समाधानांत जावं म्हणून मी तिला म्हटलं, "तूं सुखानं रहा तिथं. दर महिन्याच्या पहिल्या तारखेला वीस रुपयाची मनी ऑर्डर अगदीं नेमानं मिळत जाईल तुला."

आईला दिलेलं हें वचन पार पाडण्याकरितां लगेच मीं एका नांवाजलेल्या संगीत नाटक मंडळींत नोकरी धरली. आई काशीला निघून गेली. मात्र जातां जातां तिनं मला एक शपथ घ्यायला लावली. मामांच्या उदाहरणामुळें

तिनं धास्तीच घेतली होती. तिच्या पायांवर हात ठेवून मीं कबूल केलं कीं, मी लवकरच लग्न करीन नि जन्मात परस्त्रीकडे कधींहि ढुंकून पाहणार नाहीं.

आपल्या प्रौढ नि प्रतिष्ठित भावाची एका बाईच्या पायीं काय दुर्दशा झाली हें तिनं पाहिलं होतं. नाटक कंपन्याचा तर असल्या बाबतींत बदलौकिकच असतो. म्हणून तिनं घातलेली शपथ मलाहि योग्य अशीच वाटली.

मी लग्नाचा विचार करूं लागलों पण जिथं तिथं एक गोष्ट माझ्याआड येऊं लागली—लौकिकदृष्ट्या मी नाटकी होतो.

नाटक कंपनीतल्या पहिल्या दोन वर्षांत समाजाच्या ढोंगी स्वभावाचा अनुभव मला पुरा पुरा आला. समाजातला एकहि प्रतिष्ठित मनुष्य मला आपली मुलगी द्यायला तयार नव्हता. मात्र हेच सभ्य लोक सहकुटुंब माझं काम पाहायला येत होते. माझ्या गाण्यांना वन्समोर देत होते नि माझे शृंगाराचे प्रवेश मिटक्या मारीत बघत होते!"

बंडूचा स्वर आतां बराच उंचावला होता. अकारण सोसलेल्या अपमानाची आठवण होऊन तो तळतळून बोलत होता. माझ्या मनांत आलें— आजचें मानवी जीवन सर्वच बाजूंनीं ढोंगी झालें आहे. बंडूला त्याचा नुसता धक्काच लागला. पण कित्येकाना, त्याच्या लाथा खाव्या लागत आहेत नि कोट्यवधि लोक तर त्याच्या पायदळीं तुडविले जात आहेत. त्यांचा आक्रोश—

बंडू पुढें बोलतच होता—

"शृंगाराच्या प्रवेशांची गोष्ट ओघानंच आली म्हणून बोलतो. कलेसाठीं कलावंताला प्रसंगीं किती जबर किंमत द्यावी लागते याची कल्पना करमणूक म्हणून तिच्याकडं पाहाणाऱ्यांना यायची नाहीं. कुठलाहि रस असला तरी भूमिकेशीं समरस होतांना माझ्या भावनांवर इतका ताण पडे, कीं काम करण्यापूर्वी नि केल्यानंतर अगदीं वेड्यासारखी स्थिति होऊन जाई माझी! त्यांतून तें शृंगाराचं काम असलं म्हणजे तर माझ्या मनाचा क्षुब्धपणा अधिकच वाढे. नाटक संपल्यावर पहांटेपर्यंत झोंप येत नसे मला. कल्पना स्वैर सोडायची, उत्कट अनुभव समरसतेनं जगून दाखवायचे नि इतकं करून हे एका क्षणांत विसरून जायचं, ही गोष्ट दिसते तितकी सोपी नाहीं. अनेक कलावंत

लहरीच नव्हे तर व्यसनीसुद्धां असतात याचं कारण त्यांच्या भावनांवर पडणारा हा ताणच असला पाहिजे. बिचारे तापलेलं डोकं शांत करण्या-करितां किंवा पडलेला ताण विसरून जाण्याकरितां कशाचाहि आश्रय करतात!"

साने मध्येंच म्हणाले, "माझ्या संशोधनाला फार उपयोग आहे तुमच्या या बोलण्याचा. चालूं द्या पुढं तुमचं."

बंडू क्षणभर लाजल्यासारखा झाला. पण लगेच तो म्हणाला, "स्वतः-विषयीं कितीहि बोललं तरी माणसाला पुरंच होत नाहीं; पण—आतां मुद्द्याच्याच गोष्टीकडं वळतों मी.

नाटक कंपनींत चांगला पगार मिळत होता मला. पण एकाहि प्रतिष्ठित मनुष्यानं आपली मुलगी मला दिली नाहीं. माझी स्थिति मात्र दिवसेंदिवस केविलवाणी होऊं लागली. मला कुठलंहि व्यसन नव्हतं. परस्त्रीकडं वाईट दृष्टीनं पहाणं हें पाप आहे हें मला कळत होतं. आईनं घातलेली शपथ पावलोंपावलीं माझ्या कानांत घुमत होती. पण—

माझ्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येऊं लागले. शरीर नि मन यांचा एक विचित्र झगडा सुरू झाला. मन उठल्या सुटल्या पावित्र्याचा पुरस्कार करी. शरीर म्हणे—तुझं पावित्र्य तुझं तुलाच लखलाभ असो! ज्याला जेवायची जरूर पडत नाहीं तो भुकेसाठीं कधींच चोरी करणार नाहीं. पण जो भुकेनं तडफडत असेल तो चोरी पवित्र आहे कीं अपवित्र आहे याचा तात्त्विक विचार करीत बसणार नाहीं!

उन्हाळ्यांत धुळीच्या वावटळी उठतात ना? तसे असले विचार माझ्या मनांत एकसारखे थैमान घालूं लागले.

याच वेळीं एका कॉलेजांतून मला बोलावणं आलं. त्यांना संगीत नाटक करायचं होतं. मीहि महिनाभर रजा घेऊन कुठं तरी मन स्वस्थ करण्या-करितां जाणार होतोंच. कॉलेजाच्या उत्साही जगांत आपल्याला बरं वाटेल म्हणून मीं तें काम पत्करलं.

तो एक महिना मी फार आनंदांत काढला. पण दुर्दैवी मनुष्याचा आनंद कधीं फार दिवस टिकत नाहीं. त्या एका महिन्यांत नायिकेचं काम करणाऱ्या मुलीला नि मला एकमेकांविषयीं विलक्षण ओढ वाटूं

लागली. शेवटीं एकांतांत निरोप घेतांना चुंबन घेण्याचा मोह मला अनावर झाला.

तिचं नांव मी तुम्हांला सांगूं शकत नाहीं; पण ती मुलगी मोठी गोड नि हुशार होती. तिचं माझ्यावरलं प्रेम क्षणिक होतं कीं काय कुणाला ठाऊक! पण मला मोह पडावा इतकं तें उत्कट होतं यांत शंका नाहीं.

मी निघून गेल्यावर तिच्या काकांना या गुप्त गोष्टीचा सुगावा लागला. त्यांनी मला तिच्या सहीचं असं विचित्र पत्र पाठविलं कीं—

माझी चूक मला क्षणार्धांत कळून चुकली. मी कलावंत असलों, महिना दीडदोनशें रुपये मिळवीत असलों, तरी मी एक यःकश्चित् नट होतों. पत्नी म्हणून सुशिक्षित मुलीची अपेक्षा मी करणं हा प्रतिष्ठित समाजाच्या दृष्टीनं गुन्हा होता.

मीं लवकरच एका गरीब भिक्षुकाच्या मुलीशीं लग्न केलं. माझी ही बायको सुरूप नव्हती नि कुरूपहि नव्हती. पण तिच्या सहवासांत मी सुखी झालों, माझ्या मनाला एक प्रकारची शांति मिळाली. आठवड्यांतून तीन दिवस जागृत होणाऱ्या चित्रविचित्र भावनांचा उच्छृंखलपणा नि त्यांच्यामुळं उत्पन्न होणारा माझ्या मनाचा अस्वस्थपणा त्या भोळ्या-भाबड्या जीवाच्या प्रेमळ स्पर्शानं नाहींसा होई. मी नेहमीं तिला थट्टेनं म्हणें, " तूं भिक्षुकाची मुलगी असलीस तरी तुझ्या ओठांत मद्याचा कलश आहे. एकदां तो माझ्या ओठाला लागला कीं, माझीं सारीं दुःखं विसरून जातों मी!"

मी असं काहीं तरी बोलूं लागलों म्हणजे ती म्हणे, " हे घर आहे; थेटर नव्हे. असलीं भाषणं नाटकातच शोभून दिसतात!"

एका पुरुषाच्या रुक्ष आयुष्याला आपण किती ओलावा आणला आहे नि आपल्या स्पर्शानं त्याचा तोल आपण कसा सांवरीत आहों, याची तिला कल्पनाच नव्हती. ती त्या वेळीं माझ्या आयुष्यांत आली नसती तर मीं कदाचित् दारूच्या पेल्याला स्पर्श केला असता, कदाचित् वेश्येच्या घराची वाटहि चालूं लागलों असतों. ती साधी होती—भोळी-भाबडी होती—पण माझ्या आयुष्यांतली देवता होती. माझ्या दुर्दैवानं आठवण म्हणून एक मुलगी मागं ठेवून ती देवाघरीं निघून गेली!"

बंडूनें डोळयांत उभें राहिलेलें पाणी पुसलें. लगेच कृत्रिम हास्य करून तो म्हणाला, "त्या वेळीं वैराग्याचा मोठा झटका आला मला! पहिल्या बायकोच्या स्मरणांतच उरलेलं आयुष्य घालवायचा मी संकल्प केला. आठवण म्हणून तिचीं आवडतीं पातळं जपून ठेवलीं. तिच्या डोक्यांतल्या आकड्यावर मीं अश्रूंचा अभिषेक करूं लागलों. तिचा एक लहानसा फोटो होता, तो मोठा करून घेऊन माझ्या बैठकीच्या खोलींत लावला. मीं मनांत म्हणत होतों—सीतेच्या स्मरणांत प्रभु रामचंद्रानं नाही का आयुष्य काढलं? आपणहि तसंच—

एका गोष्टीचा विसर पडला होता मला. प्रभु रामचंद्र एखादाच असतो. बंडू आपटे मात्र घरोघर सांपडतात.

पहिल्या पत्नीच्या स्मृतिसुखांत उरलेलं आयुष्य घालवण्याचा माझा संकल्प पार पडला नाहीं. 'सकल्प नि सिद्धि यांच्यामध्यें ईश्वरी इच्छा उभी असते' अस गडकऱ्यानीं म्हटलं आहे. पण मला नाहीं तें खरं वाटत. सकल्प नि सिद्धि यांच्यामध्ये मनुष्याचं दुबळं मनच येतं, असा माझा अनुभव आहे.

माझ्या दुबळेपणाची कहाणी सविस्तर सांगूं लागलों तर तुम्हांला कंटाळा येईल. पण एक गोष्ट मात्र सांगितल्यावांचून राहवत नाहीं. मन ताब्यांत ठेवण्याचा मीं खूप प्रयत्न केला. पण मी दुबळा होतों म्हणून म्हणा, किंवा पदोपदीं भावना प्रक्षुब्ध करणाऱ्या धंद्यांत मीं पडलों होतों म्हणून म्हणा, मला त्या कामांत यश आलं नाहीं. मला वाटतं, जगांत शेंकडा नव्वद लोक माझ्यासारखेच असतात. प्रवाहाबरोबर त्यांना पोहतां येतं. पण प्रवाहाच्या विरुद्ध पोहण्याची पाळी आली कीं त्यांचे हातपाय गळून जातात!"

साऱ्यांनीं होकारार्थी मान हलविली.

बंडू पुढें सांगूं लागला, "उगीच पाल्हाळ लावत नाहीं आतां. मुंबईला आमच्या कंपनीचा मुक्काम होता. त्या मुक्कामांत गोपाळराव मराठ्यांची नि माझी ओळख झाली. गृहस्थ मोठा रसिक आहे. कंपनींतल्या वातावरणांत मला नेहमीच गुदमरल्यासारखं होई; म्हणून मीं गोपाळरावांच्या घरीं जाऊं

येऊं लागलों. तिथं त्यांच्या विधवा बहिणीची नि माझी ओळख झाली. तिचं नांव सिंधू. मास्तरीण होती ती.

लहानपणापासून सामाजिक सुधारणेच्या बाबतींत कांहीं तरी करावं असं मला वाटे. नाटक कंपनींत शिरल्यावर ती इच्छा अधिकच तीव्र होऊं लागली. पण मला करता येण्याजोगं कांहींच नव्हतं. सिंधू दृष्टीला पडतांच माझ्या या इच्छेनं उचल खाल्ली. तिच्याहि मनात लग्नाचा विचार घोळत होताच; पण भावापाशीं तो बोलून कसा दाखवायचा हे कोडं पडलं होतं तिला. शेवटीं आंधळ्याला पांगळा भेटला नि आमचं लग्न झाल !

लग्नानंतरचे ते पहिले सुखाचे दिवस—ते आठवले कीं वाटतं, दुर्दैव माणसाशीं नेहमीं हुतुतूचा डाव खेळत असतं. सुखाचं रूप घेऊन ते आपल्या अगदीं जवळ येतं. पण आपण त्याला कवटाळायला गेलो कीं तें हळूहळू मागं जाऊं लागतं. शेवटीं आपण त्याच्या आटोक्यात जातों नि तिथं आपलं खरं स्वरूप प्रगट करून ते आपल्यावर उलटतं !"

त्याचे हें बोलणें ऐकून मला हंसूं आलें. ते पाहून तो म्हणाला, " तुझीं पुस्तकं वाचूनच असं बोलायला शिकलोय् मीं ! कांहीं चूकबिक असली तर बघून घे !"

मीं म्हटलें, " चूक कसली आलीय् ? प्रत्येक मनुष्य आपापल्यापरी कवि असतो हें मनात येऊन हंसलों मीं."

बंडू पुढें सांगूं लागला:

" सिंधूची नोकरी मुंबईंत होती. मला तर धंद्यामुळं गांवोगांव फिरावं लागे. शिवाय नवऱ्याला दोनशें रुपये पगार मिळत असतांना बायकोनें नोकरी करावी हें मला पटत नव्हतं. मी तिला नोकरी सोडायचा सल्ला दिला.

तुम्हांला कदाचित् खरं वाटणार नाहीं, पण पहिल्या बायकोइतकंच सिंधूवरहि मीं उत्कट प्रेम केलं. एक खेळणं मोडल्यावर मूल दुसरं घेऊन खेळूं लागतं. त्याचं पहिल्या खेळण्यावरलं प्रेम कांहीं खोटं असत नाहीं. पण तेवढंच प्रेम तें दुसऱ्या खेळण्यावर करूं शकतं. म्हातारीं माणसं एक देव सोडून दुसऱ्याची पूजा करूं लागतात, पण त्यांची मनांतली भक्ति तशीच कायम असते. तरुणपणीं मनुष्य जें प्रेम करतो तेंहि असंच असतं.

आई एखाद्या लहान मुलाचं कोडकौतुक करते ना? तसे लग्न झाल्यावर सिंधूचे लाड केले मीं! कांहीं म्हटल्या कांहीं कमी पडूं दिलं नाहीं मी तिला. मात्र आई मायेनं मुलाला जसं नटवते तसे त्याचे पापे घेऊन त्याला पुरेपुरेहि करून सोडते! मींहि तसाच वागत होतों. सिंधू हंसली कीं मला चांदणं फुलल्यासारखं वाटे. ती आजारी पडली कीं, माझ्याभोंवतीं काळोख दाटे. तिचं पाहणं—तिचं हंसणं—तिच बोलणं, सारंच मला प्रिय होत. तिच्या सहवासांत किती लवकर उजाडलं असं मला नेहमीं वाटे. फुलांचं अत्तर करून त्याचा सुगध कायम टिकवितात ना? प्रणयाचे उन्मादक अनुभवहि असेच दीर्घकाल टिकविता येत असते तर—"

एक क्षणभर थांबून तो बोलूं लागला. आतां त्याच्या स्वरात एक प्रकारची आर्तता जाणवूं लागली होती.

"त्या वेळीं आमच्या कंपनींत एक सुंदर मुलगी नायिकेचं काम करीत असे. शृंगाराच्या प्रवेशात मीं तिच्याकडं नुसतं पाहिलं की थेटरांत टाळ्यांचा कडकडाट होई. सिंधूला त्या पोरीचा उगीचच मत्सर वाटे. 'माझा अभिनय हें नाटक आहे' असं मीं तिला वारंवार बजावून सांगें. पण तिची कधींहि पुरी खात्री होत नसे. बिचारीला हें ठाऊकहि नव्हतं, कीं आमच्या एकांतांतल्या प्रणयाची मी त्या प्रवेशात नक्कल करीत असे.

या मत्सराचा मोठा असा स्फोट मात्र कधींच झाला नाहीं. कारण सिंधूपासून मीं कुठलीहि गोष्ट कधींच चोरून ठेवली नाहीं. एका गोष्टींत मीं तिला फसवलं होतं खरं! पण—"

त्याने स्मित केलें. पति-पत्नींच्या भांडणाचा एखादा महत्त्वाचा धागा आतां हाताला लागणार या कल्पनेने मीं उत्सुकतेनें ऐकूं लागलो.

बंडू म्हणाला, "लग्नापूर्वी तुमचं शिक्षण किती झालंय् असं तिनं मला सहज विचारलं होतं. ती स्वतः मास्तरीण होती. मीं मॅट्रिकसुद्धां नाहीं हें कळलं तर कदाचित् ती मला नकार देईल असं भय वाटलं मला. म्हणून 'मी मॅट्रिक आहें' असं खोटंच सांगितलं तिला मीं त्या वेळीं!"

किंचित् थांबून त्यानें समुद्राकडे पाहिलें. लाटांवर लाटा उसळूं लागल्या होत्या. तो घाईघाईनें सांगूं लागला, "आमच्या संसारांत कुठलीहि उणीव नव्हती. दोन मुलंहि झालीं आम्हांला. दिनूच्या वेळीं ती नुसती आनंदांत

नाचत होती. मात्र मनूच्या वेळचं बाळंतपण तिच्या प्रकृतीला तितकसं मानवलं नाहीं. डॉक्टरांनीं सांगितलेलीं सर्व औषधं मीं तिला दिलीं. पण तिनं जी धास्ती घेतली ती घेतलीच. ती मुद्दाम माझ्यापासून दूर दूर राहूं लागली.

तिच्या या वागणुकीनं मी चिडखोर होऊं लागलों.''

किंचित् हंसून तो म्हणाला, "मधली एक गोष्ट महत्त्वाची सांगायची राहिलीच की! नाटकाच्या धंद्याला झपाट्यानें उतरती कळा लागली होती. आमची कंपनी लवकरच बंद झाली. सिंधूसाठीं नागपूरला मीं खटखट केली. तिला यश आलं. तिथं तिला मास्तरणीची नोकरी मिळाली.

ती शाळेंत गेली म्हणजे मी मुलांना संभाळीत असें. कुठल्या तरी सिनेमा कंपनींत प्रवेश मिळतो कीं काय हेंहि मीं पहात होतों. पण पुण्यामुंबई-सारख्या काहीं नागपूरला कंपन्या नाहींत. त्यामुळं मला पुष्कळ दिवस बेकारच राहावं लागलं.

बेकार मनुष्याला स्वतःचाच राग येत असतो. निखारा फुलला कीं स्वतःला जाळून घेतो ना? रागानं त्याचीहि अशीच स्थिति होते. पण माझं हें दुःख सिंधूच्या कधींच लक्षांत आलें नाहीं. पुरुषानं आपलं दुःख सांगून बायकोच्या हळव्या मनाला त्रास देऊं नये अशा समजुतीनं मींहि तें तिला कधीं सांगितलं नाहीं.

परिस्थितीबद्दल माझी मुळींच तक्रार नव्हती. पण तिच्या वागणुकीबद्दल मात्र—

ती मुलावर केवढी माया करी! पण तिनं नुसतं जवळ यावं म्हणून माझ्या डोळ्यांनीं कितीहि लाचारी दर्शविली तरी—

सांगायची लाज वाटते, पण आतां सांगतोंच. नुसत्या मुलांवर प्रेम करून माझं समाधान होत नव्हतं. मला सिंधू हवी होती. तिचं मन हवं होतं. नुसतं मन नाहीं; शरीरहि हवं होतं मला!

ती माझ्याकडं दुर्लक्ष करूं लागली. माझ्यांतल्या रानटीपणाला तिनं डिंव-चलं. तिच्या इच्छेची पर्वा न करता मी—

मला रानटी म्हणा, पशु म्हणा, राक्षस म्हणा, वाटेल तीं नांवं ठेवा! पण सामान्य माणसाच्या सुखांत शरीरसुखाचाच भाग फार मोठा आहे. तें सुख

मिळालं नाहीं म्हणजे तो भुकेलेल्या हिंस्त्र पशूप्रमाणं वागूं लागतो असं मला वाटतं.

हळूहळू आम्हीं मनानं एकमेकांपासून दूर जाऊं लागलों नि शेवटीं—

नागपूरला नुकत्याच स्थापन झालेल्या एका सिनेमा कंपनींत मला काम मिळालं होतं. पांचसहा दिवस मी आउट-डोअरला गेलों होतों. त्या सहा दिवसांत चित्रातल्या शृंगाराच्या नदींत नुसता डुंबत होतों मी! मी नागपूरला परत आलों तो मुख्य नटीच्या गाडींतून! नि तेंहि अगदीं मध्यरात्रीं. गाडींत मालकाला पुढं बसवून तिनं मला मुद्दाम आपल्यापाशीं मागं बसवून घेतलं होतं. तिचा हा पगार वाढवून घेण्याचा डाव होता, कीं मला जाळ्यांत ओढण्याची युक्ति होती, हें मला कळणं शक्य नव्हतं. पण उन्मादक सौंदर्याच्या सहवासांत मनाचा नि शरीराचा तोल संभाळणं किती कठीण असतं, याचा मीं त्या दिवशीं पूर्ण अनुभव घेतला.

सिंधूनंच घराचें दार उघडून मला आंत घेतलं. “जेवायचंय् का?” म्हणून तिनं मला विचारलं. मीं मानेनं नाहीं म्हणताच तिनं सरळ आपल्या खोलीचा रस्ता धरला.

माझ्या खोलींत जाऊन मीं अंथरुणावर पडलों खरा. पण माझं मन भडकून गेलं होतं—क्षणाक्षणाला माझ्या शरीराचा बेचैनपणा वाढत होता. सिंधूच्या मिठीनंच हा दाह शांत होईल हे मला ठाऊक होतं.

तिच्या खोलींत जाऊन मीं तिला जागी केली. तिची कुणी मैत्रीण रात्रीं राहायला आमच्या घरीं आली असेल ही कल्पनाहि नव्हती मला! तिनं बोट दाखवलं तेव्हां कुठं माझं तिकडे लक्ष गेलं.

पण—

माझं मन माझ्या ताब्यात नव्हतं. कुठल्याहि भुकेनं पिसाळलेल्या मनुष्यांत नि पशूंत अंतर उरत नाहीं हेंच खरं.

मीं तिला जवळ जवळ ओढीतच माझ्या खोलींत नेली. ती सुटून जाण्याकरितां धडपड करीत होती; पण मीं तिला सोडली नाहीं.

याच वेळीं मनू एकदम झोंपेंत ओरडला. तिची ती मैत्रीण जागी झाली. मनूला घेऊन ती माझ्या खोलीकडे धांवतच आली.

पुढं काय सांगायचं ? दुसऱ्या का तिसऱ्या दिवशी माझ्याशीं एक शब्दहि न बोलतां मुलांना घेऊन सिंधू चालती झाली ! आतां ती माझ्याकडं कधींहि परत येणार नाहीं !"

" कां येणार नाहीं ?" साने उद्गारले.

बंडू आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहूं लागला.

सान्यांनीं समुद्राकडे बोट दाखविले.

आम्ही आलों तेव्हां वाळवंटाचा केवढा तरी भाग उघडा पडला होता. पण आतां त्याच भागांत समुद्राच्या लाटा पाठशिवणीचा खेळ खेळत होत्या.

# नमूताई १०

बंडूचें समाधान करण्याकरितां समुद्राच्या भरतीकडे बोट दाखविण्यांत साऱ्यांनीं समयसूचकता दाखविली खरी; पण राहून राहून माझें मन म्हणत होतें—कोशात सिंधू म्हणजे समुद्र हा अर्थ असला तरी बंडूचो सिंधू कांहीं सुखासुखी त्याच्याकडे परत येणार नाहीं! माणसाचें मन समुद्रासारखें असेल; पण त्याच्या रागालोभाचे नियम कांहीं समुद्राच्या भरती-सुकतीइतके सोपे नाहीत.

साऱ्यांच्या निमंत्रणाप्रमाणें आम्ही दोघेहि दुसरे दिवशीं सकाळीं त्यांच्या घरीं चहाला गेलों चहा झाला. वर्तमानपत्रांतल्या ताज्या बातम्यांची चर्चा संपली. डॉक्टरांची दवाखान्यांत जायची वेळ होत आली. ते कपडेसुद्धां करूं लागले. बंडूला सल्ला देण्याच्या बाबतींत साने टाळाटाळ करणार असें मला वाटूं लागलें. अंतःपुरांतले उत्तराचें शौर्य रणांगण दिसतांच कुठल्या कुठें नाहीसें झालें. डॉक्टरांनीं रात्रीं बंडूला दिलेलें आश्वासनहि तसेंच—

आरशासमोर उभे राहून टाय् बांधतां बांधतां मध्येच मागें वळून साने म्हणाले, "हें पाहा, बंडोपंत, युरोपांतलं महायुद्ध नि तुमचं नवराबायकोचं भांडण यांच्यांत विलक्षण साम्य आहे!"

साने बंडूची थट्टा करताहेत कीं काय हें मला कळेना. त्यांची थट्टा अगदी

निर्दयपणाची वाटली मला. तिकडे त्याच्या संसारसुखाला आग लागली होती आणि डॉक्टर इकडे—

सान्यांनीं फिरत्या शेल्फमधून पिवळा पुठ्ठा असलेले एक पुस्तक चटकन् उचललें, झरकन् त्यातले एक पान काढले नि एका वाक्यावर बोट ठेवून ते मला मोठ्यानें वाचायला सांगितले. मी वाचूं लागलों—

It seems clear that those who denounce birthcontrol thereby...whether intentionally or not is immaterial... increase the possibilities of war."

माझे हे वाक्य संपताच साने हंसत म्हणाले, "हा लेखक म्हणतो–संततिनियमाच्या अभावीं सध्याच्या जगात युद्ध होत राहणार यांत शंकाच नाहीं. माझंहि तेच म्हणणं आहे. पण हीं युद्धं नुसत्या राष्ट्राराष्ट्रात होणार नाहींत. घरोघर नवराबायकोंतसुद्धा होतील !"

मी कुतूहलाने सान्याच्याकडे पाहूं लागलों. बिचारा बंडू तर भांबावूनच गेला होता. साने म्हणाले, "स्त्रीच्या जीवनाच्या कल्पना आतां विजेच्या वेगानं बदलताहेत. अष्टपुत्रा सौभाग्यवतीचा काळ फार मागं पडला आहे. मुलींचीं लग्नं प्रौढपणीं होऊं लागलीं. त्यांच्यावर कुटुंबपोषणाची जबाबदारी पडूं लागली. त्यांना नवीं नवीं सामाजिक ध्येयं आकर्षित करूं लागलीं. अशा स्थितींत मुलाचं लटांबर त्यांना नकोसं झालं तर त्यांत नवल कसलं ?"

ब्रशाने कोट साफ करीत ते पुढें म्हाणाले, 'स्त्री ही क्षणाची पत्नी नि अनंत काळची माता आहे', असं अत्र्यांचं का दुसऱ्या कुणाचं वाक्य आहे ना ? त्यांत आता बदल करायला हवा. स्त्री ही पत्नी आहे, माता आहे, सर्व काहीं आहे. क्षणापुरती नाहीं अगदीं जन्मभर! पण या सर्वांआधीं ती माणूस आहे, ही गोष्ट मात्र पुरुषानं यापुढं लक्षांत ठेवली पाहिजे. आपल्याला किती मुलं हवींत हे तिनंच ठरवायला हवं. तिची शरीरप्रकृति, कुटुंबाची सांपत्तिक परिस्थिति, तिच्या आवडीनिवडी, तिचीं ध्येयं, इत्यादि गोष्टींकडं पुरुषानं यापुढं दुर्लक्ष केलं तर संसार हें तिला नंदनवन वाटणार नाहीं; सहारा वाटेल !"

डॉक्टरांचा पोषाक झाला होता. ते बंडोपंतांकडे वळून हंसत म्हणाले, "मी काय म्हणतों तें तुमच्या लक्षांत आलं ना ?"

बंडूनें होकारार्थी मान हलविली.

× × ×

कोल्हापुरला परत येतांना बाळपणच्या आठवणी काढून बंडूशीं बोलत बसण्यापेक्षा मी स्वतःच्याच तंद्रींत अधिक गुंग झालों होतों. तो पोलिस इन्स्पेक्टर नि त्याची बायको विमल—माझा मित्र रामभाऊ नी त्याची पत्नी कुंदा–पळून गेलेला दुर्दैवी सदूभाऊ नि त्याची ती व्यभिचारी बायको—शरीरसुखाच्या बाबतींत पावित्र्याच्या भलत्याच कल्पनांना बळी पडलेली सुमति—पुनः पुन्हां हीं माणसें माझ्या डोळ्यांपुढे नाचत होतीं. विमल, कुंदा, सदूभाऊ नि त्याची बायको, यांच्यापैकीं एकालाहि मीं जन्मांत पाहिलें नव्हतें. पण जणूं काहीं त्यांचा नि माझा फार दिवसांचा परिचय आहे असा मला भास होत होता. माझ्या डोळ्यापुढं त्यांच्या मूर्ती नाचत होत्या. त्यांचीं अंतरंगांतलीं दुःखें मला ऐकायला मिळाल्यामुळेच कीं काय हीं सारीं माणसें अगदीं आपल्याजवळचींच आहेत असें मला वाटूं लागलें होतें.

मध्येच मला नमूताईची आठवण झाली. डॉ. सान्यांनीं सांगितलेली तिची सारी हकीकत आठवली. माझ्या मनात आले—नमूताईने प्रामाणिकपणानें आत्मवृत्त लिहिले तर ते किती परिणामकारक होईल! घाणेरड्या चिखलांतून एखाद्या दिवशीं कमळाच्या कळीनें हळूच वर डोकावून पाहावें, तसें सध्याचें तिचें उदात्त जीवन होतें. किती पवित्र! किती निर्मल! एके काळीं याच बाईनें शरीरसुखाच्या बाबतींत आपल्या आजारी नवऱ्याला छळलें होते, हें कुणाला तरी खरें वाटेल काय? सान्यांनीं केलेलें ते तिचें वर्णन—कर्जवसुलीकरितां दारांत धरणे धरून बसणारा पठाणसुद्धां इतका क्रूर नसेल. क्षयाने नवरा अंथरुणाला खिळलेला. पण एक दिवस कांहीं ही बाई त्याच्यापासून दूर झाली नाहीं. त्याच्या खोलीबाहेर झोपली नाहीं!

शरीरसुखाची चटक ही दारूसारखी असते. मग अट्टल दारूबाजाने एका क्षणांत दारू सोडावी तसा हा चमत्कार नमूताईच्या आयुष्यांत कसा झाला? या बाबतींत तिनें कुणाला गुरु केलें?

कांहीं केल्या हें रहस्य मला उलगडेना.

लहानपणीं आगगाडींतून जातांना झाडें धांवतात कशीं, हा प्रश्न एकसारखा मला सतावून सोडी. आज दुसराच प्रश्न माझ्या मनाला बेचैन करून सोडीत होता. नमूताईसारखीं माणसे एकदम बदलतात कशीं?

× × ×

बंडूला त्याच्या मेव्हण्याच्या बिऱ्हाडीं पोचवून मी घराकडे आलों तरी हाच विचार माझ्या मनांत घोळत होता. अन्न नि प्रेम या दोन गोष्टींत मनुष्याला शरीराची गुलमगिरी पत्करावी लागते हे निसर्गाला धरूनच आहे. पण उद्यांचा मनुष्य आजच्यापेक्षां खराखुरा सुसंस्कृत व्हायचा असेल, उद्याची मानवजात आजच्यापेक्षां अधिक सुखी व्हायची असेल तर शरीराच्या या गुलामगिरींतून मुक्त होण्याचा मार्ग सामान्य माणसाला समाजानें दाखविला पाहिजे.

आज तो मार्ग ही अरुंद पाऊलवाट असेल, काहीं तुरळक व्यक्तीच त्या वाटेनें जात असतील, पण भविष्य काळीं या पाऊलवाटेचें रूपांतर राजमार्गांत होणार नाहीं कशावरून ?

अशी कुठली पाऊलवाट नमूताईंना दिसली होती ?

मनांत हे विचार घोळवीतच मी घरात आलों.

एकीकडे मी चहा घेत होतों नि दुसरीकडे मध्यंतरींच्या चार-पांच दिवसांतलें टपाल चाळीत होतों.

मध्येच मीं उषेला विचारले, "कंपनींतनं कुणी आलं होतं का माझ्याकडं ?"

"कुणी नाहीं. मात्र—"

ती नांव आठवूं लागली.

कुणी तरी व्याख्यानाबिख्यानाच्या कामाकरतां येऊन गेलें असेल अशा समजुतीने मी म्हणालों, "कुणी का असेना ? येईल पुन्हा."

उषा एकदम म्हणाली—"एक बाई आल्या होत्या."

"बाई ?" मी विचारांत पडून उद्गारलों.

"तुम्हांलाच भेटायचंय्" असं म्हणाल्या.

"तुझ्या ओळखीच्या नाहींत का ?"

"अं हं ! त्याचं नांव मात्र टिपून ठेवलंय मीं."

तिनें कपाटातून एक चिठी काढून माझ्या हातात दिली. त्या चिठीवरलें नांव पाहतांच मला आश्चर्याचा मोठा धक्का बसला—"नमूताई !"

उषा म्हणाली, "तुम्ही आज येणार आहांत हें सांगितलंय मीं त्यांना. आज संध्याकाळीं पांच वाजतां येणार आहेत त्या."

संध्याकाळीं पाच वाजतां ! अरे बाप रे ! आता कुठें सकाळचे नऊ झाले होते. अजून घड्याळातल्या या मठ्ठ तासकाट्याला आठ तासांचे अंतर काटायचें होतें. मी विचार करूं लागलों—नमूताईचें माझ्याकडे काय बरें काम असेल ? त्याच्या आयुष्याचें रहस्य आपल्याला कळेल तर —पण साध्या ओळखीवर असल्या गोष्टी कुणी कुणाला विचारील का ? नि कुणी विचारल्या तरी आपल्या मनाचा चोरकप्पा दुसऱ्याला कुणी उघडून दाखवील का ?

एक गोष्ट एकदम माझ्या लक्षांत आली. नमूताई अनाथ मुलांच्या आश्रमाच्या व्यवस्थापिका आहेत. आपण त्या आश्रमाला अजून काहीच मदत केलेली नाहीं. त्या कामाकरितांच त्या आल्या असाव्यात. देणगी-वर्गणी-वगैरे वगैरे.

संध्याकाळचे पांच थोडे उशीरां वाजले म्हणून काहीं फारसें बिघडणार नाहीं, असें मनांत म्हणत मी नित्यक्रमाला लागलो.

× × ×

प्रवासाच्या शिणामुळें असेल किंवा बाहेर रणरणाऱ्या उन्हामुळें असेल, चाराचे ठोके कानांवर पडले तरी मीं काहीं डोळे उघडले नाहींत. मला गाढ झोप लागली नव्हती; पण डोळ्यांवरली झापडहि काहीं केल्या कमी झाली नव्हती. पहांटेच्या असल्या गुंगीला साखरझोप म्हणतात ना ? मग तिसऱ्या प्रहरच्या या गुंगीला चहाझोप म्हणायला काहीं हरकत नाहीं. कारण पडल्या पडल्या डोळे मिटून घेऊन मी मनात म्हणत होतो—आतां खालून चहाचे बोलावणें आलें कीं उठायचे.

जवळच नव्या घराचें बांधकाम चाललें होतें. तिथल्या गवंड्यांची दगडावरली अखंड टिकटिक मला ऐकूं येत होती. झाडावर आपल्या चोचीनें लयबद्ध प्रहार करणाऱ्या सुतार पक्षाची मला आठवण—

खण् – खण् – खणण् ! दारावरली घंटा एकदम वाजली. इतक्या उन्हांतून कोण आलें असावें, याचा मला तर्कच करतां येईना. मोलकरीणबिलकरीण असेल म्हणून मी डोळे मिटून पडून राहिलों.

“ नमूताई आल्या आहेत त्या. ” या उषेच्या शब्दांनीं माझे डोळे एकदम उघडले. मी चटकन् उठलों, चूळ भरली नि उषेला म्हटलें, “ त्यांना वरच पाठवून दे.”

इतक्या उन्हांत आश्रमाच्या कामाकरितां बाहेर पडणाऱ्या नमूताईंचें कौतुक वाटलें मला. चटवन् अण्णासाहेब कर्व्यांची आठवण झाली. पण लगेच मनांत आले — शरीराविषयींची ही बेपर्वाई या बाईने कुठें संपादन केली ? हिचे पूर्वीचे आयुष्य तर—

दाराबाहेरूनच नमूताईंनीं मला नमस्कार केला. त्या आंत आल्यावर मीं त्यांना खुर्चीवर बसायचा आग्रह केला; पण त्या खालींच बसल्या. गादीवरहि नाहीं, नुसत्या सतरंजीवर.

संस्थेला मदत मागण्याचें काम किती कठीण आहे याची मला स्वानुभवानें पूर्ण कल्पना आहे. त्यामुळे नमूताई प्रथम इकडल्या तिकडल्या गोष्टी सुरू करतील असें मला वाटले. पण मैदानावर उतरल्याबरोबर धीट खेळाडू अगदीं पहिल्याच चेंडूला धाव काढतो ना ? त्याहि मुद्द्याकडे तशाच वळल्या.

"एक मागणी करायला आलेंय् मी !"

"तुमची मागणी मान्य आहे मला !"

माझ्या या उत्तराने त्या क्षणभर चकित झाल्या. असल्या बाबतींत त्यांचा नेहमींचा अनुभव निराळा असावा ! कितीहि सुशिक्षित मनुष्य असो, वर्गणी मागायला कुणी आलं की फंडाचा सुळसुळाट झाल्याची तक्रार करतो, युद्धामुळें काड्याच्या पेट्या सुद्धा किती महाग झाल्या आहेत याचा पाढा वाचतो, देशाला स्वावलंबनाशिवाय तरणोपाय नाहीं असें व्याख्यान सुनावतो नि शेवटीं नाइलाज झाला म्हणजे ज्या कामाकरता मनुष्य आला असेल त्याचा सहानुभूतीनें पण सवडीने विचार करण्याचे आश्वासन देतो ! मीं तसें कांहींच केलें नाहीं, हेंच बहुधा नमूताईच्या आश्चर्याचें कारण असावें.

त्या हंसून म्हणाल्या, "आतां तुम्हांला आपला शब्द मागं घ्यायला देणार नाहीं हं मी !"

साध्या वर्गणीच्या बाबतींत शब्द मागे घ्यायचा प्रश्न येतो कुठें हेंच मला कळेना. मीं म्हटलें, "तुमचा वार्षिक वर्गणीदारच करा ना मला !"

त्या हसत म्हणाल्या, "ते तर करूच हो. पण आज कांहीं वर्गणीसाठी आलें नाहीं मी तुमच्याकडं !"

"मग ?"

"एक दुसरीच मागणी आहे माझी ! थोडी विचित्र आहे ! पण—"

त्या एकदम थांबल्या. जें सांगायचें आहे तें कसें सांगावें या विचारांत पडल्या होत्या त्या ! पण रस्ते फुटण्याच्या जागीं मनुष्य क्षणभर गोंधळला तरी मार्ग निश्चित होतांच तो जसा झरझर चालूं लागतो, तशा त्या लगेच बोलूं लागल्या:

"तुमची 'पारिजातकाचीं फुलं' ही गोष्ट वाचली मीं परवा. फार आवडली ती मला ! वाङ्मयाबिङ्मयात मला काहीं कळत नाहीं फारसं ! पण चांगलं वाङ्मय म्हणजे कडू औषधहि नाहीं नि गोड चॉकोलेटहि नाहीं असं नेहमीं मला वाटतं ! मी तुम्हांला एकच विनंति करायला आलें आहे— आमच्या आयुष्याच्या नि संसाराच्या असल्या खूप खूप गोष्टी तुम्हीं लिहायला हव्यात ! बायकांना त्यांचा किती उपयोग होतो हें—"

मी मधेंच काहीं तरी बोलेन असे त्यांना वाटलें असावे. पण मी गप्पच आहें असें पाहून त्या म्हणाल्या, "आश्रमांत माझ्या मदतीला एक बाई आली आहे मुंबईहून. अनाथ म्हणून पहिल्यादा ती मुंबईच्या शाखेंत आली होती. तिथं ती मन लावून शिकली नि कल्पनेपेक्षाहि अधिक सुधारली म्हणून काम करायला इथं पाठविलीय् तिला ! एका पंधरवड्यांत सारीं मुलं तिला 'आई, आई' म्हणून बिलगायला लागलींत बघा ! मला अगदीं हेवा वाटायला लागला आहे म्हणानात तिचा !"

"अशी बाई तर अवश्य पाहिली पाहिजे !" मी उद्गारलों.

"त्या बाईलाहि तुम्हांला पाहायचंय् !"

"मला ?"

"हो. 'पारिजातकाचीं फुलं' ही तुमची गोष्ट वाचून ती मला म्हणाली, ही गोष्ट मला दहा वर्षांपूर्वी वाचायला मिळाली असती तर माझ्या आयुष्याला वाईट वळण लागलंच नसतं !"

स्वतःचा चेहरा कुणाला कुरूप दिसतो का ? तशी आपली स्तुतिहि खोटी वाटत नाहीं कुणाला !

पण स्तुतीपेक्षांहि माझ्या मनाला अधिक आनंद झाला तो दुसऱ्याच एका गोष्टीनें ! नमूताईसारख्याच दुसऱ्या एका स्त्रीचे जीवन जाणून घेण्याची ही संधी माझ्यापुढें आयती चालून आली होती !

नमूताई मला म्हणाल्या, "मग केव्हां येतां आश्रमांत ?"

मीं म्हटलें, "आश्रमांत आलों नि त्या बाईला पाहिलं, तरी ती ज्या वादळांतून पार पडली आहे त्याची कल्पना कशी येणार मला ?"

"तिनं त्या हकीगतीचं एक छोटं टांचण करून माझ्याकडं दिलं आहे. तुमच्यासारख्यानीं त्याचा उपयोग करावा नि त्या प्रकाशात इतर दुर्दैवी बायकांना आपल्या उद्धाराचा मार्ग दिसावा, अशी तिची फार फार इच्छा आहे !"

अजून ऊन उतरलें नाहीं आणि आपण चहाहि प्यालों नाहीं या गोष्टी मी एका क्षणांत विसरून गेलो. कपडे करून नमूताईच्याबरोबर जाण्याकरितां मी उठलों देखील—

इतक्यात उषा चहाचे तीन पेले घेऊन आली.

चहा घेतां घेता नमूताई म्हणाल्या, "प्रत्येकाला आपण चांगलं व्हावं असं वाटतं. तसं व्हायला लागणारी थोडीशी शक्ति सुद्धा असते त्याच्यापाशीं. पण ती प्रगट व्हायला अनुकूल परिस्थितीच मिळत नाहीं ! या बाईच्या आयुष्यावरनं अगदीं पुरंपुरं पटलं हें मला !"

नमूताई न कळत आपल्याच आयुष्याचे रहस्य सांगत आहेत असें मला वाटले. कुणी तरी एखादा कुलूप लावलेला डबा आपल्या स्वाधीन करावा, त्यांत अमुक अमुक वस्तु आहेत म्हणून सांगावे, पण त्या वस्तु आपण डोळयानीं पाहिलेल्या नसाव्यात नि डबा देणारानें किल्ली दिली नसल्यामुळें डोळयांनीं खात्री करून घेण्याची सोयहि नसावी ! नमूताईच्या बाबतींत माझी अशीच स्थिति झाली होती. म्हणून मीं मुद्दामच म्हटलें, "मागं साने आले होते तेव्हां ते तुमच्याविषयीं असंच काहीं तरी बोलत होते !"

नमूताई नुसत्या हंसल्या. पण त्या हंसण्यात गूढ अर्थ भरलेला होता. मला अगदीं राहवेना.

मीं पुन्हा म्हटलें, "सान्यानीं तुमची सारी हकीगत सागितलीय् मला !"

"एक टीप आहे माझी ! त्या हकीगतींतला महत्त्वाचा भाग चुकीचा आहे !"

मीं अगदीं कळस बांधायला निघालों होतों, पण नमूताईच्या एका वाक्यानें माझा सारा पायाच खचला.

अधिक वेळ मला संशयांत ठेवण्यांत अर्थ नाहीं असें वाटूनच की काय,

नमूताई म्हणाल्या, " जगात दिसतं तसं नेहमींच असतं असं नाहीं. सान्यांची अशीच फसगत झालीय् माझ्या बाबतींत. त्यांचे माझ्यावर नि माझ्या पतीवर फार उपकार झाले आहेत. म्हणून मी त्यांच्यावर कधीं रागावलें नाहीं नि त्यांची चूक त्यांच्या पदरांत घालण्याचा प्रयत्नहि केला नाहीं.

त्यांना माझं बाळपण ठाऊक नव्हतं; नाहीं तर—लहानपणापासून मुलांची मला मनस्वी आवड. शेजारीपाजारी आपलीं लहान मुलं आणून आमच्या घरीं सोडीत. चार-चार तास तीं माझ्याबरोबर हंसतखिदळत राहत.

लग्न झाल्यावर तर माझा जीव वेडावून गेला. द्वारकेहून घरीं परत येणाऱ्या सुदाम्याला सोन्याची नगरी पाहून जो आनंद झाला असेल तोच—

पण माझीं तीं गोड स्वप्नं खरीं व्हायचीं नव्हतीं. माझे पति लवकरच क्षयानं आजारी पडले!"

सान्यांच्या हकीगतींत चूक कुठें आहे हे जाणण्याची इच्छा अगदीं असह्य झाली मला! नमूताई गंभीरपणानें सांगू लागल्या:

" डॉक्टरांचा गैरसमज व्हावा अशा काहीं गोष्टी त्या वेळीं झाल्या हें मात्र खरं! त्या आजारांत माझ्या पतींच्या समाचाराकरितां साने आमच्याकडे वरचेवर येत. मला दररोज जाग्रणं होत होतीं हे त्यांना पाहवेना. एकदां ते असेच आले होते. दोन दिवस तरी मला विसावा मिळावा म्हणून माझ्या पतींच्या शुश्रुषेकरितां त्यांनीं त्यांच्या खोलींत झोपायचं ठरवलं. पण मीं त्याना तसं करूं दिलं नाहीं. त्यानीं माझ्याकडे इतक्या विचित्र दृष्टीनं पाहिलं, कीं ती नजर मी अजून विसरले नाहीं. पण माझाहि कांहीं इलाज नव्हता त्याला!"

मी व उषा आश्चर्यानें नमूताईकडे पाहूं लागलों. विकारवश होऊन मनुष्य अनेक गोष्टी करतो हे खरें! पण जणूं कांहीं आपल्या हातून चूक घडलीच नाहीं असें दाखविण्याकरितां निलाजरेपणानें त्या गोष्टीचें वर्णन करणें हे—

नमूताई पुढें सागूं लागल्या—

" त्या दिवशीं रात्रीं माझ्या पतींनीं संतापून 'आतां तरी छळूं नकोस मला!' हे शब्द एवढ्या मोठ्यानं उच्चारले, कीं ते बाहेर सान्यांनासुद्धां ऐकूं गेले असावेत!

त्यामुळं तर माझ्या राक्षसीपणाविषयीं त्याची खात्रीच झाली. पुढं त्यांनीं आम्हांला आपल्या घरीं नेऊन ठेवलं नि रात्रीं मला माझ्या पतीच्या खोलींत जायची बंदी केली. मींहि चिडून गेलें नि त्याच्यावर भलताच आळ घेतला."

नमूताईंना वेड लागलें आहे कीं त्या स्थितप्रज्ञ झाल्या आहेत हेंच मला कळेना. स्वतःविषयींच्या असल्या गोष्टी शांतपणानें सांगायच्या म्हणजे—

त्या म्हणाल्या, "साऱ्या लोकांनीं मला बोचून खाल्लं त्या वेळीं! नवऱ्याला मारणारी राक्षसीण म्हणून तर मी दररोज शिव्या खात होतें. मात्र या शिव्या खाताना मनातल्या मनात मला आनंद होत होता.

जगाला वाटत होतं—मला शरीरसुखाचा मोह सोडवला नाहीं. पण खरी गोष्ट अगदीं उलटी होती. माझ्या पतींनाच मोह सोडवत नव्हता. शरीरापेक्षांहि त्यांचं मन दुबळं झालं होतं. त्यांच्या शेवटच्या दुखण्यांत त्याना दुखवणं माझ्याहि जीवावर आलं! एवींतेवीं शेवट एकच व्हायचा! मग—मधून मधून मीं त्रागा करीं. नाहीं असं नाहीं; पण त्याचा काहींच उपयोग होत नसे. लगेच ते संतापून मरणाच्या गोष्टी बोलूं लागत, नि 'आतां तरी छळूं नकोस मला' म्हणून माझ्या अंगावर—"

या विचित्र जुन्या आठवणीने नमूताईंच्या पापण्यांच्या कडा ओलसर झाल्या. त्या किंचित् रुद्ध कंठानें म्हणाल्या, "त्या वेळीं मला मोह पडला होता तो एकाच गोष्टीचा—कदाचित् आपल्याला मूल होईल! त्यांची आठवण म्हणून आपण तें—"

झटकन् उठत त्या म्हणाल्या, "अगबाई! शाळेचीं मुलं परत यायची वेळ झाली. तुम्हीं येताय् ना माझ्याबरोबर?"

मी कोट चढवण्याकरिता उठलो. खिडकींतून माझी नजर सहज बाहेर गेली. ऊन रखरखत होतें. पण त्या उन्हांतच तीन-चार कुंड्यांतल्या गुलाबांवर सुंदर कळ्या डुलत होत्या.

× × ×

आश्रमाच्या आवारात मुलें नुकतींच खेळूं लागलीं होतीं.

नमूताई मला आंत घेऊन गेल्या. स्वयंपाकघराच्या खोलींत एक बाई मुलांच्याकरितां फोडणीचे पोहे करीत होती. नमूताईनीं माझ्याकडे अर्थपूर्ण

दृष्टीनें पाहिलें. जिची हकीगत आपल्याला आतां वाचायला मिळणार ती बाई हीच अशी माझी खात्री झाली.

नमूताई कागद घेऊन आल्या.

भयंकर उकडत होतें. कोट काढून ठेवून मी ते कागद वाचूं लागलोः

" माझ्या पापाची कहाणी फार मोठी आहे. पण मी ती सारी सांगत बसत नाहीं. लहानपणापासून मी लाडात वाढलें. खायचं, प्यायचं नि मजा करायची एवढ्याकरितांच माणसाचा जन्म आहे, या कल्पनेतच मी लहानाची मोठी झाले. माझ्या दुर्दैवानं वयाच्या दहाव्या वर्षी स्त्री आणि पुरुष याच्या एकाताविषयीं माझ्या मनात कुतूहल उत्पन्न झालं.

ते असं झालं. एके दिवशीं मला एक भयंकर स्वप्न पडलं. मी घाबरून उठलें नि माझ्या वडिलांच्या खोलीकडे धांवत गेलें. त्या खोलीला आतून कडी होती. मीं दार ठोठावलं. वडील चिडून ओरडले. ते दार उघडणारच नव्हते, पण मी जोरजोरानें ओरडूं लागले. माझ्या मुस्कटांत मारण्याकरितां म्हणून त्यांनीं रागारागानं दार उघडलं.

तें उघडल्याबरोबर माझ्या दृष्टीला जें दृश्य पडलं—वडिलांच्या खोलींत आमची स्वयंपाकीणबाई थरथर कापत उभी होती.

इतक्या अपरात्रीं ती वडिलांच्या खोलींत काय करीत होती याचा मीं रात्रभर विचार केला. पण ते कोडं काहीं मला सुटलं नाहीं.

दुसरे दिवशीं मीं गड्याला ही गोष्ट सांगितली. ती ऐकून तो पहिल्यांदा हंसतच सुटला. मग त्यानं मला ज्या गोष्टी सांगितल्या—

पुढं एकदोन वर्षं तसल्या गोष्टी ऐकण्यातच मला आनंद वाटूं लागला.

आमच्या शेजारचा विनू कुठल्याशा नाटक कंपनींत होता. तो मधून मधून घरीं येई. तो झाडून साऱ्या नाटकांतलीं पदं मला म्हणून दाखवी. मी तीं पाठ करूं लागलें.

अशीं दोन-तीन वर्षं गेलीं. विनू गावीं आला कीं एकसारखा माझ्या-भोंवतींच घुटमळत असे. नाटकांत प्रेम कसं करतात हें दाखविण्यासाठीं त्यानं मला एकदां घट्ट पोटाशीं धरलं. मला त्याचा राग आला. पण त्याबरोबरच त्यानं पुन्हां तसंच मला जवळ घ्यावं असंहि वाटल.

शाळा नाहीं, काम नाही, काहीं पाहायला नाहीं, कांहीं वाचायला नाहीं, अशा स्थितींत मी पंधरा-सोळा वर्षांची झालें.

बाबानीं माझं लग्न करून टाकलं. माझं सासर गरीबच होतं. त्यामुळं मी अधिकच शेफारून गेले.

लग्न करतात तें शरीरसुखासाठीं एवढंच मला ठाऊक होतं. माझ्या पतींनीं एकसारखं माझ्याभोंवतीं राहावं नि माझ्या लहरीप्रमाणं नाचावं असं मला वाटे. तसं होईना, तेव्हां चिडून मी वारंवार माहेरीं जाऊं लागलें. पुढं तर पुष्कळ दिवस मी माहेरींच होते. बेकार झालेला विनू गांवातच होता. त्याचं नि माझं फाजील रहस्य झालं, ते वाढत गेलं नि—

मला दिवस गेले तेव्हां मीं आजारीपणाचं सोंग केलं. माझे पति आले. पण ते माझ्या सोंगानं फसले नाहींत. माझं पाप त्यांना कळून चुकलं. मी बाळंतीण होण्यापूर्वीच ते कुठं बेपत्ता झाले.

ते मूल जगलं नाहीं. सासरीं जायचं मला कारणच नव्हत; विनूचं नि माझं संघट्टन अधिक अधिक होऊ लागलं. मधूनच एखादे वेळीं मी चुकतेंय् असं मला वाटे; पण माझं मन कांहीं केल्या मला आवरत नसे.

पुन्हां मला दिवस गेले. पण ही वेळ बिकट होती. माझे पति परागंदा झाल्याची बातमी गांवाला कांहीं नवीन नव्हती. जमिनीच्या वादामुळं सारे गांवकरीहि माझ्या वडिलांच्या विरुद्ध झाले होते. मला दिवस गेल्याची कुणकुण गांवकऱ्यांना लागली. लगेच गावातून अधिकाऱ्यांना निनांवीं पत्रं गेलीं. वरून हुकूम आले. पोलिस पाटलांनीं चारचौघांसमक्ष माझ्या वडिलांना बजावलं, 'संभाळून राहा. गर्भपात करण्याच्या भानगडींत पडाल तर—'

त्या दिवशीं माझ्या वडिलांनीं डोक्यांत राख घातली. माझी चूक मला कळत होती. पण मी वाईट व्हायला एका दृष्टीनं माझे वडीलच—

माझ्या आयुष्याचा सत्यानाश करणारं ते घरच नव्हे, तर हे जगसुद्धां सोडून जायचं मी ठरवलं.

पण घरीं बसून आत्महत्येचा बेत करणं निराळं नि अंधाऱ्या रात्रीं नदीच्या डोहांत उडी घेणं निराळं. मध्यरात्रीं मी डोहाच्या कांठावर जाऊन किती तरी वेळ उभी राहिलें होतें. पण—

पहांट होऊं लागली तशी मी गांव सोडून निघालें.

महिनाभर मी भिकारणीप्रमाणं गावोगाव भटकत होतें. या दिवसांत माझी दया येऊन चार-दोन आणे देणारे पुरुष मला भेटले, नाहींत असं नाहीं. पण पुष्कळ पुरुषांनीं हात पुढं केला तो मला मदत करण्याकरिता नाहीं! तर माझा हात धरून मला नरकात आणखी खोल खोल ढकलण्याकरितां!

एका संभावित गृहस्थाला मी हवी होते. पण तो मला पुढं होणारं मूल संभाळायला मात्र तयार नव्हता. जगाने मांडलेला हा प्रेमाचा बाजार पाहून माझें मन विटून गेलें. पुन्हां आत्महत्येचे विचार माझ्या मनात येऊं लागले.

एके दिवशीं एका गावांत मोठा समारंभाची तयारी चाललेली दिसली. मीं एका हमालाला विचारलं, 'कुठला राजाबिजा येणार आहे वाटतं आज?'

त्यानं मान हलविली.

'कुठला?'

'साऱ्या हिंदुस्थानचा!'

हिंदुस्थानचा राजा विलायतेंत राहतो असं मीं ऐकलं होतं. म्हणून मीं मुद्दाम त्याला विचारलं, "साहेब आहे ना तो?"

त्यानें नकारार्थी मान हलविली. तो हंसला नि आपल्या कामाला निघून गेला.

संध्याकाळीं सारं गाव समारंभाच्या जागीं लोटलं. त्या दिवशीं सकाळ-पासून मला काहीं खायला मिळालं नव्हतं. भीक मागूनसुद्धां जग आपल्याला जगू देत नाहीं. मग जगायचं तरी कशाला? असं एकसारखं माझं मन म्हणत होतं.

माझे पाय लटपटत होते. पण पुराबरोबर काडी वाहत जावी, तशी गर्दी-बरोबर मीहि त्या समारंभाच्या जागीं जाऊन पोंचलें.

थोड्याच वेळात मोटार वाजली. हजारों लोकांनीं जयघोष केला, "महात्मा गांधी की जय!" माझ्या अंगावर आनंदाचा कांटा उभा राहिला.

गांधींचं नांव मीं ऐकलं होतं. पण त्यांना कधींच पाहिलं नव्हतं मीं.

गांधी आले. डोळे भरून मीं त्यांच्याकडे पाहिलं. कंबरेभोंवतीं एक साधा पंचा, हातांत एक काठी नि डोळ्यांना चष्मा—

माझ्या मनांत आलं—लाखो माणसांच्या मनाचा हा राजा किती साधा आहे!

गांधी बोलूं लागले. ते हिंदींत बोलत होते. दुसरा मनुष्य लगेच त्याचं मराठी करून सांगत होता. तापून गेलेल्या जमिनीला पावसाच्या सरीनं ओलावा मिळावा, तशी माझी स्थिति झाली.

त्यांचं सारं बोलणं मला कळलं नाहीं. पण एक गोष्ट मात्र माझ्या हृदयावर कोरली गेली—माणसाचा जन्म नुसत्या सुखासाठीं नाहीं; कर्तव्यासाठीं आहे, सेवेसाठीं आहे. ज्याला सेवा करावयाची असेल त्याला सारं जग मोकळं आहे. सेवेचं सुख हेंच अमर सुख आहे. कितीहि गोड पक्वान्नं खाल्लीं तरी जिभेची कधीं तृप्ति होत नाहीं! स्त्रीपुरुषांनीं कितीहि शरीरसुख उपभोगलं तरी त्यांचं कधींहि पूर्ण समाधान होणार नाहीं! याच सुखाच्या माग मनुष्य लागला कीं तो पशु होतो. सेवेंतल्या सुखाची गोडी ज्याला कळली तो देव होऊं लागतो.

सभेची गर्दी ओसरल्यावर गांधीजी जिथं उभे होते त्या जागेची धूळ मीं घेतली नि कपाळाला लावली. अजून अंगारा म्हणून ती धूळ मीं माझ्यापाशीं ठेवली आहे. दुसरे दिवशीं मी मुंबईची वाट धरली. एका आश्रमानं मला आश्रय दिला. माझं हें दुसरं मूलहि जगलं नाहीं. मला वाईट वाटलं. पण मनात म्हटलं—मी स्वतःच आतां एक लहान मूल झालें आहें—माझा पुनर्जन्म झाला आहे, मागच्या जन्मीचं सारं पाप या जन्मांत धुऊन काढणार आहें मी! आतां मी खूप शिकणार, खूप खूप सेवा करणार!"

× × ×

नमूताई माझ्यासमोर येऊन केव्हां उभ्या राहिल्या होत्या कुणाला ठाऊक! माझे वाचन संपतांच मीं वर पाहिले. त्या माझ्याकडे हंसत पाहत होत्या.

"किती गुंग झालां होतां तुम्ही!" त्या उद्गारल्या.

मी नुसता हंसलो. पण लगेच मीं विचारलें, "या बाईचं नांव मला कळेल का?"

स्वर किंचित् खालावून त्या म्हणाल्या, "इथं ते गोपाळराव मराठे आहेत ना? त्या थेटरचे मॅनेजर? त्यांची ही भावजय!"

मी आनंदानें बाहेर पाहूं लागलों. वळवाची सर कोसळत होती. माझ्या मनांत आलें—ऊन नि पाऊस—निसर्ग फुलायला दोन्ही हवींत. शरीर नि मन—माणसाचा विकास व्हायला दोन्ही हवींत!

पाऊस आल्यामुळे आवारांतलीं मुलें आंत येऊन किलबिल करीत होतीं.

"आई, आई!" हे त्यांचे शब्द वारंवार माझ्या कानांवर येऊं लागले. मी ऐकूं लागलों.

"तूं म्हणत होतीस तेंच गाणं हवं आम्हांला!" मुलांनीं आईपाशीं हट्ट धरला होता.

एक गोड सूर ऐकूं येऊं लागला,

**"घरीं एकच पणती मिणमिणती**
**म्हणुं नको, उचल, चल लगबग ती"**

माझ्याच ओळी होत्या या! त्या लिहिताना मला जो आनंद झाला होता तोच पुन्हां आज त्या ऐकताना झाला.

माझें मन म्हणत होतें— या ओळीचा एक नवा अर्थ आज आपल्याला कळला. माणसाचें मन हेंच त्यांचे खरें घर आहे. त्या घरांत नेहमीं एक पणती तेवत असते. ती मिणमिणत असेल, ती वाऱ्यानें विझून जाते कीं काय असा भास होत असेल; पण तिची ज्योत अमर आहे!

# खलिल जिब्रानचें

## वाङ्मय

**प्रकाशित**

१ सुवर्ण कण

वि. स. खांडेकर

२ रुपेरी वाळू

अनंत काणेकर

**आगामी**

१ अमिति

साने गुरुजी

२ बंडखोर आत्मे

वि. स. खांडेकर

३ गद्य काव्यें

वि. स. खांडेकर

४ वेचलेलीं फुलें

वि. स. खांडेकर

**देशमुख आणि कंपनी**

पुणें २